# बाळमित्र,

## भाग दुसरा,

गेस्फोर्डसाहेब ह्यांनीं

इंग्रेजीवरून मराठी भाषेंत केला,

त्याची नवी आवृत्ति

मेजर क्यांडीसाहेब पुणें पाठशाळेचे प्रिन्सिपाल्

ह्यांनीं तपासली.



हें पुस्तक मुंबईचे बोर्ड आफ एज्युकेशन ह्यांच्या हुकुमावरून

पाठशाळेकडील छापखान्यांत

छापिलें.



छापणार नारो रामचंद्र ठकार स॰ छा॰

मुकाम पुणें

इसवी सन १८५१

शके १७७२

# अनुक्रमणिका.

# बाळमित्र.

## प्रतापशिंग.

प्रतापशिंग ह्मणून कोणेएके पलटणीचा मुख्य सरदार होता; तो आपले उत्तम चालीनें मोठे योग्यतेस चढला होता; त्यानें पाहिलें तों आपले हातारवालचे सरदार सर्ववेळ जुगाराकडे मन योजीत असतात, असें त्यास समजलें; ह्मणून त्यास फार खेद उत्पन्न झाला. मग त्यांस शुद्धीवर आणण्याविषयीं तत्पर होऊन त्यानें एके दिवशीं सर्व सरदारांस आपले येथें जेवावयास बोलाविलें, आणि बोलतां बोलतां जुगाराचे गोष्टीवर बोलणें आणून त्यानें आपणास घडलेल्या गोष्टींची हकीकत सांगितली.

मी सोळावर्षांचा असतां, ज्या पलटणींत हालीं मुख्य आहें त्याच पलटणींत मी लहान अमलदार होऊन राहिलों. बाळपणांत मी विद्याभ्यास फार झटून करीत असें, ह्मणून माझे आईबापांचे अटकळींत असें आलें कीं, हा शिपाइगिरीची कळा अशीच शिकून एखादे दिवशीं योग्यता व कीर्ति मिळवील; परंतु थोडक्याच दिवसांत जुगारी सरदारांच्या समागमेंकरून त्यांचा कित्ता मला लागला. त्यांचा समागम ह एक

# बाळमित्र.

कारण, दुसरें त्यांनीं ह्याविषयीं अति आग्रह केला, ह्या मुळें माझें मन वेढून गेलें.

मग मी त्यांशीं नित्य नित्य जुगार खेळूं लागल्या मुळें मला असा छंद लागला कीं, त्याखेळावांचून दुसरें कांहीं रुचेना; अगदीं मोहून गेलों; मला एखादे वेळेस तो खेळ सोडून काम करण्याचें पडल्यास त्याकामाचा अतिशयित तिटकारा वाटे.

विश्रांति जर ह्मणाल तर एक घटकाभर झोंप मात्र घेई, पण ती तरी जुगार सोडून घेणें ह्मटलें ह्मणजे फार प्राणसंकट पडे. बरें, तितक्यांत तरीं गाढमूढ नीज किंवा जुगाराशिवाय दुसरें स्वप्न? हेंही नाहीं. स्वप्नांत रुपयांचे ढीग पाहावे, व फांशांचा उच्चार करून मोठ्यानें बरळावें, असें निरंतर निद्रा होई तोंपर्यंत होत असे.

पहा, भोजन हें सर्वांस स्वभावें करून प्रियना? पण मला तितकाच वेळ व्यर्थ गेला ह्मणून तें उत्तम अन्न विषवत् वाटावें. माझे जुगार खेळावयाचे सोबती ह्यांचा व माझा फार वियोग नव्हावा ह्मणून मजकडून जितकी त्वरा होई तितकी मी करीत असें.

वसंतकालादिक जें काय ईश्वरानें मनुष्यांस सुख व्हावें

ह्मणून केलें आहे. व सणांचे दिवस, त्या सर्वांचा मीं अनादर केला, ह्यामुळें तें सर्व सुख मला अंतरलें. जुगार खेळणारे सोबती ह्यांवांचून कोणाशीं भाषण देखील नाहीं, मग स्नेह तर फारच लांब.

आईबापांचें स्मरण जर कधीं मला झालें तर त्यांचे शिकवणी मुळें त्या स्मरणानें मनांत फार दुःख होई. ईश्वराचें स्मरण तर कधीं झालेंच नाहीं.

पहिल्यानें जुगारांत मला रती अनुकूळ होती, ह्यामुळें तर माझी बुद्धि फारच भ्रष्ट झाली. जुगार खेळण्यामध्यें फारचजें द्रव्य मिळविलें होतें तें द्रव्य भुईवर आंथरून त्याचा बिछाना करीत असें, ह्यासाठीं कीं, माझ्या ओळखीच्यांनीं ह्मणावें. हा आज काल द्रव्यांत लोळतो आहे.

अशा नीच कर्मांत मीं आपल्या वयाचीं तीन वर्षे फुकट घालविलीं, त्या तीन वर्षांचें स्मरण मनांत लज्जा आणल्या वांचून होत नाहीं; कारण, त्या वर्षांनीं माझे प्रतिष्ठेस फारच बट्टा लावला; तो तुह्मांस काय सांगूं? त्या तीन वर्षांचा कलंक जावा ह्मणून किती जरी यत्न केला तरी कांहीं जावयाचा नाहीं. ह्याखेरीज देहांत न होण्यासारखी आणखी एक गोष्ट मजकडून झाली, ती सुधारावी ह्मणून आज वीस वर्षे यत्न करितो आहे तरी सु-

धरत नाहीं; ती सांगावयास मला मेल्याचा पाड चढतो, आणि त्या गोष्टीचें स्मरण झालें ह्मणजे मी किती जिवाला खातों; पण तितकेंही सोसून ती गोष्ट तुमचे हितासाठीं तुह्मांला सांगतों.

एके समयीं मला भरतीचे शिपाई मिळवावे ह्मणून आज्ञा झाली; तेव्हां ह्या हाड व्यसनांत मी राहिलों आणि तें काम हवालदारास सांगितलें. मग चार दिवसां नंतर हवालदार वीस माणसें बक्षिसासाठीं घेऊन आला, त्या दिवसाचे आदले रात्रीस म्यां आपलें जें काय होतें तें सर्व जुगारांत गमावलें; बरें, तेवढ्यावरच गेलें असें नाहीं, जे सरकारानें कामा करितां मजकडे रुपये दिले होते तेही गमावले. पहा तुह्मी, मग त्या मूर्खपणाला व दुःखाला कांहीं जोडा आहे? त्यावेळीं मला भान नराहतां काय करूं कसें करूं अशी अवस्था प्राप्त झाली. असा जेव्हां मजवर वक्त गुदरला, तेव्हां जेथें माझी पलटण होती तेथें एक स्नेही सरदार होता त्याजकडे म्यां जुगार खेळण्याची हकीकत लिहून रुपये उसणे मागावया करितां एक हलकारा तावडतोब पाठविला. त्याचें उत्तर त्या सरदारानें कसें लिहिलें तें ऐका. त्यानें पत्रांत असा मजकूर लिहिला होता कीं. मी नित्य जुगार खेळणाऱ्यास रुपये देऊन बुडवून टाकूं? आतां, रुपये नदिले तर स्ने-

# प्रतापशिंग.

ह तुटेल, तर ज्या स्नेहानें पाणी उतरतें तो स्नेह रुपये पाण्यांत टाकून राखावा, तर असा स्नेह राखण्यापेक्षां रुपये राखावे हें फार चांगलें आहे; ह्मणून मी आपले रुपयेच राखितों; मला स्नेहाची गरज नाहीं. असे धिक्काराचें उत्तर वाचल्यावर मग कशाला विचारतां, तेवेळीं मजवर आभाळ कोसळलें; त्याचें स्मरण जर आतां झालें तर असें वाटतें कीं, तें कर्म म्यां कालच केलें. त्यासमयीं असें मनांत आलें कीं, माझे आई बापांस मजविषयीं किती राग व किती दुःख झालें असेल. ह्या प्रमाणें म्यां आपले कुळांत व सोयरे धायरे इष्ट मित्र ह्या सर्वांत अपकीर्ति मिळविली, व त्यांस ही हलकेपणा आणिला. आणखी माझे मनांत आलें कीं, राजाचे पलटणींतून आतां माझी पुरती शोभा होऊन चाकरी निघेल. अशीं अनेक प्रकारचीं संकटें एकदांच मनांत उभीं राहिलीं, तेव्हां माझे डोळ्यांवरचा धूर गेला, आणि पश्चात्ताप पावलों कीं, जर मी चांगलें आचरण केलें असतें तर मला पुढें अधिक वाढावयाची आशा असती, पण तें आतां कोठचें? असा जेव्हां शुद्धीवर आलों तेव्हां हा अपराध दूर करण्या करितां दुसरा अपराध करावा असा मनसूबा केला, आणि तो सिद्धीस न्यावा. इतक्यांत ज्यानें असें पत्र लिहिलें तोच सरदार माझे

# बाळमित्र.

येथें आला. त्यास पाहातांच मला असा क्रोध चढला कीं, मी शस्त्र घेऊन एकाएकीं त्याचे आंगावर धांवलों, तेवेळेस पुढें काय होईल व हा कां आला हें माझे लक्ष्यांत आलेंच नाहीं. शेवटीं त्यानेंच हातचें शस्त्र घेऊन स्नेहवादा मुळें मला आलिंगिलें, आणि ह्मणूं लागला कीं, तुमचे पत्राचें उत्तर म्यां धिक्कार पूर्वक लिहिलें ह्मणून तुह्मांस राग आला असेल, परंतु त्या लिहिण्यांत माझा अभिप्राय असा होता कीं, त्यावरून तुह्मांस माहीत व्हावें जे वाईट खोडी मुळें तुह्मी कसकसे संकटांत पडलां, आणि मलाही समजावें कीं, माझें पत्र लिहिण्याचें सार्थक्य कसें होतें. आतां तुह्मांस ज्यापक्षीं पश्चात्ताप झाला आहे त्यापक्षीं तुमचें माझें कांहीं वांटलें नाहीं, घ्या हे रुपये; असें ह्मणून त्यानें पिशवी काढली, आणि बोलिला कीं. बक्षिसांचे शिपायांस खर्च होऊन बाकी जे राहतील ते घटकाभऱ्यां जुगाराची इच्छा झाली ह्मणजे कामास पडतील. त्याचें उत्तर मीं त्यास लाजून केलें कीं, अतःपर जुगार खेळणार नाहीं. मग त्यानें मला पोटाशीं धरिलें. त्या दिवसापासून मी आपले वचनांत किमपि अंतर न पडूं देतां योग्य आचरण करीत आलों; आणि त्यासमयीं म्यां असा निश्चय केला कीं. आपले ख्याली खुशालीकडे कांहीं खर्च करूं

# प्रतापशिंग.

नये; मग मोठी काळजी लावून कर्ज फेडण्या करितां मी रुपये मा-
गें टाकीत गेलों. आणखी जो काय मला अवकाश होता तो
स्यां चांगल्या गोष्टींच्या अभ्यासावर योजिला; आणि चाकरी फा-
र जपून करूं लागलों, ह्मणून माझ्यावरचे जे सरदार होते ते
संतुष्ट झाले. सारांश, मी इतके योग्यतेस चढलों ह्याचें कारण
हेंच कीं, वाईट चाल सोडून चांगली चाल धरली.

ही हकीकत त्या सरदारांनीं ऐकतांच ते मनांत खोंचले,
आणि ती गोष्ट त्यांचे मनांत ठसली. त्यायोगें त्यांत जें जुगा-
र वगैरे काय दुर्व्यसन होतें तें अगदीं सोडून तेही चांगल्या
रीतीनें वागूं लागले. त्यांस वाईट आचरणानें पैसा मिळवा
वयाचा जो छंद होता तो नाहींसा झाला. असा त्या चतुर पु-
रुषाचे शिकवणीचा परिणाम फार चांगला झाला.

# बाळमित्र.

## एक लहान हरणी, जिचें नांव यमुना.

## नाटक दोन अंकी.

### पात्रें.

| | |
|---|---|
| रामराव, - - - - - - | कोणी एक देसाई. |
| विनायक, - - - - - - | रामरावाचा मुलगा. |
| गंगा, - - - - - - | रामरावाची मुलगी. |
| गोपाळा, लक्ष्मण, } - - - - - - | विनायकाचे स्नेही. |

### स्थळ,

### रामरावाची खोली.

---

### प्रवेश १

### गंगा

गंगा.— ( विलाप करीत ह्मणत ) अहा, माझे राजसे यमने, तूं अंमळ माझे जवळ नसलीस तर तुजवांचून कसे

# लहानहरणी.

चैन पडेल? तुझे गुण मी काय वर्णूं! माझे खेळण्याचे वेळेस ह्या पलंगावरचे गादीवर त्वां गरीबा सारखें उगाच बसावें, आणि उठलीस ह्मणजे मला किती आनंद व्हावा! मान वरती करून शेपूट हालवीत हालवीत वपर पलंगा खालून, चौपाळ्या खालून, त्वां कसें लोटत लोटत चालावें, आणि ठिकावें! म्यां तुला मांडीवर घेतलें ह्मणजे माझे हात तोंड त्वां हुंगावें! मजसंगतीं खेळावें! आतां तूं माझे हातीं परतून जर नाहीं लागलीस तर मी किती झुरूं लागेन! म्यां कधीं गमावली नसती, पण तो विसरभोळा विन्या—

---

## प्रवेश २

### गंगा आणि विनायक.

विना०—( हें ऐकतांच आंत येऊन) वाहवागे, माझें नांव घेतीस?

गंगा— तुझ्या वांचून कोणाचें घेऊं? तूं असा हट्टी पाहिलास! माझे गजसेस बाहेर नेलें नसतें तर मी कधीं गमावली नसती.

# बाळमित्र.

विना० — होय ताई, जशी तुला खंती वाटती तशी मला ही वाटती, पण आतां गमावली त्याला काय करावें?

गंगा — भाऊराया, नेऊं नको ह्मणून म्यां तुला सांगितलें नाहीं बरें? पण तूं कुठला ऐकायाचा. ती तुझे बरोबर नसती तर तुला एक पाऊलभर देखील चालवत नाहीं.

विना० — बाहेर तिचे चालण्याचे चपळाईमुळें मी कोणीकडे जातों व कसा चालतों ह्याचें भान देखील मला राहत नव्हतें. मी पाठीस लागलों असें मानून तिनें इकडे तिकडे पळावें, आणखी त्वरेनें लोटत लोटत येऊन माझे भोंवताली मोठ्या हर्षानें उड्या माराव्या, तेव्हां आह्माला किती आनंद व्हावा!

गंगा — असें होतें तर अधिक जतन करावी कीं नाहीं?

विना० — करावी; पण ती मज जवळून लांब पळून जाई, आणि पुनः बोलावल्या वांचून येई, ह्यामुळें मला वाटलें —

गंगा — वाटलें! तुझे वाटण्यास काय करावें? तूं बापडा कधीं कोणाविषयीं अविश्वासी असा नाहींस; पण ह्यामुळें माझी खरी यमनी गमावलीना?

विना० — ताई, आतां मी तुला वचन देतों कीं, आजपा-

# लहानहरणी.

सून कदा काळीं—

गंगा — पुरे पुरे आतां! मज जवळ कांहीं असलें तर गमावशील मात्र तेवढा. कालरात्रीं मला तिचे खेदामुळें झोंप देखील डोळाभर आली नाहीं; अंमळ डोळा लागला तो यमनीचें तोंड उत्तरून गेलें आहे आणि ओरडत मजजवळ आली; हें मी पाहतांच जागी झालें, तों मी एकटीच आहें. आहाहा, तीही मजप्रमाणेंच झुरत असेल!

विना० — ताई, तुला इतके दुःखांत पाहून माझा जीव तिळ तिळ तुटतो. काय करूं आतां! मी आपलीं सर्व खेळणीं खुषीनें सोडीन, पण ती कशीतरी एकदां माझे दृष्टीस पडो.

गंगा — तूं मला तिजविषयींचें दुःख अधिक वाढवितोस, तुझी तिची चुकामूक झाली ती जागा देखील तुला ठाऊक नाहीं, असती तर तिकडेसच लोकांत शोध लावावयास अवघड पडतें ना.

विना० — मी पैज मारतों, ती खचीत घराजवळ आली, पण ती हुंगीत हुंगीत घरोघरचे अंगणांत जाई, ह्यामुळें कोणीं तरी दरवाजा लावून तिला कोंडलें असावें.

# बाळमित्र.

गंगा — हें खरेंच असेल, असें नसतें तर ती आपले ठिकाणीं फिरून आली असती; तिला घराची वाट पक्केपणीं माहीत आहे.

विना० — गोपाळा मजबरोबर होता, यमनी आमचे मागें चालत होती. तिला पाहून एक क्षण देखील झाला नाहीं. तों इतक्यांत दिसेनाशी झाली. यमनी गमावल्याचें मूळ गोपाळाच काय सांगू? तो वाटेनें चालतांना काय काय तऱ्हा तऱ्हा करीत असे, त्यानें मला यमनीची शुद्ध देखील राहिली नाहीं.

गंगा — तर तुज बरोबर त्यानें शोध करायला यावें कीं नाहीं?

विना० — तो मज बरोबर काल संध्याकाळीं आणि आज सकाळीं शोध करायाला आला होता. आम्ही सर्व चौकीवाल्यांच्या जागा व बाजार व गल्ल्या वगैरे सर्वजागीं शोध केला, पण कोठेंही ठिकाणा लागला नाहीं. खरेंच सांगतों. माझे आचरणानें तुझे तोंडाकडे पहावयास मला लाज वाटती, तुलाही मजविषयीं भारी राग आला असेल हें खचीत जाणतों.

गंगा — (त्याचा हात धरून) मला राग नाहीं, कांकीं माझें

# लहानहरणी.

वाईट करावें हें तुझ्या मनांत देखील नव्हतें, पण तूं फारच पस्ताई पडलास. असो, आधीं माडीवर कोण येतो आहे तो जाऊन पहा बरें.

---

## प्रवेश ३

### गंगा, विनायक, आणि गोपाळा.

(गोपाळा खोलीचें दार उघडतो, आणि विनायकास मी, मी आलों, असें ह्मणतो. उभयतां एकमेकांस उत्तम रीतीनें भेटल्यावर गोपाळा विनायकास ह्मणतो.)

**गोपा॰**— यमनीविषयीं कांहीं सुगावा लागला आहे, ह्यामुळें मी आशा ठेवितों कीं थोडक्याच वेळांत ती मला—

**गंगा**— यमनी सांपडेल काय?

**गोपा॰**— मी सांगतों तें ऐका अगोदर. गल्लीचे कोंपऱ्यांतील दुकानावर जांबवाली ह्मणारी बसत असती तिची तुमची ओळख आहे?

**गंगा**— काय माझी सखी यमनी तिजपाशीं आहे?

**गोपा॰**— तिजपाशीं कशाची; ती फार भली आहे, मज-

वर अतिशय लोभ करिती; कां, विनायकराव, हें तुह्मांला ठाऊक नाहीं? यमनी ही मनप्रमाणें लाडी गोडी लावावयाकरिनां तिचे दुकानाचे ओट्यावर पाय देऊन उभी राहून फळफळावळ वगैरे हुंगूं लागली.

विना० — अरेरे, यमनीचा लाड अगदींच कामास आला नाहीं. ह्यातारीच्या एका धपाट्यानें सगळा व्यर्थ गेला.

गंगा — थांबरे, ह्या वांचून काय पडलें आहे? मग. गोपाळा?

गोपा० — मी आतां तुकना तिचे दुकानीं केळीं घ्यावयास गेलों होतों, तिला मीं आपले हरणीचें वर्तमान कळविलें. तेव्हां ती ह्मणाली, काय ती ओंगळवाणी हरणी गेली?

गंगा — तुह्मी असें माझे हरणीस उगीच वाईट साईट बोलत जाऊं नका.

गोपा० — मी कांहीं पदरचें बोलतों असें नाहीं; तिच्या तोंडांतून जीं अक्षरें निघालीं तीं सांगतों. मला ह्मणते, ओंगळवाणी हरणी ती तुझा देखणा सोबती त्याचीच ना? मी ह्मटलें होय, मग ती ह्मणाली की सफेलाचे वाड्यांती-

# ल्हानहरणी.

ल जो पोर आहे त्यानें ती फुसलावून नेली.

विना० — काय, तिचे बोलण्याचा भाव लक्षुमणाविषयीं दिसतो तर.

गोपा० — तुह्मांला स्मरण आहे? जेव्हां आपण ह्मातारी चे दुकानावरून जात होतों तेव्हां तो तेथेंच होता, पण त्याचे मनांत ह्या केळ्यांतून आपणाला ह्यांस कांहीं द्यावें लागेल, ह्मणून त्यानें आपणांस पाहिलें न पाहिलेंसेंच केलें.

विना० — हें तर पक्केपणें माझे ध्यानांत आहे; तो तेथें होता खरा.

गोपा० — आपण दुकाना पासून कांहींसे पुढें गेलों तेव्हां यमनी आपले मागें चालत होती; तिला त्यानें दुधाची आशा दाखवून ती दूध पिण्यांत गुंतविली, आणि लागलीच उचलून घरांत नेली. हें त्याचें कपटी कर्म मला त्या ह्मातारीनें कळविलें.

गंगा — अहारे लक्षुमणा, तूं इतका प्रतापी हें ठाऊक नव्हतें; असो, पण यमनीचा ठिकाणा लागला. तर विनायकराव आतां लौकर त्याचे घरीं जाऊन पहा.

गोपा० — विनायकरावाला हरणी त्याचे घरीं कदाकाळीं

सांपडावयाची नाहीं. तो मोठा हाताळ आहे; घरांत ज्या कांहीं वस्तू हातास लागतील त्या आणि आपल्याही चोरून नेऊन विकतो, त्यावरून वाटतें कीं, खचीत यमनीस विकावयास चोरून घेऊन गेला आहे. आणखी, दोन दिवस झाले आह्मी दोघे गोट्या खेळत होतों त्यांत त्यानें भारी लबाडी केली.

गंगा —— त्या लबाडानें घरच्या माणसांस, कोणी आलें असतां मी बाहेर गेलों ह्मणून सांगा, त्याप्रमाणें सांगून ठेवून अगोदरच बंदोबस्त करून ठेवला असेल.

गोपा॰ — नाहीं, नाहीं; मी त्याचे घरीं गेलों होतों; त्याच्या खोलींत जाऊन पोऱ्यास सांगितलें कीं, मी लक्षुमणास गोट्या खेळावया करितां धुंडतों आहें, त्यास सांग; तो येई पर्यंत मी विनायकरावाचे घरीं वाट पहात बसतों.

गंगा —— त्यानें यमनी चोरली असली तर तो कधीं इकडे तोंड दाखविणार नाहीं.

गोपा॰ — काय सांगतां! त्याची आब्रू तर गाड्यावर जाती आहे हें तुह्मांस कांहींच का माहीत नाहीं? आतां तर तो आपणावर वहमा येऊंनये ह्मणून अगोदर येईल. बरें, कांहीं चिंता नाहीं; तुमचे समक्ष मी त्यास चोर ठर-

# ल्हानहरणी.

वीन.

गंगा — हें काम तर डोळा नफुटे काडी न मोडे ह्यारीती-नें केलें पाहिजे; खडा टाकून ठाव पहावा ह्मणजे काय तें समजेल.

गोपा० — माझें ऐका; इतक्या वांचून कांहीं खोळंबा नाहीं. एक्याच गोष्टींत त्याची चोरी बाहेर काढावी.

विना० — असें करूं नये; अशानें लागलाच कज्जा मात्र होईल, आणि राजवी आपणांवर मनस्वी रागें भरतील; ह्यासाठीं मला वाटतें कीं, कज्जा व छद्मी भाषण करावें त्यापेक्षां गोडशब्द बोलल्यानें आपलें काम सिद्धीस जाईल तर बरें.

गंगा० — ती हरणी माझी आहे असें त्यास माहीत नसोल.

गोपा० — असें कसें होईल? शंभरदां तुमचे भावा बरोबर तिला चालतांना त्यानें पाहिलें आहे, आणि फारदां तिशीं तो खेळला आहे. आतां तर त्यानें खचीत विकावयासाठींच चोरली.

गंगा — अरे, हा लक्षुमण आला पहा!



# बाळमित्र.

तीं लागणार नाहीं.

गंगा—— लक्षुमणा. माझी मर्जी राखावी असें जर तुझे मनांत आहे, तर ती आहे किंवा नाहीं, हें मला निवळपणें सांग. कायतें कळूंदे एकदां म्हणजे झालें.

गोपा०— होय. संदिग्ध कामाचें नाहीं.

गंगा—— आमची हरणी तुजजवळ आहे खरी, पण ती कोणत्या ठिकाणीं बांधली आहे हें सांग.

ल०——(गांगरून म्हणतो) काय मजजवळच तुह्मी हरणी आहे?

गोपा०— कायरे! उत्तर देणें एकीकडेस टेवून तेरीमेरी करतोस; पण मला खचीत ठाऊक आहे कीं, तो दुधाची आशा लावून ती नेली.

ल०——हें तुला कोणीं सांगितलें रे?

गोपा०— तुला हें कर्म करतांना जिनें पाहिलें तिनें.

गंगा— हें खरें कीं खोटें, एवढेंच कृपा करून मला सांग.

ल०— मीं जर तुझी हरणी चोरून नेऊन घरांत बांधून ठेवली असेल तर ना सांगूं?

गंगा— हें आह्मी खचीत म्हणतों असें नाहीं, इतकेंच कीं आतां ती कोठें आहे तें सांग.

# लहानहरणी.

विना०— तुह्मीं केवळ चोरून नेली असें नसेल, कदाचि-न थट्टेनें जसीं कोणी कोणाची वस्त ठेवितात तसी आ-मच्या जवळून कांहीं हर्की घेऊन मग द्यावी असें ह्मणू-न ठेविली असेल.

ल०— माझ्या वाड्यांत काय शिकार खान्याची जागा आहे?

गोपा०— काय ह्या निलाजरेपणास ह्मणावें? पहा क-सें उत्तर करितो तें!

ल०— मी तुजशीं कांहीं बोलत नाहीं; तुला काय इ-तकें बोलण्याचा अधिकार रे?

गोपा०— बोलण्यांत मीं तुला कुंठित केलें ह्मणून.

गंगा— हळू बाबांनो! तुह्मी नीट समजलां नाहीं. लक्षुमण केवळ आमची हरणी ठेवील असें होणार नाहीं.

विना०— जर कदाचित् तुह्मी वस्त हरवली असती, आ-णि तिचा शोध मला लागला असता, तर मीं मोठे आ-नंदानें तुला कळविलें असतें. लोकरीतीप्रमाणें विचा-रलें असतां त्वां रागास यावें हें योग्य नाहीं.

ल०— धाकांत माझें नांव तुह्मी घेतां, मग मला राग क-

सा येणार नाहीं? थांबा, मी तुमचे बापापाशीं जाऊन मागतों.

गोपा०—इतकें कशाला? चला त्या म्हातारीकडे, आतांच पदरीं घालतों.

ल०—— माझें बोलणें तुला खोटें वाटतें, आणि साठी बुद्धि नाटी अशी जी म्हातारी तिजवर विश्वास ठेवितोस, हें फार चांगलें.

गोपा०—तिची दृष्टि आणि तिचे कान अझून फार तिखट आहेत; त्यांत आणखी वयानें म्हातारी व तुजपेक्षां कोट हिशांनीं खरें बोलणारी आहे. म्हणून मी तिजवर विश्वास ठेवितों, उगीच नाहीं.

ल०—— बरें बरें. मी ह्याविषयीं कान पाडणार नाहीं. हा पहा तुमचे बापाकडे चाललों.



# लहानहरणी.

## प्रवेश ५

### गंगा. विनायक, आणि गोपाळ.

गोपा०— तो अट्टल चोर आहे, ह्याविषयीं सांगाल तशी प्रतिज्ञा करीन. हरणी तुजजवळ आहे असें ह्मणतांच, पाहिलेंना, कशी बावडी वळली ती?

गंगा—— ही गोष्ट माझ्यानें खरी ह्मणवत नाहीं, बाबा.

गोपा०—– तुमची प्रकृत सरळ हो; परंतु मी खचीत जाणतों कीं ह्याच राजश्रींचें कर्म.

गंगा —— मला तर, बाबा, एवढें मात्र दिसतें कीं, आपण जेव्हां विचारूं लागलों तेव्हां त्या कडून आगळीक झाली खरी.

गोपा०— तुह्मी जर एथें नसतां तर त्यास खूब वडविलें असतें.

विना०— गहूं द्या उगीच, तुमचे पेक्षां दुप्पट त्याच्या मनगटाची कांब मोठी आहे.

गोपा०—– अरे, कांबीपाशीं काय आहे? जरी त्याची कांब मोठी तरी तो फोपसा आहे. आणखी पाहिलेंना, जसजसें आपण मऊ बोलूं तसतसा तो कसा अधिक च-

दून बोले, आणि मी आपल्या बाणीवर आलों ह्मणजे कसा नरम होई तो? पण तुह्मांला सांगतों, त्यानें जेथें घमनी ठेवली असेल तिकडे जाऊन घेऊन येईन.

गंगा— तुमचें बोलणें सर्व खोटें पडेलसें दिसतें. त्यानें चोरी केली असें मला वाटत नाहीं, कारण कीं, तो आमचा शेजारी आहे ह्यास्तव हरणी चोरून नेऊन त्याच्यानें लपवून कशी ठेववेल? हें का त्याचें मनांत आलें नसेल?

विना०— देव करो. कीं खोट्याचे मनांत आपली चोरी बाहेर पडेल ह्या भीतीनें तरी घात करण्याची बुद्धि न येवो.

गोपा०— इतकें धैर्य त्याचें नाहीं, पण विकील वरीक.

गंगा— अहाग आई, कसें हो तुह्मी त्याचे घरावर उठलां.

गोपा०— तो असाच आहे, अशी तुमची खातरी करून देईन. पाहिजे तर.

---

## प्रवेश ७.

गंगा आणि विनायक.

विना०— गोपाळ तर फारच क्रोधिष्ट आणि उतावळा. थो

डयासाठीं उगीच मोठा कज्जा काढतो. त्याचे मनांत मारामारी करावी असें होतें, पण येथें कलागत नहोतां एकदांचे दोघे बाहेर गेले, एवढ्यानें फार चांगलें झालें.

गंगा — कज्जा झाला असता तर मग रावजी आपणांला फारच रागें भरले असते. गोपाळाचें अंतःकरण आपणांविषयीं भारी कळवळतें, अशी माझी खातरनिशा झाली; परंतु हरणी सांपडावी त्यापेक्षां आपला सूड उगवावा हें त्याचे मनांत फार आहे, नाहीं बरें?

विना० — त्याची खोडच आहे, उगीच मधें मधें तोंड घालून ढवळाढवळ करावी. अशानेंच कानाची घाण झाली. लक्ष्मणानें चोरली आहे तर मोठी गुन्हाबीनें येईल तशी कज्जा केल्यानें येणार नाहीं. पण ते रावजी आले, पहा.

---

## प्रवेश ७

### रामराव, विनायक, आणि गंगा.

राम० — कायरे मुलांनो, तुह्मीं लक्ष्मणाचें काय केलें?

तो श्वास टाकीत माझे खोलींत आला; त्याचे सर्वांगा वर कांटा उभारला होता. आपणाच हरणी गमावून म जवर लटकाच आळ, त्वां चोरली ह्मणून, घेनात, अ से गाव्हाणें मजजवळ तुमचें सांगत होता; त्यांत गो पाळाचें तर फारच. काय, ती गमावली?

विना० — होय, रावजी, गमावली; पण ती पुन्हा सांपडेल ह्या भावानें आह्मी तुह्मांजवळ बोललों नाहीं. ती तर का लच मजपासून हरवली.

गंगा — मी किती तिजसाटीं तळमळलें, हें तुह्मांस काय सांगू, रावजी! जवळ नाहींशी पाहून रात्रभर रडलें.

राम० — हें काय! तुझी तर हरणीच गेली, पण ह्या सृष्टीं त ह्यापेक्षां मोठ मोठे अनर्थ नित्य होत आहेत, ह्यासा ठीं दुःख साहण्याचा बाळाभ्यास असला तर फार चांग लें. (विनायकाकडे पाहून) कांरे, तिला चुकविलें?

विना० — खरें रावजी! ह्याविषयीं मजकडून चूक झाली खरी. अगोदर मीं तिला बाहेरच नेऊंनये; बरें, नेली त र तिजकडे लक्ष्य ठेवावें, तें कांहींच केलें नाहीं. असा मी पस्ताईं पडलों, आणि ताईची हरणी, ह्यामुळें तर मी मेल्यापेक्षां मेला झालों आहें.

गंगा— अगोदर एकवेळ ह्याचा अन्याय मजकडून न समजतां झाला होता, तो ह्यानें मला एक अक्षर न बोलतां सोसला; तेव्हां माझ्यानें ह्याला रागें करें भरवेल?

राम०— मुली, तुझें गोड भाषण ऐकून माझें चित्त फार संतुष्ट होतें. पे. मन्त्रा मुकांदे. तुजमध्यें इतकी समज आहे, आणि असें गोड भाषण धैर्याचें करितेस, येणेंकरून मला फार आनंद होतो; आणि तुझें अज्ञानशत्रूंच्या सारखें बोलणें ऐकून मला अति आश्चर्य वाटतें, आणि हर्ष पोटांत मावत नाहीं.

गंगा — मजकडे काय आहे, आपल्याच हातानें केलेलें कर्म आपल्या कामास येतें; पण मजसारखीच हा यमनीवर प्रीति करीत असे. माझें तोंड उतरलेलें पाहून हा फारच कोमावला.

राम०— जसा तुमचा भाव परस्परांवर निःकृत्रिम आहे, तसाच ह्यापृथ्वीतील प्राणिमात्रावर आपल्या सुखदुःखांच्या अनुभवावरून समान असावा, ह्मणजे ह्यांत ईश्वर राजी रहातो; परंतु फार लोकांची रीति मी अशी पाहतों कीं, असा एखादा अन्याय कोणी सेवकी

दिकांनीं केला असतां त्याचें सहन नकरितां तत्क्षणीं त्या बिचाऱ्यांचे पोटावर पाय द्यावा.

गंगा — ईश्वर मला अशी दुष्टबुद्धि नदेवो! काय मनुष्यापेक्षां पशूवर प्रीति ठेवावी? किती झालें तरी मनुष्य तो मनुष्य, पशु तो पशु.

राम० — यस्तून इतकी समसमान प्रीति कोणाची दिसून नाहीं. काय, स्वकीय सरणांत उडी घालतील, आणि परकीय तसेच राहतील? अहो, जर एखादे पशूला कांहीं आजार झाला असला, तर त्याविषयीं किती यत्न करितात. आणि कोणा गरिबाला दुखणें बाहणें आलें, तर त्याकडे पहात देखील नाहींत. असे पुष्कळ पाहनों, तत्रापि मनुष्य पशूंत तारतम्य ठेवणारे असेही ईश्वराचे लाल आहेत.

गंगा — कायहो रावजी. इतके कठीण मनाचे असतातना?

राम० — मुली, तूं कांहीं चिंता करूं नको, ती जरी नाहीं सांपडली तरी मी तिजपेक्षां फार सुंदर अशी दुसरी हरणी आणून देईन.

गंगा — आतां दुसरी नकोबा, एकीनें मला एकदां ठेंचलावली इतकें पुरे. दुसरी बाळगावी आणि तिनें जावें, म-

# ल्हानहरणी.

ग जें दुःख भोगावें त्यापेक्षां नबाळगावी हेंच बरें.

म० — तुझी कल्पना सर्वपृथ्वीनिराळीच आहे. अशी जर बागशील तर ह्या जगांत जें सुख आहे त्याचा लेश ही कधीं मिळणार नाहीं. एखादे दिवशीं मित्र गांवास जाईल, किंवा मरेल. ह्मणून का मित्र करूंच नये? पहा,जेव्हां पासून तुझा आणि हरणीचा समागम झाला तेव्हांपासून आज पावेतों सुखाचे दिवस किती गेले; आणि गमावल्यावर दुःख तर दोन किंवा तीन दिवस राहील; ह्यावरून सुखाचे दिवस फार व दुःखाचे थोडके, असें समजावें. ती हरणी चांगलीच होती; तिजवर तुझी प्रीत जडली ह्यांत आश्चर्य नाहीं; आणि आतां तिजविषयीं जर न हळहळलीस तर आश्चर्य.

गा — तर मग मी पाषाणहृदय असें होईल.

म० — मला एवढेंच बरें वाटलें, कीं ह्यासमयीं तुला दुःख सोसण्याची इतकी संवय झाली; पुढें ह्यापेक्षां अधिक प्रसंग प्राप्त झाला असतां पहिल्या संवईमुळें दुःख सोसणें अंमळ सोपें होईल. पर्वता प्रमाणें मनुष्यानें अचळ असावें. ह्यासाठीं तुला आतांपासून अभ्या-

स झाला हें उत्तमच आहे. जशी तुझी हरणी हरपली तशी ह्यासृष्टींतील आमचीही एखादी वस्तु हरपेल, ह्मणून काय खेदच करीत राहावें? पण तुह्मीं लक्ष्मणाशीं कटकट केली असें वाटतें.

गंगा — नाहींहो, नाहीं, रावजी, आह्मी तर त्याशीं नम्रतेनें गोडच बोललों, पण गोपाळानें बरीक ठाव घेतला.

राम० — त्याचें उत्तर त्यानें काय दिलें?

गंगा — उत्तर देण्यांत त्याचें पाणी मरत होतें, आणि विचारतांच खरकन् तोंड उतरलें. पण रावजी, मी तुह्मांला पुसतें, माझी यमनी घेऊन त्याच्यानें नाहीं ह्मणवेल बरें? असा धीट आहे काय तो? कसें दिसतें?

राम० — माझ्यानें स्पष्ट सांगवत नाहीं, पण दिसण्यांत येतें खरें. जर चोरली नसती तर त्याचें तोंड एकाएकीं उतरतें ना, आणि काळीज धडधड उडतें ना. आतां तुझ्या यमनीचा शोध लागण्याविषयीं शहरांत दवंडी पिटवितों.

गंगा — पण रावजी. लक्ष्मणानेंच चोरली आहे तर आपला शोध व्यर्थ होईल.

# लहानहरणी.

म॰ — असें कधीं होणार नाहीं. हरणी कांहीं केवळ सोनें रुपें नव्हे, तर ती पेटींत राहील; तिला चारा पाहिजे, पाणी पाहिजे, तिचे पाय मोकळे होण्या करितां अंमळ ती सोडली पाहिजे, ह्यामुळें ती कोणास पचणार नाहीं. ती त्याचे घरांत असली तर तिचा माग कोणाही भल्या माणसाचे द्वारें लागेल. त्याचे बापाचा कुत्सित स्वभाव मला पक्का ठाऊक आहे, ह्यासाठीं मी त्याजकडे जावयाचा नाहीं. माझ्या मुलाशीं तुमच्या मुलांनीं खेळूं नये, म्हणून एक दोन वेळ त्यानें मजशीं भांडण केलें होतें. बरें, अगोदर दंवडी पिटविल्यानें काय होतें हें तर पाहूं या.

गा — हरणी आणून दिली असतां कोणास बक्षीस देण्याची ताकत असती, तर मला ही हरणी सांपडण्याची आशा राहती.

म॰ — बक्षीस देण्याविषयीं मीच ताकीद फिरवितों. विनायका, चल माझे खोलींत, मी तिचे खुणखाणे विषयीं चिठ्ठी देतों ती कोतवाल चावडीवर जाऊन कोतवालास पोहोंचती करून ये.

गा — यमनीची आमची जर पुन्हा एकवेळ भेट होईल त-

र मग आमचे आनंदास पार नाहीं.

---

## अंक २

## प्रवेश १

### विनायक आणि गंगा.

विना०— ( अतिहर्षानें धांवत धांवत खोलींत येऊन ह्मण- तो.) गंगा ! गंगा !

गंगा— काय आहेरे, काय आहे ? रे तूं फारसा हर्षलास; वाटतें यमनी सांपडली.

विना०— नाहीं नाहीं, तिजपेक्षां फार सुंदर हजार हिश्शांनीं चांगली वस्तु सांपडली आहे.( डबींत ठेवलेली एक आंगठी दाखवितो.) ही पहा, मला आपले दरवाज्या जवळच सांपडली.

गंगा— वाहवा ! काय चांगली आंगठी आहे ! पण हिचा मधला खडा कुठे आहे, बरें ?

विना— तो पहिलाच निखळला आहे, हा पहा, ह्या काग- दाचे पुडींत गुंडाळलेला आहे. ( तो उजेडांत खडा ने- ऊन पाहतो.) अरे हा हिरा आहे, वाहवा काय मजेचा

लखलखतो आहे ! रावजींचा तर हिरा एवढा मोठा नाहीं.

गा — पण ज्या पुरुषाचा हा हिरा आज गमावला असेल त्याला किती खेद होत असेल! त्याची मला दया येती.

ना० — हरणी गमावण्यापेक्षां असा हिरा गमावणें फार वाईट.

गा — पण यमनी फार चांगली. मजवर किती तिची आवड असे, मीं लहानपणा पासून बाळगली, आणि दिवसें दिवस ती फार मोजेचे खेळ शिकली. यमनीपेक्षां का आंगठी चांगली? मोठ्या राजाची आंगठी असली तरी मला यमनीपेक्षां चांगली वाटणार नाहीं.

ना० — ह्या आंगठी पुढें तुझी हरणी काय आणली आहे. तशा हरण्या तर हजारों मिळतील ह्या आंगठीवर.

गा — अहा हा ! काय माझ्या हरणीची सर करील आंगठी ! त्वां जरी ही मला दिली तरी मी आपली यमनी देणार नाहीं. ज्याची ही आंगठी गमावली त्याजवळ अशीच दुसरी असेल. मज जवळ काय एकच यमनी, ह्मणून त्याच्यापेक्षां माझें दैव वाईट.

ना० — ताई, पण ही कोणा मातबराची असावी, नाहीं बरें?

गरिबा जवळ असली कुठची?

गंगा — होय, पण खडा निखळला म्हणून तो बसवावया करितां सोनाराकडे घेऊन जातांना कोणीं चाकरानें हीवाटेंत गमावली असावी, किंवा सोनारापासून पडली असावी, परंतु ज्याचे हातानें हरवली त्यास दुःखाचा डोंगर झाला असेल.

विना॰ — तर मग माझी आवड उडाली. आतां रावजींस झटकन कळवावें. वाहवा! रावजीच इकडे आले, बरें झालें.

---

## प्रवेश २

### रामराव, गंगा, आणि विनायक.

राम॰ — हरणीविषयीं एका प्रहरानंतर दवंडी फिरेल.

विना॰ — रावजी, मी आझून कोतवालाकडे गेलों नाहीं. (बापाचे हातांत ती डबी देऊन ह्मणतो.) ह्यामुळें मला जावयाला उशीर लागला.

राम॰ — हा हिरा खरा आहे, फार चांगला दिसतो.

विना॰ — (उड्या मारून ह्मणतो.) पाहिलेंना? ह्या हिऱ्यामुळें अंमळ हरणीचा विसर पडला ह्मणून काय आश्चर्य?

# लहानहरणी.

राम० — मुला, ही का तुझी आहे ह्मणून इतका हर्षानें उडतोस?

विना० — नाहीं, नाहीं, पण हिचा शोध जर कोणी नकरील तर मग काय चिंता आहे?

राम० — तुला डबी उचलतांना कोणी पाहिलें?

विना० — रावजी! कोणीं मला पाहिलें नाहीं.

गंगा — मला जर अशी वस्त सांपडती, तर ही ज्याची असेल त्याला मजपासून केव्हां मिळेल, व तेणेंकरून मी केव्हां आनंदित होईन. अशी चिंता म्यां ठेवली असती.

विना० — ह्यांत तूं काय अधिक सांगतोस? हिचे धन्यानें मजजवळ यावें ह्मणजे मीही तेव्हांच देऊन टाकीन. सांपडलेली वस्त लपविणें आणि चोरी करणें एकच आहे. ज्याचा माल त्यास द्यावा.

राम० — मग हा तुझा आनंद आणि ह्या उड्या राहतील सें वाटतें.

विना० — ही सांपडली तेव्हां माझें दैव फार चांगलें असें मनांत आलें होतें, पण ताईनें सांगितलें कीं, ज्याची गमावली त्याला फार दुःख झालें असेल, त्यावरून मी आनंदित नाहीं, मला वाईट वाटतें; ह्यासाठीं ज्याची त्यास दिली

ह्मणजे मला फार आनंद होईल, नाहीं तर दर खेपेस तिजकडे पाहून माझी नक्के ह्मणून मला लाज वाटेल.

गंगा — दुसऱ्याचें दुःख दूर करणें ह्यांत फार सुख आहे, ह्यासाठीं लक्ष्मण माझें उतरलेलें तोंड पाहून हरणीला ठेवील असें घडणार नाहीं.

राम० — (आनंदानें उभयतां मुलांचें चुंबन घेऊन ह्मणतो) हीं गुणाचीं मुलें ईश्वरानें मजवर कृपाळू होऊन दिलीं, आहा, ह्यांचे योगानें मी किती आनंदी आहें! धन्य मी, कीं मला असलीं मुलें. मुलांनो, अशी भूतदया सर्वकाळ मनांत असूं द्या बरें, ह्मणजे आपणांस व दुसऱ्यांस फार सुख होईल.

गंगा — रावजी, तुमचीच चाल आह्मांस लागेल, दुसरी लागावयाची नाहीं. जसे तुह्मी आहां तशींच आह्मी होऊं.

विना० — मी आतां ही सर्वांस दाखवितों, नाहीं तर, रावजी, शहरांत एकदांच दवंडी पिटवावी कीं, हरणी हरपली, व आंगठी सांपडली.

राम० — थांब, उगीच ऐस, युक्तीनेंच ज्याची त्यास पोहोंचती होई असें केलें पाहिजे; नाहींतर एखादा ठक येईल

# लहानहरणी.

आणि माझीच ह्मणून उपटून घेऊन जाईल.

विना० — मीही जशास तसा होऊन आंगठीच्या सर्व खुणा खाणा विचारून घेऊन मग देणें तर देईन; नाहींतर कधीं कोणास देणार नाहीं.

राम० — ही तुझी युक्ति कांहीं उपयोगाची नाहीं, कारण कीं, जर कोणी हिला मालकाचे हातांत पाहिलें असलें, तर तो सर्व खुणा खाणा देखील सांगेल, आणि घेऊन जाईल. मग मालक आला तर त्यास काय देशील?

गंगा — तूं आपलें शहाणपण मिरवूं नको, कसें करावयाचें तें तुजपेक्षां रावजीला अधिक ठाऊक आहे.

राम० — दमादमानें केलें पाहिजे, कांकीं एवढी किमतीची आंगठी गमावली आहे त्यापक्षीं तिचा धनी उगीच बसणार नाहीं, फारच शोध करील.

विना० — शोध करण्याची कल्पना त्याला नाहीं जर सुचली तर?

गंगा — आपण कसा हरणीचा शोध करितों? तसा ह्या आंगठीचा धनीही करील. तो शोध केल्यावांचून कसा राहील?

राम० — ह्याविषयीं मीच कायतो विचार करीन, तुह्मी उगीच असा; कोणाजवळ वर्तमान सांगूं मात्र नका.



# बाळमित्र.

## प्रवेश ३

### गंगा आणि विनायक.

विना० — एखादें वर्तमान लोकांस कळविण्याविषयीं फार चांगलें आहे, तें जर गुप्त ठेवण्याचा प्रसंग आला तर मोठें अवघड पडतें, ह्यासाठीं हें वर्तमान लोकांस कळवि- ल्यानें मला फार आनंद होईल.

गंगा — कशाचा आनंद? हिची तर कांहीं इच्छा तुला नाहींच, आणि जरी असली तरी तुला जिरणार नाहीं. रस्त्या- वर वस्त मिळाली ह्यांत मोठी प्रतिष्ठा ती काय?

विना० — तूं ह्मणतेस तें खरेंच, पण माझी ही एके हिशेबीं मसलत चांगली आहे.

गंगा — लोकांमध्यें ह्मण आहे कीं, बायकांचे पोटांत गोष्ट मावत नाहीं, पण आतां पाहूं बरें, ही गोष्ट दोघांतून को- णा जवळून फुटते ती!

विना० — मी रिकामा बसलों ह्मणजे माझें मन अशा गुप्त गोष्टींत फार घोळत असतें, ह्यामुळें एखादे वेळेस फटक- न् तोंडांतून उद्गार निघेल, ह्यासाठीं आतां मी यमनीचे शोधाकडे चित्त लावून कोतवालच्यावडीवर जातों.

## लहानहरणी.

गंगा — बरें तर आतां जा कसा लौकर. अरे, पण गोपाळा मातक्यान कां आला बरें?

---

### प्रवेश ४

#### गंगा, विनायक, आणि गोपाळा.

गोपा॰ — विनायका, तूं बाहेर कोणीकडे जातोस?

विना॰ — कांहीं घरचें काम आहे तिकडे जातों.

गोपा॰ — थांब, माझी एक गोष्ट ऐकून जा, ह्मणजे तुला असा हर्ष होईल कीं, हांसतां हांसतां तुझें पोट फुगेल.

विना॰ — बाबा, मला हांसायाला अवकाश नाहीं.

गोपा॰ — पण तूं एवढी गोष्ट ऐकतर खरी! अरे, आपला दावा साधला.

विना॰ — कशा विषयींचा दावा?

गोपा॰ — लख्यानें आपले बापाची आंगठी गमावली. अहाहा! भली मौज झाली.

(गंगा आणि विनायक एकमेकांकडे विस्मयानें पाहतात.)

गंगा — काय त्याचे बापाची आंगठी?

गोपा०— होय, मी खरेंच सांगतों. खडा पडला होता तो सोनाराकडे नेऊन बसवावया करितां ह्मणून आज सकाळींच लक्ष्मणाचे बापानें आंगठी त्याचे हवाली केली. ( विनायक गंगाचा पदर ओढितो, ती त्याला बोटानें दाबते. ) तो आपले एथें आला त्यावेळेस त्याचे खिशांत डबी होती, मग जेव्हां रागानें तणतणत बाहेर गेला तेव्हां ती खिशांतून निघून कोठें पडली कोणजाणे.

गंगा — आंगठी गमावल्यावर लक्ष्मण तुमचे दृष्टीस पडलाच असेल; त्याचें तोंड कसें दिसत होतें?

गोपा०— अगदीं भयाभीत होऊन उतरून गेलें होतें. जसे कोणी लाख पायपोस मारले.

गंगा — त्याचे बापाला हें कळलें आहे कीं नाहीं?

गोपा०— जेव्हां त्याचे बापानें त्यास विचारलें कीं, सोनारास आंगठी नेऊन दिली? तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं, होय बाबा, हा आतांच देऊन आलों. आंगठी हरवली हा एक त्याचा अन्याय आणि लबाडी बोलला हा दुसरा, ह्यामुळें तर फारच हिरमुसला.

गंगा — अरेरे, गरीब, पहा काय दैवगति ती!

# ल्हानहरणी.

गोपा० — तुह्मी इतकी त्यावर दया करितांना?

गंगा — असा समय कोणावर येऊं नये, बाबा, ह्मणून मला दया येती.

गोपा० — असल्यावर, हो, कश्ची दया! उलटी मी त्याची मौज तुह्मांपाशीं सांगतों ती ऐका.

गंगा — ह्यांत काय तुला चांगलें वाटतें?

गोपा० — वा; काय मौज सांगावी! तो आंगठी आंगठी करीत वेनागल्या सारख्या इकडून तिकडे तिकडून इकडे धांवतो आहे, आणि ज्यास त्यास विचारीत फिरतो आहे. भलें झालें ह्मणून मी मौज पाहावयास त्याचे मागें गेलों होतों. तो मला विचारूं लागला कीं, माझी आंगठी तुला सांपडली? तेव्हां मीही पाहिला डाव मनांत धरून उत्तर दिलें कीं, पहा आपली कुठें असेल तिथे, मला काय विचारतोस? त्वां आपल्या जामदारखान्याचें काम मजकडे सांगितलें आहे काय? मग तो वरमून बोलला कीं, तुला जर तिची किंमत ठाऊक असती तर असें कधीं बोलतासना; मग मी ह्मटलें, खरेंच, ज्यास सांपडली असेल त्याची धनच झाली असेल; तो केवढा दैववान्! त्याचा आनंद गगनांत मावत नसेल. मग तो बोलला, बरें, बाबा, काय ह्म-

णवील तें ह्मण, पण मला तर असा समय प्राप्त झाला, आतां माझा बाप मला काय ह्मणेल? तेव्हां मी उत्तर केलें कीं, बाप कांहीं ह्मणणार नाहीं, पण कोलदांडा आणि मिरच्यांचा धूर मात्र सिद्ध करील.

गंगा — अरे अरे, दुःखावर असा डाग द्यावयाचा नव्हता.

गोपा० — कां नव्हता? त्याला बरी त्यावेळेस तुमची दया आली नाहीं?

विना० — अरे, आपणाशीं कोणी कपटबुद्धीनें वर्तला ह्मणून आपणही त्याशी तसें वर्तावें, हें चांगलें नाहीं.

गोपा० — मी जशास तसा, काय सांगू? माझे हातीं जर आंगठी लागली असती तर आपला दावा त्याचेच बापाचे हातून उगवून घेतला असता, कद्धीं भेद कळू दिला नसता.

गंगा — काय तूं तिला चोरून ठेवतास?

गोपा० — नाहीं नाहीं, बापानें त्यास खूप चांगली शिक्षा केल्यावर मग त्याचे हवालीं करतों.

विना० — गोपाळा, बराच आहेस किरे! तूं असा आंतल्या गांठीचा आहेस हें मला अझून ठाऊक नव्हतें.

गंगा — मलाही ठाऊक नव्हतें, आणि जरी तूं असें बोलती-

स तरी मला खरें वाटत नाहीं. जर खरें आहे तर तुझ्याच तोंडानें न्याय झाला, आमचे यमनीचे वेळेस त्वां उगीच तोंड उतरल्याचें सोंग घेतलेंसें दिसतें.

गोपा० — अंतःकरणांत खोंचल्यावांचून सोंगानें कुठे असें होतें काय? अहो जे मजशीं भले त्याजवर मी फार प्रीति करतों, आणि मजशीं जे वांकडे त्यांशीं तर मी फारच वांकडा. हा इकडे लक्ष्मण आला पहा.

---

## प्रवेश ५.

### गोपाळ, लक्ष्मण आणि विनायक.

गोपा० — ( लक्ष्मणाकडे हात करून ह्मणतो.) यावें लक्ष्मणराव, यावें.

लक्ष्म० — मी तुमचे पायां पडतों, आतां मला उगीच छळूं नका; मी दुष्ट खरा, आणि प्रारब्धानेंही मजवर घोरपड आणली; ह्यामुळें मी अगदीं मरून चूर झालों आहें.

विना० — आंगठी हरवल्याची दंवडी पिटविली का?

लक्ष्म० - दंवडी कशाची, आतां हें काळें तोंड घेऊन बापा-

कडे काय जाऊं. हा जीव किडा मुंगी नव्हे, तर रगडून टाकूं आतां काय करूं?

गोपा०— पैज मारतों कीं, आंगठी हरणीचे पायीं अडकली, आतां त्या दोघींचा थांग एकदांच लागल.

लक्ष्म०— बरें बाबा, तुमची थट्टा सोसावी हातर माझा खुराकच, पण देवानें मागें घेतलें, काय करूं?

विना०— तूं घाबरा होऊं नको, तुझी आंगठी येथेंच आहे.

लक्ष्म०— खरेंच काय? माझी आंगठी तुमचे पाशीं आहे? अहाहा फार बरें झालें.

गोपा०— (गंगास एकीकडे नेऊन ह्मणतो.) पहा कसा विनायक त्याची थट्टाकरून त्यास चाळवितो आहे तो, ठीक आहे.

लक्ष्म०— खरेंच काय हो, असें आहे? वाहवा! — नाहीं पण आतां माझी दुष्ट वर्तणूक कशी आहे ती अगोदर कळवितों. (लक्ष्मण हर्षानें बाहेर जातो.)



# लहानहरणी.

## प्रवेश ६

### गंगा, विनायक, आणि गोपाळा.

गंगा— तो बाहेर निघून गेला ह्याचें कारण काय?

विना०— गरीब बिचारा, भांबावला असेल.

गोपा०— थट्टेचा निकर होईल. आतां तो आपले बापास येऊन येईल पहा, मग तुह्मी त्याला आंगठी कोठून द्याल?

विना०— तर मी काय त्याची आंगठी चोरून ठेवीन असें तुला वाटलें?

गोपा०— तर खरेंच कीं काय तुजजवळ आंगठी आहे?

विना०— हें रे काय? जर नसती तर मी आहे ह्मणून उगीच खोटें कशासाठीं बोलतों? ती तर मला आपले दरवाज्या पुढें सांपडली, तेव्हां मी उचलून घरांत आणली.

गोपा०— काय बेट्याचें प्रारब्ध पहा! असो, पण तुह्मी तरी त्याकडून पुष्कळ खडे खाववून मग आहे ह्मणून सांगावयाचें होतें.

गंगा— गोपाळा, पाहिलेंना, माझ्या भावाचें हृदय कसें लोण्या सारखें पाघळतें तें? आणि तुझें तर कठीण, ह्मणून आमची मैत्री तुजशीं कमी होऊं लागली.

# बाळमित्र.

## प्रवेश ७

### रामराव, गंगा, विनायक आणि गोपाळा.

राम० — (आपले खोलींतून बाहेर येऊन ह्मणतो, लक्ष्मणाला काय झालें रे? म्यां खिडकींतून पाहिलें तो तो रडत रडत इकडे तुह्मांकडेसच आला.

गंगा — बापडें पोर मेल्या सारखें हो झालें.

विना० — रावजी, मला जी आंगठी सांपडली कीं नाहीं, ती त्याचे बापाची; ती त्यानेंच गमावली, ह्मणून रडत होता.

राम० — आमची हरणी छपवून ठेवून आह्मांकडे आंगठी मागावयास आलास, तूं दगलबाज आहेस, असें तुह्मीं त्यास बोलण्यांत दर्शविलें कीं नाहीं?

गोपा० — नाहीं रावजी, विनायकानें यमनीचें नांव देखील काढलें नाहीं.

राम० — हरणीस परत आणून घेतल्यावांचून आंगठीचा थांग लागूं देऊं नका.

विना० — असें माझे मनांत नाहीं, कांकीं जेव्हां तो अगदीं गायाबाया करूं लागला तेव्हां मला भारी दया आली, आणि मीं सांगितलें.

# लहानहरणी.

गंगा— यमनी विषयीं माझे पोटांत ममता व तिच्या वियोगाचें दुःख फारच, पण लक्षुमणाची ती अवस्था जेव्हां पाहिली तेव्हां माझें दुःख त्याचे दुःखाचे पाडास देखील पुरणार नाहीं, असें वाटलें.

राम०— बरें बरें, तुह्मी दोघांनीं फार चांगली बुद्धि केली त्याला तुह्मीं सांगितलें येणेंकरून तुमचा सरळभाव दिसून आला, आणि मीही सुसंततिमान् असा झालों. जो शत्रू आपले हातांत आला त्यास पीडा देणें हें नीचलोकांचें काम, हें खरें आहे. बरें लक्ष्मण निघून गेला, त्यानें अगोदर कां आंगठी मागितली नाहीं.

विना०— त्याला मी आंगठी आहे असें सांगतांच असा त्यास आनंद झाला, कीं मी काय करतों व कोठें जातों ह्याचें भान देखील त्यास राहिलें नाहीं.

गंगा — तो वेड्या सारखा दाराकडे धांवत धांवत जाऊन न विचारतां बाहेर निघून गेला.

विना०— रावजी, तुह्मी ताईवर आणि मजवर संतुष्ट आहां ह्मणून मला फार बरें वाटतें.

राम०— अशा सत्वभावानें वर्तल्यावर मला संतोष कां होणार नाहीं?

# बाळमित्र.

विना०— पण तुह्मीं आह्मांस ताकीद केली होती कीं,—

राम०— होय, आंगठी विषयीं गफलतीनें कोणापाशीं बोलूनका ह्मणून ताकीद केली होती खरी, पण मालक आल्यावर त्यास न सांगतां ठेवावी असें सांगितलें नव्हतें. तुह्मी केलें तें नीटच केलें.

---

## प्रवेश ८

रामराव, गंगा, विनायक, गोपाळा, आणि लक्ष्मण.

(लक्ष्मण हरणीस घेऊन आंत येतो, तिला पाहतांच गंगा धांवून जाते आणि हरणीस उचलून तिचे मुके घेते.)

गंगा —अहागे माझे लाडके यमने, तूं माझी फार आवडती, मला टाकून कुठेंगे गेली होतीस? अगे लबाडे.

लक्ष्म०—पहा मी किती दुष्टाचरणी आहें तो ! तुह्मीतर केवळ धर्मराज; तुमच्या मनांत कपटाचा लेशही नाहीं; मी कपटी मैंद, माझ्या ह्या वर्तणुकेची क्षमा तुह्मांकडून कशी होईल? (रामरावजीकडे पाहून ह्मणतो) मी तुह्मांला कसा अधम दुष्ट दिसत असेन!

राम० —जो कोणी आपले दोष आपल्या मुखानें तुजप्रमाणें

# लहानहरणी.

कबूल करून क्षमा मागून घेण्याविषयीं यत्न करितो तो मनुष्य वाईट नव्हे. कांहीं चिंता नाहीं; ही घे तुझे बापाची अंगठी.

लक्ष्म॰ —— ही गोष्ट किती चांगली ह्मणून वाणूं? मी तर अभिलाषबुद्धीनें ह्यांच्या हरणीवर हात घातला, परंतु तद्विषयीं ह्यांच्या मनांत कांहीं एक नाहीं, येण करून मलाही पश्चात्ताप झाला; ह्यांच्या आणि माझ्यामध्यें फारच अंतर; हे अतिउत्तम, मी अतिनीच.

गंगा —— लक्ष्मणा त्वां आमची यमनी उगीच थट्टेनें ठेवली असेल; आज संध्याकाळीं तूं हिला परत आणून देणार होतास असें वाटतें.

लक्ष्म॰ —— मी इतका सत्य भावाचा नव्हे, ही चोरून नेऊन तळघरांत लपवून ठेविली होती.

राम॰ —— असून तरीं तुला अनुभव आला ह्मणजे पुरे कीं, दुष्ट चालीनें वर्तलें असतां ईश्वर आणि आपले सोयरे धायरे भाऊबंद वगैरे सर्व छी थू करितात, व दूषण ठेवितात, बाबा, मासलेह कर्म कधीं गुप्त राहत नाहीं, वेळ भरली ह्मणजे आपाप बाहेर येतें. पापपुण्याचा झाडा हातच्या हातीं द्यावा घ्यावा लागतो. पहा माझी मुलें कशीं सुना

लीनें वर्ततात तीं ! ह्यामुळें माझा जीव डोंगरा एवढा हो तो. अनुपकाऱ्यावर उपकार करणें ही साधूची रीति, ह्या पेक्षां दुसरें कांहींच मोठें पुण्य नाहीं.

लक्ष्म०—— ह्या गोष्टीचा तर म्यां पक्का अनुभव घेतला. कां गंगाबाई, अहो विनायकराव, आतां माझ्या अपराधा ची क्षमा करा.

विना०—— (लक्ष्मणाचा हात धरून ह्मणतो.) आतां आम चे मनांत काडीमात्र राग नाहीं, हें मनापासून सांगतों.

गंगा —— माझी यमनी मला सांपडली, आतां जें झालें तें आमचे स्मरणांत देखील नाहीं.

लक्ष्म०—— गोपाळा व मी अझून देखील अशी योग्य चाल न धरूं तर मग कावळ्यापुढें मोत्यां पोंवळ्यांचा चारा घातला असें होईल.

गोपा०—— जशी तुला लाज वाटती तशी मला ही वाटती, पण माझे मनांत हा उपदेश पक्केपणीं ठसला आहे.

लक्ष्म०——मी आतांच बापाजवळ जाऊन अंगठीचें वर्तमा न त्यास सांगूं लागलों तों त्यास मनस्वी राग आला. पण इत क्यांत तुह्मी जी कृपा केली ती ऐकवितांच त्याचें अंतःकरण फार पाघळलें, आणि त्यानें तुह्मांस सांगूं सांगितलें आ

# लहानहरणी.

हे कीं, तुमचे उपकारानें मी फार संतुष्ट व आभारी होऊन राहिलों आहें. त्यास आपल्या इच्छानुरूप एकदां भेट घ्यावयास येईन, व कांहीं भेटीचे पदार्थ तुह्मां करितां घेऊन येईन, ह्याविषयीं मला फार उत्कंठा लागली आहे, ह्मणून त्यांस विचारून ये.

राम०——माझे मुलांचे मनांत तुह्मी उत्तमरीतीनें वागावें तेणें करून जसें सुख होईल तसें तुमचे नजरनजराण्यानें होणार नाहीं, त्याचें कांहीं कारण नाहीं. ज्याची वस्तु त्यास दिली ह्यांत आश्चर्य काय? व तो उपकार कशाचा?

विना०——तुमचा आह्मी जन्माचा स्नेह मिळविला हाच आमचा नजराणा, बरें लक्ष्मणराव.

लक्ष्म०——तुह्मी मला स्नेही ह्मणाल तर ह्मणा, परंतु तुमचा स्नेही ह्मणवाया जोगी योग्यता माझे अंगीं येण्यास फार यत्न करावा लागेल.

गोपा०——मलाही तुह्मी आपले मैत्री बाहेर टाकूं नका. मी लक्ष्मणापेक्षां कांहीं चांगला वागलों असें नाहीं; पण सूड उगवावयाचा झाला तर दुसऱ्यावर उपकार करून त्यास लाजवावें; घातबुद्धीनें उगवूं नये, अशी माझी बुद्धि झाली.

# बाळमित्र.

गंगा —— (हरणीची पाठ थापटून ह्मणते) अहा, लहान गे लबाडे, त्वां आपल्या धन्यापासून इतःपर पळून जाऊं नये ह्मणून तुला चांगली अद्दल घडली; सारी रात्र उपाशीं मेलीस, पुन्हा जर अशी जाशील तर पहा ह्याहीपेक्षां तुझी अधिक विपत्ति होईल, तूं येथें कशीही असशील तरी माझी प्रीति तुजवर अखंड राहील असा माझा निश्चय आहे.

---

## कोंबडी.

### गोविंदराव व त्याचा मूल रामचंद्र.

गोविंदराव हा फार दयाळू होता. व त्याची अतिशय ममता पुत्रावर असे, ह्मणून रामचंद्र फार दैववान्, कीं असा बाप ज्यास देवानें दिला. रामचंद्र आपले मनांत असें ह्मणत असे कीं, मी उत्तमगुण शिकलों ह्मणजे शिकण्याचे श्रमाबद्दल मला बाप कंठी चोकडा अशी कांहीं देनगी देईल; अशी त्याची पक्की खातरी होती, तरी त्याची आवड बागाकडे फार असे. तो आठ वर्षांचा झाला तेव्हां बागांत कांहीं फुलझाडें लावूं लागला; हा त्याचा छंद पाहून त्याचा बाप त्यास जें आवडतें तेंच द्यावें

# कोंबडी.

ह्याविषयीं विचार करूं लागला.

एके दिवशीं उभयतां, पितापुत्र, भोजन करावयास बसले होते तेवेळेस गोविंदराव ह्मणतो, रामचंद्रा, पंतोजीनें मला सांगितलें आहे कीं, आज तुमच्या रामचंद्रानें मराठी बखर वाचावयास प्रारंभ केला आहे; त्यासही आजपासून आठा दिवसांत सर्व वाचून त्यांतील ज्या गोष्टी मी विचारीन त्या त्वां तोंडानें सांगितल्या ह्मणजे मी तुला असें कांहीं उत्कृष्ट बक्षीस देईन,कीं जें तुझ्या ध्यानांत आतां कांहींच येणार नाहीं.

हें बापाचें सांगणें क्षणभर नविसरतां त्यारामचंद्रानें बक्षीस मिळवावयासाठीं रात्रदिवस वाचण्याचा अतिशय श्रम मांडला.

तो परीक्षेचे दिवसाची वाट निर्भयपणानें पहात होता; मग उत्तम प्रकारानें बखर वाचून तींतील सारांश, मराठी लोक कसकसे योग्यतेस चढले, हें सांगून, त्यांनीं कोण कोणते मुलूख हस्तगत केले तें सर्व त्यानें पृथ्वीचे नकाशावरून नचुकतां आपले बापास दाखविलें. तेव्हां गोविंदराव हर्षयुक्त होऊन त्याला पोटाशीं धरून बोलिला कीं, त्वां मला आज आनंदमय केलें; तर चल माझे बरोबर, आतां मी तुला आनंदमय करितों पहा!

असें बोलून त्यानें त्यास जवळचे बागांत नेलें, आणि एक रिकामी जागा पडली होती ती त्यास दाखवून सांगितलें कीं, आजपासून ही जागा तुझी; ह्या जागेचे तूं दोन भाग कर, एकांत फुलझाडें लाव, व एकांत भाजीपाला किंवा जें तुला पाहिजे तें लाव. असें सांगून त्यानें त्यास माळ्याचे कोपींत नेलें, आणि मुला जोगीं जीं जीं लहान लहान कुदळ, खोरें, खुरपें, इत्यादि हत्यारें होतीं तीं दिलीं, व लहान लहान पांच्या व फुलाझाडांची कलमें, हुंड्या, व बियांच्या पिशव्या संदुकींत होत्या त्या काढून दिल्या, आणि प्रत्येक पिशवीवर बिजांचीं नावें, व कोणते वेळेस कोणतें पेरावें ह्मणजे कसें येईल, हें लिहिलें होतें तें सर्व दाखवून दिलें; तेसमयीं त्यास पराकाष्ठेचा आनंद झाला. जसा राष्ट्राच्या प्राप्तीनें राजास आनंद होतो, तसा त्यास त्या जमिनीचे तुकड्यानें झाला. तो आनंद त्याच्या वयाचीं मुलें जाणतील.

रामचंद्रास पंतोजीनें खेळावया करितां ह्मणून जो वेळ दिला होता तो त्यानें पहिल्या प्रमाणें रिकामा जाऊं न देतां आपले बागाचे कामाकडे योजिला.

एके दिवशीं रामचंद्र विसरभोळेपणानें बागाचा झोंपा न लावितां घरांत गेला असतां, तेथें जवळच एक कोंबडी दाणे शोधीत होती ती रामचंद्राचे बागांत गेली, आणि रामचंद्रानें नु

# कोंबडी.

कतेंच फुलझाडांस खत घातलें होतें तेथें उत्तम प्रकारचे जीवजंतु मिळतील ह्मणून मोठ्या हर्षानें ती जाऊन चोंचेनें व पायांनीं माती उकरूं लागली, व तेथेंच रामचंद्रानें दवण्याचें बीं टाकलें होतें त्या ठिकाणीं तर तिनें फारच उकरून नाश केला.

रामचंद्र परतून बागाकडे आला तेव्हां दरवाजा उघडा आहे, व बागांत कोंबडी जशी कांहीं माळीण चमत्कारिक काम करते आहे, हें पाहतांच त्याला अतिशय क्रोध आला, आणि मोठ्या स्वरानें ह्मणतो, हा ! दुष्टे, किती नाश केला रांडेनें, थांब तुझें आतां काम काढितों. असें ह्मणून कोंबडीस जावयास वाट न मिळावी ह्मणून बागाचें दार बंद केलें, आणि दगड, धोंडे, ढेंकूळ, इत्यादि जें हातीं सांपडलें तें घेऊन तिचे पाठीमागें लागून तिला मारूं लागला.

कोंबडी भयाभीत होऊन तिच्यानें होई तितकें करून इकडे तिकडे पळून, भिंतीवरून उडून जाण्याचा यत्न करूं लागली; परंतु तिची उडी भिंतीवर न जातां पुन्हा रामचंद्राचे फुलझाडांवरच ती पडे. असें होतां होतां एके ठिकाणीं गुलाबाची पन्हेरी केली होती तींत तिचे पाय व पंख गुंतून ती अडकली, तेव्हां रामचंद्रास वाटलें कीं, आतां कोंबडी सांपडली, ह्मणून तिला धरावयासाठीं गेला, तों पाचेच्या वाफ्यांचे वरंबे नवेच बांधले होते त्यांवर पाय कसा द्यावा हें रागाचे भिरीरींत ध्यानांत

# बाळमित्र.

न आणितां पाय देऊन ते त्यानेंच तुडवून टाकिले.

कोंबडी आपला शत्रु आला असें पाहून घाबरी झाली, आणि पुन्हा भिंतीवर उडावयास यत्न करूं लागली, तथापि तिची उडी भिंतीचे माथ्यावर गेली नाहीं, परंतु उडते समयीं पंखाच्या फडाक्यानें जवळचा दवणा मात्र मोडला.

असा नाश झाला तो पाहतांच त्यानें हातांत पावडें घेऊन रागें रागें मोठ्या जोरानें तिच्या आंगावर फेंकलें, परंतु तें तिला नलागतां चक्रासारखें उडून खिडकीवर पडलें, तेणें करून त्या खिडकीचीं दोन भिंगें फुटलीं आणि पावडें दगडावर आपटून मोडलें. हें नुकसान होतांच रामचंद्र कुदळ आणावयास धांवला, तों तिकडे कोंबडी अगदी दमून एके ठिकाणीं कोंपऱ्यास जाऊन बसली. कदाचित् तो कुदळ आणता तर त्या बापडीचीं वर्षे भरलीं असतीं.

परंतु इतक्यामध्यें तो गलबला एकून गोविंदराव धांवत आला. रामचंद्र आपल्या बापास पाहतांच गलबलून उभा राहिला; पण तोंडावाटें अशीं अक्षरें निघालीं कीं, पहा, तात्या, ही कशी द्वाड जात, हीनें माझे बागांत किती खराबी केली ती!

# कोंबडी.

गोविंदरावानें त्याचे बोलण्याची अनास्था केल्यासारिखें क-रून उत्तर दिलें कीं, जर त्वां दार उघडें ठेविलें असतें तर ही ख-राबी कशानें झाली असती? ती तर कोंबडी, अज्ञानच, तुझा ना-श होईल हें ज्ञान तिला आहे कीं काय? असें असतां त्या गरिबा वर दांडगाईनें त्वां आपलें सर्व बळ योजिलें, तुला लाज कशीरे वा-टली नाहीं? तिच्या आंगीं विचार आहे कीं काय? तुझ्या नुकसा नीसाठीं तिनें फुलझाडें उपटलीं असें नाहीं, आपल्या आहारा करितां मात्र.

ती आपला आहार शोधीत असतां जर तिनें गवताचीं मुळें उकरलीं असतीं तर तुला इतका राग येता? तिचे गांवीं गवत आणि फुलझाडें दोन्हीं सारखींच. तूं युक्तीनें काम करता स तर इतका नाश कां होता? पाहतां अंतीं दोष तुजकडेसच. जर तिला हळूच बाहेर हांकून लावलें असतें तर माझ्या खिड कीचा व पावड्याचा नाश झाला नसता; दोन तीन झाडांचीच काय खराबी झाली असती ती असती.

आतां तिचे वांटची तुलाच शिक्षा करावी हें योग्य. जर आतां ह्या झाडाची एक चांगली छडी काढून, जसें तूं कोंबडी चें पारिपत्य करीत होतास तसें मी तुझें केलें तर कसें? परंतु सर्वांस राग आटोपायाचें सामर्थ्य आहे, ह्याचे खरेपणाची खा

त्री तुला करून दाखवितों. जरी मला राग आला आहे तरी मी आतां तुला मारीत नाहीं, परंतु तुझ्या रागामुळें जो माझे खिडकीचा नाश झाला तो मी सोसणार नाहीं. तर इतकेंच क-रीन कीं, तुझ्या खाऊच्या पैशांतून खिडकी नीट करावया पुरते काढून घेईन.

असें बापाचें बोलणें ऐकतांच रामचंद्रा खजील होऊन तेथून निघून गेला, आणि ते दिवशीं पुनः बापापुढें तोंड दाख विण्याचें त्यास धैर्य राहिलें नाहीं.

दुसरे दिवशीं गोविंदरावानें रामचंद्रास ह्मटलें कीं, तुझा संतोष असला तर मजबरोबर बागांत फिरावयास ये. नंतर रामचंद्र बापा संगतीं बागांत गेला, परंतु आदले दिवशींच्या अन्यायाची जी दिलगिरी त्याचे मनांत होती ती त्यास लपवितां आली नाहीं. बापानें त्याची ती मुद्रा पाहून विस्मयानें विचारलें कीं, मुला, तूं असा खिन्न कां दिसतोस? तुला खेद होण्याचें का रण काय?

राम० — मी खिन्न आहें ह्यांत आश्चर्य काय? गेले महिन्या पासून आपले खाऊचे पैसे, एक दमडी न खर्चितां म्यां जमा करून ठेविले, आणि मनांत योजिलें कीं, हे दहा रु पये जमले आहेत ह्यांची बयाला चांगली साडी भाऊबि-

# कोंबडी.

जेचे दिवशीं घेईन, परंतु आतां अर्धे अधिक रुपये तुमचे खिडकीकडे खर्च होतील, मग तें कशानें घडणार!

गोविंद० — बहिणीस भाऊबिजे बद्दल साडी देणार होतास ह्मणून तुला आनंद होता खरा, परंतु अगोदर खिडकीच नीट केली पाहिजे, कां कीं रागाच्या योगानें नाश फार होत असतो, म्हणून राग आटोपला पाहिजे; ह्यासाठीं ही शिक्षा तुझ्या अनुभवास आली ह्मणजे पुनः असा रागास येणार नाहींस.

राम० — तात्या, मी आजपासून बागाचा झोपा कद्दीं उघडा ठेवणार नाहीं; जरी कदाचित् मी चुकलों तरी कोंबडीचें पारिपत्य करणार नाहीं.

गोविंद० — काय? ह्या पृथ्वींत कोंबडीच का एवढी तुझा अपराध करणारी आहे. दुसऱ्या कोणास तुझा नाश करितां येणार नाहीं कीं काय?

राम० — नाहीं नाहीं, तात्या, एकदां मी पृथ्वीच्या नकाश्याचा पट बसकरावर पसरून बाहेर गेलों, तों इतक्यांत माझी धाकटी बहीण खोलींत आली, आणि तिनें दोतींत लेखणी बुचकळून त्या नकाश्यावर विरखुड्या ओढल्या. आतां त्यांत गुजराथ कोठें, बंगाला कोठें, हें कांहींच समजत

नाहीं काय करावें?

गोविंद॰— तर दुसऱ्याकडून आपणास असा अनर्थ न व्हावा, ह्याविषयीं प्रथमच बंदोबस्त राखावा कीं नाहीं?

राम॰— होय, तात्या.

गोविंद॰— तुला जिवाचा कंटाळा यावा ह्मणून मी सांगत नाहीं, पण तुला समजावयासाठीं सांगतों कीं, कोंबडीनें जो तुझा नाश केला त्यापेक्षां अधिक अनर्थकारक गोष्टी ह्या आयुष्यांत तुला पुष्कळ भोगावयास पडतील. जसें कोंबडी तुझा नाश होईल हें मनांत न आणितां किडे वेंचावयास लागली, तसें लोक तुझें हित किंवा अहित हें मनांत न आणितां आपलेंच सुख पाहतील.

राम॰— धाकटे बहिणीचे कृत्यावरून पाहतां मला असें वाटतें कीं, बिरखुड्या ओढण्यांत तर तिला सुख थोडेंच झालें असेल, परंतु तिनें तितक्याच सुखासाठीं माझे परम उपयोगी नकाश्याचा नाश केला.

गोविंद॰— तुला बाहेर जावयाचें होतें तर अगोदर त्यापटाची घडी करून ठेवावी कीं नाहीं?

राम॰— होय, करून ठेवावयाची होती खरी.

गोविंद॰— तर आतां आजपासून सावधपणें असें रहावें

# कोंबडी.

कीं, लोकांपासून आपला कांहींच नाश न होई. कदाचित् दैवयोगानें झाला तर मूळचा झालेला नाश अधिक न होऊं देतां युक्तीनेंच तेवढा सोसला पाहिजे.

राम० — पण कसा सोसावा?

गोविंद० — थोडकाच असला तर कांहीं काळजी करावी नलगे. फार असला तर धैर्य धरून सोसावा. ह्याविषयींचा अनुभव, येथें तूंनि मीच आहों, कांहीं चिंता नाहीं, ह्मणून सांगतों. भिंवरावाशीं कोणत्या रीतीनें मी वागलों ती रीत तुला सांगतों, ऐक.

राम० — नात्या त्याचें तर नांव घेऊं नका. आज दोनवर्षें रस्त्यांत त्याची तुमची गांठ पडली असतांही कधीं तो तुह्मांकडे पाहात देखील नाहीं. उलटी लोकांत तुमची अप्रतिष्ठा व्हावी ह्मणून टीका बरीक करीत बसतो.

गोविंद० — तो मजशीं असा कां वागतो हें तुला कांहीं माहीत आहे?

राम० — नाहीं नात्या, आणि कसें ह्मणून विचारण्याचें ही अझून मला धैर्य नाहीं.

गोविंद० — त्याला माझा द्वेष करण्याचें कारण मिळून इतकेंच कीं, चिटनविशीची आसामी आमचे तीर्थरूपांकडे पस्ती-

स वर्षें होती, त्यालिहिण्यांत मला तीर्थरूपांनीं फार हुशा-र केलें, ह्मणून ती जागा मला मिळाली. त्याकाळीं भिंवराव हा संभावित गृहस्थाचा मूल एवढा मोठेपणा मात्र त्याचे आंगीं होता, वरकड दुसरा एकही गुण सांगावया जोगा नव्हता. त्याचे जितके वशीले होते तितक्यांनींही त्या विषयीं यत्न बहुत केला, परंतु सरकारानें पुरती चौकशी करून मलाच काम सांगितलें, ह्यामुळें आह्मांवर त्याची एवढी कृपा आहे.

राम॰ — तात्या, मी तुमचे एवढा जर असतों तर मग त्यास दाखवितों.

गोविंद॰ — असें नाहीं, मुला, त्याचेच मर्जी प्रमाणें त्यास चह्राडी सांगण्याची वगैरे सदरपरवानगी दिली आहे. कोंबडीनें तुझा नाश केला त्यावेळेस तुला जसें वागावयास योग्य होतें त्या प्रकारें मी वागतों; तुझी दवण्याचीं झाडें किड्यां करितां जशीं कोंबडीनें उपटलीं, तसें माझी प्रतिष्ठा हाच दवणा त्याला तो मनांतील स्पर्धेस्तव उपटतो. आतां जर मी त्याचा सूड घेण्या करितां झटेन, तर जसें त्वां आपल्याच पायांनीं आपले गाचेचें रोप तुडविलें, तशी मी आपल्याच हातानें आपली प्रतिष्ठा क्षीण करीन. लवक-

# कोंबडी.

र पारिपत्य होण्याबद्दल जसा गवड्याचा व खिडकी-
चा नाश झाला, तसा माझ्या सुखाचा व द्रव्याचा नाश
होईल. आतां तूं नाशाविस्मरण धरून बागाचा झोंपा कोंब-
डीचें आंत जाणें न होण्या करितां जसा लावशील, तसा
मी आपला सुस्वभाव त्याच्या कुस्वभावाच्या लहरी मज-
वर नयाव्या ह्मणून मध्यें आडकरीन. मग जशी कोंब-
डी झोंप्या जवळ जाऊन चोंचा मारमारून आपणाला
मात्र दुखापत करून घेईल, त्या प्रमाणें हा शत्रू माझे
गंभीरपणाजवळ निंदा करतां करतां कंटाळून पश्चा
ताप पावेल. जर मी रागावलों तर लोकांचे दिसण्यां
त मी केवळ ओत्सा असें येईल, ह्मणून त्यानें केलेली
निंदा मी तुच्छ मानितों, तेणें करून माझी प्रतिष्ठा नशी
च राहून त्याचीच अप्रतिष्ठा होते.

राम० — आहा ! तात्या, तुमचे सांगण्या प्रमाणें जर मी वा
गेन तर मीही दुःखांतून असाच पार पडेन.

इतकें भाषण झाल्या नंतर उभयतां पितापुत्र घरीं गेले.
बापानें जो उपदेश केला तो रामचंद्राचे मनांत पक्का ठसला. पु-
त्रास हितोपदेश केल्यानें पुत्र तदनुरूप चालला असतां बापास
जें सुख होतें, तें गोविंदरावानें अनुभविलें.

# बाळमित्र.

## दुखणाइतसरदार.

### नाटक एक अंकी.

#### पात्रें,

| | |
|---|---|
| शिवाजी - - - - - - | सरपागे. |
| नान्हाजी, - - - - - - | सरपाग्यांचामित्र. |
| जगदीशराव, - - - - - | मोठा मानकरीसरदार |
| भिमाबाई, - - - - - - | मानकऱ्याची स्त्री. |
| गणपतराव, हिराबाई, यमुना, - - - - - | मानकऱ्याचीं मुलें. |

#### स्थळ.

मानकऱ्याचे घराचजवळची आंबराई.

#### प्रवेश १

गणपतराव आणि हिराबाई.

( हिराबाई जवळ अंब्यांच्या पाडांनीं भरलेली टोपली आहे.

# दुखणाईतसरदार.

(गणपतराव आपली टोपली भरलेली तिजकडे नेतो.)

गण० — कायसांगूं, ताई! वारातर खूप चालला आहे, आतां पुष्कळ पाड सांपडतील, मग मिळणार नाहींत, मीं आणले हे घे, ठेव, लवकर घे, ताई.

हिरा० — बाबाबा! शर्थ केली, तुझी तर चुळबुळच भारी, पाड कोठें ठेवावे हें देखील मला सुचूं देत नाहींस.

गण० — यमनी टोपल्या आणावयाला गेली तिला फारवेळ झाला आहे, ती आतां येईल, तंवर तूं आपल्या साडीचे पदरांत कां ठेवीसना?

हिरा० — वाहवारे! बरेंच सांगतोस, ह्मणजे माझी साडी चिकानें भरावी, आणि आईनें मला रागें भरावें, असें तुझ्या मनांत आहे वाटतें? तुझी टोपली माझे टोपलीहून मोठी आहे, ह्यासाठीं माझे पाड तूं आपल्या टोपलींत घाल, आणि माझी टोपली तूं घेऊन जा, मी येथें राखण करीत बसतें.

गण० — बरें तर, आतां मी पाड जमा करावयास जातों, तंवर यमनीही येईल.

हिरा० — हो हो, आण जा, मग अवघे पाड एके ठिकाणीं करूं, ह्मणजे पुष्कळ दिसतील.

गण०—— यमनीची टोपली व आपल्या टोपल्या भरल्या म्हणजे बाकी पाड राहतील ते आपण येथेंच खाऊन जाऊं.

हिरा०— छि,नको, येथेंच खाऊं नयेत, यंदा आपण बाबा बरोबर पाड खाऊं,पुढें बाबा संगतीं आपणाला कधीं मिळतील कोण जाणे. आतां बाबा लढाईस जाणार आहे,कोण जाणे काय होईल नि काय नाहीं.

गण०—— काय, अवघेच का लोक लढाईंत मरतात, म्हणून तूं असें बोलतीस ?

हिरा०— लढाईचें काम फार कठीण आहे. लढणारे लोक फारच निर्दय असतात, तुह्मी आह्मी जशी परस्पर एकमेकांवर ममता करितों तशी ते करिते तर मग काय पाहिजे होतें ?

गण०—— खरें म्हणतेस, आपण काय थोडक्याशा कळीवरून भांडत नाहीं ? मी म्हणतों कीं त्वां कळ काढली, तूं म्हणतेस कीं मीं काढली, पण आपणांतून कोणाकडे अपराध, हें सांगावयाला फार कठीण. तसेंच मोठमोठ्या लोकांतही होतें.

हिरा०——आपण तर भांडण झाल्यावर मातक्यान एकच हो-

# दुखणाईतसरदार.

तों, तसेंच त्यांनीं करावें कीं नाहीं? पण आणखी एक सांगतें. आपल्या भांडणांत जिवाला कांहीं भय नसतें.

गण॰ — आपले आईबाप कज्जाचें निवारण करितात कीं नाहीं? परंतु पोरांत आणि मोठे माणसांत फार अंतर आहे. मोठ्यांचे हातांत ढाल तरवार असल्यावर मग त्यांनीं कोणाचे आज्ञेंत वागूंनये, आणि आपणावर कोणी जुलूम करूंलागला असतां तो तरी उगाच कां सोसावा?

हिरा॰ — तूं नित्यनित्य शिपाइगिरीच्याच गोष्टी काढतोस.

गण॰ — वाहवा! शिपाइगिरी तर फारच चांगली. मी ही शिपाईच होईन; त्वां कितीही सांगितलें तरी मी लढाई वांचून राहणार नाहीं. आमचें तर हें कसबच, ह्यावांचून आह्मी पोट कशावर भरावें? बापाची कमाई मला किती दिवस पुरणार आहे? ताई, तूं रडतेस का? रडूंनको, तुझें रडणें पाहून मलाही रडूं येतें.

हिरा॰ — मी येथें एकटीच आहें, मला रडून घेऊंदे. बापापुढें रडेन तर त्यास फार दुःख होईल, एथें रडलें तर कांहीं चिंता नाहीं.

गण॰ — उगी उगी, रडूं नको, डोके पुसून कामास लाग मी टोपली भरून पाड घेऊन येतों.

हिरा॰— तूं तिकडच्या बाळआंबराईत जा, इकडचे पाड मी गोळा करून आणिले.

(गणपतराव आंबराईकडे धांवतो. हिराबाई अमळ उगीच राहून आपणाशीं ह्मणते,)

जर मी भक्तिमान असतें तर ईश्वराची प्रार्थना करून करून बाबास राहविलें असतें. किंवा जर मी मोठी असतें, तर राजा जवळ जाऊन बाबाला घरीं राहण्याची रजा व बैठा रोजमुरा इतकें करून घेऊन आलें असतें. बैठा मुशारा खावा अशी चाकरी माझे बाबानें केली आहे.

---

## प्रवेश २

### हिराबाई, शिवाजी, आणि तान्हाजी.

शिवा॰— अहो तान्हाजी, जगदीशरावाचें तें घर ह्मणून मला लोकांनीं सांगितलें आहे, चला तिकडे, मी त्याचे प्रतिष्ठेस योग्य अशी रजेची आज्ञा आणली आहे, ही ऐकून तो आनंदमय होईल. परंतु ही अतिसुलक्षणी मुलगी कोणाची आहे बरें? थांबा, मी तिज संगभीं कांहीं बोलतों; पण तु-

ह्मी माझें मोठेपणाचें नांव घेऊं नका, हो तान्हाजी. (हिराबाईचे खांद्यावर हात ठेवून ह्मणतो,) मुली, तूं फार चपळाईनें काम करितेस.

हिरा॰ — कांहो रावजी, तुह्मीं मला भिवविलें?

शिवा॰ — मुली, रागें भरूं नको, क्षमा कर; माझ्या मनांत तुला डचकवावें असें नव्हतें, तुझा चांगुलपणा पाहून मला आनंद झाला. बरें, हे चांगले चांगले पाड कोणासाठीं जमा करितेस?

हिरा॰ — (पाडांची टोपली त्याजवळ आणिते.) मज गरिबावर कृपाकरून तुह्मी ह्यांतून कांहीं पाड घ्या. येथें तबक नाहीं, काय करावें, असतें तर फार चांगलें होतें. आंबे त्यांत घालून त्या दिले असते.

(शिवाजी तान्हाजी त्यांतून एक एक पाड घेतात.)

शिवा॰ — वाहवा! असा गोड आणि बिनरेष पाड आज पावेतों कधीं खाण्यांत आला नव्हता. मुली, आह्मांस हे पाड विकत देशील?

हिरा॰ — नाहीं, नाहीं, रावजी, तुह्मीं कितीही रुपये दिले तरी मी विकत देणार नाहीं.

शिवा॰ — खरेंच, हे तुझ्या टोपलींत आहेत ह्मणून ह्यांचें मोल-

च नाहीं, खरें.

हिरा॰ — असें नव्हे, महाराज ! हे मीं आपले बापासाठीं जमा केले आहेत; मीं आपल्यासाठीं केले असते तर तुह्मांस फुकटच देतें. ( हिराबाई डोळे पुशीत पुशीत बोलते. ) यंदा बाबानें अझून पाड खाल्ले नाहींत; आतां तर काय शेवटलेंच खाणें आहे.

शिवा॰ — काय? त्याचे जिवासांड दुखणें आहे ह्मणून तूं असें बोलतेस कीं काय, मुली?

नान्हा॰ — त्याचें दुखणें पाडावरचे वासनेचेंच असेल असें वाटतें.

हिरा॰ — ते कांहीं दुखण्यास पडले नाहींत ; मागें हिंवाळ्यांत बरीक त्यांस संधिवायु झाला होता, त्याची कसर अझून तशीच राहिली आहे. दुखणाईत असोत किंवा नसोत, पण उद्यां त्यांना येथून जाणें अवश्य आलें आहे.

शिवा॰ — जाण्याची इतकी जरूरी त्यांस काय ह्मणून पडली?

हिरा॰ — त्यांची पागा उद्यां इकडून जाणार आहे, तिजबरोबर त्यांस जाणें प्राप्त आहे.

शिवा॰ — त्यांची पागा?

हिरा॰ — होय, त्यांची, ह्मणजे शिवाजीची पागा, ती हिंदुस्था-

# दुखणाईतसरदार.

नाकडे मोहिमेवर जाणार आहे, तीत माझा बाप असतो.

शिवा० — ( एकीकडे होऊन तान्हाजीस ह्मणतो. ) गड्या, ही जगदीशरावाची मुलगी दिसते.

हिरा० — ( तें बोलणें ऐकून ह्मणते. ) होय, तोच माझा बाप; त्यास तुह्मी ओळखतां?

शिवा० — तो तर आमचे सोबतीचा सरदार; आह्मी त्यास ओळखतों.

हिरा० — पागा येऊन पोहोंचली का? आतां ह्या गांवीं मुकाम न होतां आजच पुढें जाईल?

शिवा० — आज कांहीं पागा येत नाहीं; उद्यां येईल. आह्मी मात्र पुढें आलों. (तान्हाजीस डोळा घालून ह्मणतो.) आमचे घोड्याचा नाल पडला आहे ह्मणून नालबंदी होई तों पर्यंत ह्या आंब्याचे छाये खालीं बसावें ह्मणून आलों होतों, पण आतां नालबंदी झाली असेल, गंगाखेडाकडे जावयाची वाट हीच असेल नव्हे?

हिरा० — नाहीं नाहीं, रावजी, ती वाट रानांत जावयाची आहे.

शिवा० — हा गांव तुझ्या बापाच्या जहागिरीचा आहे ना?

हिरा० — आह्मा गरिबांला एवढा मोठा गांव जहागिरीचा को-

ठचा? एवढा असता तर मग काय पाहिजे होतें; बाबाची एवढी आंबराई मात्र, आणखी मिराशी जमीन, बागाईत जिराईत मिळून, चार चाहूर आहे; आमचा बाबा पागे बरोबर नसला ह्मणजे नेहमीं एथेंच राहतो.

शिवा० — बरें बरें, हिंवाळ्यांत तो का दुखणेकरी पडला होता?

हिरा० — काय सांगावें रावसाहेब! त्याच्यानें हातपाय देखील हालवत नव्हते, आणि फार दिवस झाले त्याचे कपाळावर एक जखम लागली होती, ती पुनः फुटली, ती देवानें काहींशी बरी केली तों मातब्यान् त्याला लढाईस जाणें आलें.

शिवा० — रोग्यास कोणी लढाईस नेत नाहीं. असें आहे तर त्यानें रजा मागावी कीं नाहीं?

हिरा० — बाबास नसमजूं देतां माझे आईनें रजे विषयीं विनंतीपत्र राजास पाठविलें आहे, पण त्याचें उत्तर अझून आलें नाहीं; मग काय राजास खरें वाटलें नाहीं, किंवा शिवाजी सरपागे ह्यांनींच मधें पत्र दाबून ठेविलें, कसें काय असेल तें असो.

शिवा० — चांगले सरदारास कामाचे समयीं रजा देण्याचा सं-

तोष शिवाजीचे मनांत नसेल, असें कांहीं कारण असलें तर कोणास कळे.

हिरा॰— रावसाहेब, तुह्मांस आईबाप आहेत?

शिवा॰— आहेत, मुली.

हिरा॰— तर तुह्मी आईबापांस सोडून आलां तेव्हां ते तुह्मांकरितां भारी रडले असतील. त्यांनीं तुह्मांस कसें येऊं दिलें? माझा वडील भाऊ विद्या शिकावयास जेव्हां दुसरे गावीं जाऊं लागला, तेव्हां आह्मी उभयतां पुष्कळ रडलों. निकडली आशा तरी होती, एथें तर हातावर शिर घेऊन जावें लागतें. त्याला ह्याला फार अंतर.

शिवा॰— मुली, तूं ह्मणतेस इतकें कांहीं नाहीं; मी आईबापांस सोडून फारवेळ लढाईस गेलों आहें. ह्यामुळें तें काम आमचे आटोक्यांत पडलें आहे. मी पहिल्यानें तर बापाबरोबर लढाईस गेलों होतों.

हिरा॰— जे शिपाईलोक आहेत त्यांस फारशी दया माया नसती, हें मला पुरतें माहीत आहे; पण माझा बाप कांहीं तसा नाहीं हो; त्याला दया माया पुष्कळ आहे. त्याचे मनांत तर आपली प्रतिष्ठा राहून सर्वस्व नाश जरी झाला तरी त्याची काळजी नाहीं; ह्मणूनच रजा घेण्याविषयीं

त्याजकडून आळस तो.

शिवा० — कां, असें कां?

हिरा० — तो वारंवार बोलत असतो कीं, मर्दाचा लेंक लढाईचे वेळेस जर रजा मागेल तर त्याला लोक भितरा असें ह्मणतील. ह्यासाठीं त्यानें कधींही अशा प्रसंगीं रजा मागितली नाहीं. आणखी त्याचें ह्मणणें कीं, मी आपल्या धन्याकरितां लढाईत मेलों तर फार चांगलें; पण ईश्वरानें मला घोड्यावर बसावया पुरती शक्ति मात्र द्यावी ह्मणजे झालें. तर एखादे दिवशीं त्याचे बोलण्या प्रमाणें जर झालें, तर मग आह्मीं पोरां बाळांनीं कोणाचे तोंडाकडे पाहावें?

शिवा० — आठव नाहीं, मुली, तुला? त्याजवर आज पावेतों किती प्राणसंकटें आलीं, पण त्या तितक्यांतूनही देवानें त्यास वांचविलें; आणि आतांच कां इतक्या कल्पना तुझ्या मनांत येतात? लढाईंत सर्वांसच गोळ्या लागतात असें कांहीं नाहीं.

हिरा० — पण ज्यांना लागतात ते तेव्हांच ठार होतात. त्यांतली एखादी लागली तरी पुरे, मग कसें होईल?

शिवा० — तूं ह्मणतेस तेंही खरेंच आहे; बरें पण ती आण-

# दुखणाईतसरदार.

खी एक मुलगी इकडे येते आहे ती कोणाची?

हिरा० — ती माझी सख्खी बहीण, तिचें नांव विचाराल तर यमुना.

---

## प्रवेश ३

### तान्हाजी, शिवाजी, गणपतराव, हिराबाई, आणि यमुना.

हिरा० — अगे यमुने! आतां आलीसना? एवढा वेळ पर्यंन कोठेंगे होतीस? कोणीं तुला खोळंबविलें होतें?

यमु० — मला आईनें बाबा बरोबरचें फराळाचें करावयास खोळंबविलें होतें.

हिरा० — तुझी टोपली कोठें आहे?

यमु० — दोनी टोपल्या भरल्या इतक्यांत? इतके पाड कुठेगे मिळविले?

हिरा० — पहा तर (तिचे टोपलींत पाड घालिते आणि दुसरे पाड वेंचावयास आपली टोपली रिकामी करिते.)

यमु० —(हिराबाईचे कानीं लागते.) ताई, हे कोणगे?

हिरा० —(हळूच सांगते.) हे शिवाजीचे पागेंतले सरदार आहेत.

यमु० — हे का बाबाला घेऊन जाण्यासाठीं आले आहेत?

हिरा० — नाहीं नाहीं, ते एरवींच पुढें आले आहेत, बाबानें ह्मटल्या प्रमाणें पागा उद्यां इकडून जाणार आहे.

यमु० — हे सर्व सरदारांकडूं तिकडेसच कां मेले नव्हते? इकडे कशाला आले?

हिरा० — अगे हळूच बोल, हे सरदार ऐकतील.

यमु० — ऐकनना कां मेले. आतां आमचे बाबाला घेऊन जाऊन आमची आणि बाबाची नाडानोड करितील.

शिवा० —(तान्हाजीस ह्मणतो.) ह्या मुळी आतां आह्मांला चांगलें पाहत नाहींत, आमचें वाईट इच्छितातसें वाटतें, नाहीं बरें?

तान्हा० — तुह्मी आपलें नांव त्यांस सांगून रजेची आज्ञा आणली आहे ती कां त्यांस कळवाना?

शिवा० — माझ्या मनांत जलदी करूंनये, कांकीं ह्या मुळी आपले बापावर फार ममता करतात, हें पाहून मला आ-

नंद वाटतो, ह्यासाठीं आणखी अंमळ ह्यांस बोलूं द्या.

हेरा॰— गणोबा तिकडे पाड वेंचावयास गेला आहे, त्यानें मला बलाविलें होतें, पण मी एथेंच बोलण्याचे नादांत गहिलें, असो, आतां मी तिकडे जातें, यमने, तूं येथें बैस, पण ह्या सरदारांस कांहीं वेडें वांकडें बोलूं नको, हो?

यमु॰— अहा, तूं काय मला शिकवितेस कसें बोलावें तें? तूं आपली जा.

हिरा॰— रावसाहेब, तुह्मांस एथें सोडून म्यां जाऊं नये, पण बहिणीस तुह्मांजवळ ठेवून मी आपले भावा बरोबर पाड वेंचावयास जातें, ह्मणजे लौकर लौकर पाड वेंचून बाबाकडे जावयास सांपडेल. आणि आज्ञा द्याल तर तुह्मी आलां हें बाबास सांगेन, ह्मणजे तो तुह्मांस पाहून फार खुशी होईल.

यमु॰— पुरे पुरे, कांहीं सांगावयाला नलगे, आजचा दिवस तरी आह्मांला बाबाशीं पोटभर बोलून घेऊं दे. हे आले ह्मणजे मग बाबा आह्मांशीं कोठला बोलावयाला?

हिरा॰— रावसाहेब, तुह्मी हिच्या बोलण्यावर जाऊं नका; हिला कांहीं समजत नाहीं. तुह्मी हिच्या बोलण्याची क्षमा करा. घरीं पाहुणें आले ह्मणजे हिला असेंच वाईट

वाटत असतें.

यमु॰— काय? क्षमा करा? कश्चीक्षमा? असें मी काय बोललें? पाहुणे घरीं आले ह्मणजे बाबाला आपणांशीं बोलावयास फावणार नाहीं. मला तर आज बाबाजवळ फार गोष्टी बोलावयाच्या आहेत; हे आले ह्मणजे मग वेळ कसा सांपडेल? हें का त्यांना ठाऊक नाहीं?

शिवा॰— भिऊंनका, मुलींनो, तुह्मी खुशाल आपले बाबाशीं बोला; मी तुमचे बोलण्याचे आड येणार नाहीं. (हिराबाई निघून जाते.)

यमु॰— पण रावसाहेब, खरेंच सांगा, माझे बाबास राजा बलावून नेऊन लढाईस कां पाठवितो? मग बरें आह्मां लेंकरांस कोण संभाळील?

शिवा॰— पर मुलखांत लढाईस जाणें, तेव्हां चांगले चांगले शिपाई नेले पाहिजेत; आणखी एक, ज्याचें अन्न खावें त्याचे कामास प्रसंगीं जावयास नको?

यमु॰— पण एव्हांच लढाई करण्याची काय गरज आहे? आणि जरी गरज असली तरी आमचे बाबास कशास नेतो? कां कीं लढाई करून जें मुलखाचें हित होणार, तें घरीं राहून मुलें सुशिक्षित केल्यानें होणार नाहीं कीं

# दुखणाईत सरदार.

काय?

शिवा०— होय, मुली, होईल खरें; परंतु जर तो आपलीं दुसरीं मुलें तुजप्रमाणें तरबेन करील तर होईल.

यमु०— लोक मला फार धट्ट मानितात, आणि ह्मणतात कीं, यमनीला ढाल तरवार भाला दिला ह्मणजे फार चांगला बारगीर दिसेल.

शिवा०— हो हो, मग तर तूं फार चांगली शिपाइगिरी करशील.

यमु०— मजजवळ ढाल तरवार असती तर मी कोणास हसूं नदेतें.

शिवा०— फार बरें,तर, ही घे माझी ढाल तरवार ,आणि शिपाई हो,पाहूं.

यमु०— (शिवाजी ढाल तरवार पुढें करतो. यमुना ती नघेतां पळून दूर जाते.) अरे, नको बाबा मला.

शिवा०— अहो शिपाई बावा, तुह्मी ढाल तरवारीला भिऊन पळतां?

यमु०— मी भ्यावयाची नाहीं, पण तुह्मी माझे जवळ येऊंनका. जवळ आलां तर मी बाबाला हाक मारीन. माझी आरोळी ऐकतांच बाबा मजकरितां धांवून येईल.

शिवा० — मी कांहीं तुजवर बळात्कार करीत नाहीं, उगीच थट्टेनें तुजपुढें ढाल तरवार केली.

---

## प्रवेश ४

### शिवाजी, गणपतराव, हिराबाई, आणि यमुना.

गण० — यमुने, तूं कांगे आतां ओरडलीस? तुझा मोठा शब्द ऐकिला ह्मणून मी तुजसाठीं धांवून आलों.

शिवा० — तूं का बहिणीचा कैवार घेऊन तिचे बांटचा भांडावयाला आलास?

गण० — होय, माझे बहिणीस कोणी जर चकार शब्द बोलेल, तर तो मोठा कां असेना, त्याला दोन गोष्टी ऐकवीन.

यमु० — मी आपली उगीच ओरडलें. तूं आलास हें ही बरेंच झालें. (शिवाजीकडे पाहून ह्मणते.) माझ्या मनांत असें आहे कीं, राजाची अवकृपा नहोतां बाबास रजा मिळावी, ह्मणजे बरें. पण रावसाहेब, तुह्मी आह्मांला ह्याविषयीं कांहीं मसलत सांगाल?

# दुखणाईतसरदार.

हेरा० — रावसाहेब, जर तुम्ही आम्हांला मसलत द्याल तर आम्ही फार उपकारी होऊं. आम्ही आपल्या कानड्यांचा जोडा करून तुमचे पायांत घातला तरी हा उपकार आमच्यानें फिटणार नाही.

राण० — (इतकावेळ शिवाजीची ढाल तरवार पोशाक ह्यांजकडे न्याहाळून पहात होता; मग ह्मणतो.) बाबाचें राहणें घरीं कसें होईल हें जर तुम्ही सांगाल तर मी आपली ला होरी बंदूक, व फरा, व कांसवाची ढाल, व मुलतानी कमान, तुह्मांला देईन.

शिवा० — ह्याची मसलत मला कांहीं सुचत नाहीं, सुचती तर मी तेव्हांच सांगतों.

समु० — आह्मांला कांहींच का उपाय करतां येणार नाहीं? आह्मी असें करूं कीं, पागेचे मुख्य सरदार शिवाजी ज्यां एथें आले, ह्मणजे त्यांचे पायांवर आह्मी सर्व लोळण घालून पडूं, आणि, तुमचे बापास मी लढाईस नेत नाहीं, असें जेव्हां ते ह्मणतील तेव्हांच उठूं, नाहीं तर कधीं उठणार नाहीं.

हेरा० — हो हो, गडे, असेंच करूं; आणि त्यास ह्मणूं कीं, हिंवाळ्यांत बाबा फार दुखणाईत होता, असून कांहीं चां-

गला बरा झाला नाहीं, त्याला नेऊं नका, त्यावांचून अह्मांस कसें करमेल? मग रावसाहेबांस आमचे डोळ्यांचीं असवें पाहून दया येणार नाहीं कीं काय? आणि ते आह्मा पायांनीं ढकलून देतील? तुह्मांस कसें वाटतें, बरें?

शिवा० — हे मुलांनो, तो तुह्मांस कधीं ढकलून देणार नाहीं. पण तो आतांच जर आला नसेल तर पुढें येणार नाहीं; आणि जर तो न आला, तर मग तुमच्या कल्पना तुमच्या ठायीं राहतील नव्हे? पण शिवाजी प्रमाणेंच एक मोठा मानकरी त्या पागेंत शिवाजीचे हाताखालीं शिकणाऊ आहे, त्याचा व तुमचे बापाचा घरोबा मोठा आहे.

गण० — हाताखालीं शिकणाऊ ह्मणजे काय?

शिवा० — शिवाजी बरोबर फौजेंत युद्धाची कळा शिकावयासाठीं खुशीनें चालतो व लढतो. तो शिवाजीचा जिवलग मित्र आहे, तो जें मागेल तें शिवाजी मान्य करील, हें मी पक्कें जाणतों.

हिरा० — रावसाहेब! तो तुमचा मित्र आहे कीं काय?

शिवा० — होय, तो माझा ही जिवलग मित्र आहे.

हिरा० — तर मग तुह्मी, रावसाहेब, आह्मी तर काय, पण

# दुखणाईतसरदार.

ईश्वराकडे पहा, आणि त्यागृहस्थाचे हातून कसेंही क-रून बाबास रजा देववा, आणि बाबा आह्मी एके जागीं राहूं असें करा. कदाचित् आमचे दैवानें तशी गोष्ट नहोई, आणि जाणेंच प्राप्त झालें, तर आमचे बाबास फार सांभाळा, बरें, रावसाहेब. त्याला फारशी चाकरी पडूं देऊं नका. नजाणों एखादे वेळेस दुखण्यास पडला, किंवा जखम लागली तर मग,—

यमु०— काय जखम? रावसाहेब, आमचे बाबाला जखम लागूं देऊं नका, त्यावर घाय पडे पर्यंत तुह्मी खोळंबून उगेच राहूं नका; जर कोणीं त्यावर हत्यार उगारलें तर त्याला तुह्मी भाल्यानें टोंचून खालीं पाडा.

शिवा०— (मनांत ह्मणतो,) आतां मला आपलें नांव लपवावयास धीर निघत नाहीं. (मुलीकडे पाहून.) मुलीं हो तुह्मी किमपि भिऊं नका बरें, त्याचे केंसास धक्का तो माझे प्राणास.

हिरा०— तर आमचा सर्व भरवंसा तुह्मांवरच आहे, पण मी पुन्हा विनंती करतें कीं, जे शिकणाऊ गृहस्थ आहेत त्यांजकडून रजा मागण्याविषयीं, रावसाहेब, विसरूं नका बरें. मला आणखी तुह्मांशी फार बोलावयाचें होतें,

पण आतां जातें, बाबा आमची वाट पाहत असेल.

शिवा० — बरें तर, जा, पण मी कांहीं तुह्मांस देतों येवढें घ्या. हिराबाई, ही मुदी तूं आपले हातांत घाल. अमळशी मोठी आहे, पण ती लहान करतां येईल.

हिरा० — नकोबा, आई रागें भरेल; बाबा तर फार फार रागावेल. आतां त्याचे जावयाचे वेळेस जर तो मजवर रागावला तर मग मला फारच दुःख होईल. मी काय करूं त्या मुदीला?

शिवा० — कांहीं चिंता नाहीं; घे तूं ही मुदी, अगत्य घेतलीच पाहिजे. जर तुमचा बाबा रागावला तर शिकणाऊचे हातून रजा न मिळाली असतां तो पागेंत येईलच, आला ह्मणजे तुमचे वरचा राग त्याचे मनांतून मी काढून टाकीन.

हिरा० — (मुदी घेऊन ह्मणते.) रावसाहेब, मी आतां घेतें, पण माझ्या बाबास जर तुह्मी रजा देवविली नाहीं, तर मी ही मुदी बाबा बरोबरच तुमची तुह्मांस परत पाठवून देईन, आणि जर रजा मिळाली तर मग जेव्हां जेव्हां ही मुदी मी पाहीन तेव्हां तेव्हां तुमचे उपकार आठवीन.

# दुखणाईतसरदार.

यमु० — चलगे चल आतां, तुझा तर ह्या मुदीवरच भारी जीव गुंतला आहे.

शिवा० — (यमुनेस ह्मणतो.) मुली ! ही घे तूं एक मुदी. ही कांहीं फारश्या किमतीची नाहीं, तांब्याची मुदी, वर सोन्याचा मुलामा आहे, आणि खडा तर खोटाच आहे. तुला माझी आठवण रहावी ह्मणून मी देतों, तूं मनामध्यें कांहीं संशय न आणितां बेलाशक घे.

यमु० — (मुदीकडे पाहून ह्मणते.) मला परीक्षा आहे; कांहीं नाहींशी नाहीं; खडा खरा दिसतो. आणि मुदी तर सोन्याचीच. माझा बाबा तुह्मांप्रमाणेंच सरदार आहे, पण त्याजवळ अशा मुद्या नाहींत. ह्मणून मला वाटतें कीं, तुह्मीं कोणाजवळून लुटून आणल्या असतील. आमचा बाबा तर कधीं कोणास लुटीत नाहीं, ह्याकरितां मला ही तुमची मुदी नको.

शिवा० — मुली, ही लुटीची नव्हे, बरें. तुझ्या मनांत ही घ्यावयाची नाहीं ह्मणून असें ह्मणतेस, तर लढाईमध्यें हिला मी कुठे संभाळूं ? ह्यासाठीं आतां चार दिवस ही तुजजवळ असूं दे, मी तिकडून आलों ह्मणजे मग मला दे. मग तर कांहीं चिंता नाहीं ?

यमु०— तर मग मी घेतें. गणपतराव, चला, आतां जाऊं.

गण०— मला कांहीं काम आहे ह्यांपाशीं; तुह्मी जा, मी आपला मागून येईन.

(इतक्यांत तान्हाजी बाहेर गेला होता तो माघारा येऊन शिवाजीचे हातांत कागदाचा रुमाल देतो, आणि तोंडाला पदर लावून कानाशीं लागतो.)

यमु०— काय तुमचे मनांत आपणाला आणखी एक मुदी मिळावी, ह्मणून घुटमळतां?

हिरा०— (हळूच ह्मणते.) हें काय भाऊराया? असें धन लोभ्यासारिखें काय करतोस? द्रव्याच्या आशेनें तुझें मन गुंडाळलें, ह्मणून आह्मांबरोबर यावयाला मागें पुढें करितोस वाटतें?

गण०— तुमच्याच मनांत द्रव्याची आशा आहे, ह्मणूनच असे उद्गार तोंडांतून निघतात. हें तर माझ्या गांवीं देखील नाहीं. माझें कांहीं नाजूक काम आहे, ह्मणून मी मागें राहतों. तुह्मी त्याला सत्रा कल्पना काढून बोलणार.

यमु०— नाजूक काम? काय करूं बाबाचे जाण्यामुळें माझें चित्त स्वस्थ नाहीं, नाहीं तर तुमचें नाजूक काम पहावयाची

मला फार हौस होती.

गण० — जर- जर-जर तूं माझी बहीण नसतीस, तर तुला खूप बडवितों.

यमु० — बरें तर बाबा, आह्मी जातों हो. तुह्मी आपलें नाजूक काम करा काय तें. चलगे ताई.

---

# प्रवेश ५

## गणपतराव आणि शिवाजी.

गण० — माझे मनांत तुह्मांशीं कांहीं थोडेंसें बोलावें असें आलें आहे.

शिवा० — बरें आहे; काय तुझ्या मनांत आलें असेल तें बोल.

गण० — मघां तुह्मी ह्मणालां कीं हातारवालीं शिकणाऊ आहे ह्मणून, त्यास हातारवालीं शिकणाऊ ह्मणजे काय?

शिवा० — कोणीएक मोठा अमलदार असतो, त्याजवळ काम शिकावयासाठीं जो दुसरा कोणी खुशीनें राहतो त्यास शिकणाऊ असें ह्मणावें. त्याला कांहीं लढाईचे

प्रसंगीं फारसा जिवाचा धोका नसतो, सरदारास बरीक सर्वां चे पुढें घोडा घालावा लागतो. आणि शिकणाऊ जमातींत मागें असतो.

गण० — असें आहे तर मग मी ही हाताखालीं शिकणाऊ होईन.

शिवा० — तूं होशील खरा. परंतु शिकणाऊ जवळ पैका पुष्कळ असला पाहिजे. तुझ्या जवळ पुष्कळ पैका असला तर सांग.

गण० — माझ्या जवळ पैका नाहीं, पण राजाजवळ तर पुष्कळ आहे. राजाला आपल्या शिपायांचा निर्वाह करावा लागतो कीं नाहीं?

शिवा० — नाहीं नाहीं, नसें नव्हे; चाकरीच्या शिपाया सारखें शिकणाऊस केवळ लढावें लागत नाहीं, त्याची खुशी, ह्मणून राजा कांहीं त्यास पैका देत नाहीं; ह्यासाठीं शिकणाऊस आपले पदरचा पैका खर्चावा लागतो.

गण० — असें काय? तर मग हें फार वाईट. पण मला पोटाला अन्न तर पाहिजे. बरें,—मीं बापा बद्दल चाकरी करण्या विषयीं जर राजापाशीं विनंती केली तर कसें?

शिवा० — मुला, हें काम फुकाचें नव्हे; तुझ्या तोंडावरचा जा-

# दुरवणाईतसरदार.

र अझून बाळला नाहीं. ह्याकामास नेहमीचा सराव पाहिजे आणि तादृश अधिकारही पाहिजे. तुला तर अझून हें कांहींच माहीत नाहीं.

गण॰ — मी लहान आहें ह्मणून माझी आज्ञा कोणी न मानील तर नमानो, पण माझ्यानें तर इतरांची मानवेल कीं नाहीं? ह्यासाठीं मला तुह्मी बरकंदाजच करा परते.

शिवा॰ — मुला, फौजेच्या कुचा बरोबर तुझ्यानें पायीं चालवेल? इतकें सामर्थ्य तुला काठचें?

गण॰ — अहो, चालवेल तंवर चालेन, नाहीं तर कुणग्यांत राहीन, किंवा दारुगोळ्याचे छकड्यावर बसेन, माझें काय?

शिवा॰ — बरें, पण तुला जर बापाचे वांटचें घेतलें तर मग तुलाही जावें लागेल; मग तुझा बाप आणि तूं एके ठिकाणीं कोठून असणार?

गण॰ — चिंता नाहीं; माझ्या योगानें बाबाचें राहणें ह्यातारपणीं माझ्या आईबहिणीजवळ तर होईल, पुरें येणें करून मला फार आनंद होईल. माझा बाबा जसा मोठा पराक्रमी आहे, तसा मीही लौकरच होईन. मला शिपाइ-

गिरी करण्याची फार आवड आहे, ही पहा लढाईची बखर किती चांगली आहे, व शिपाईलोकांस किती आनंद देते ती ! ही मी तुह्मांस बक्षीस देतों.

शिवा० — ( तान्हाजीकडे संकेतानें पाहतो, कांहीं एक कल्पना मनांत आणतो. ) मुला, तुझी बखर मीं घेतली, पण तुला मीही एक चांगली बखर देतों, ही घेऊन तूं आपले बापाकडे जा. ( रुमालांतून एक लाखोटा काढून गणपतरावाचे हातीं देतो. )

गण० — ( आनंदयुक्त होऊन ह्मणतो. ) बरें, ही बखर मी वाचूं आतां?

शिवा० — आतांच वाचूं नको. आह्मी येथून गेल्यावर मग वाच. ( आपल्या हातानें गणपतराव ह्याचे खिशांतला खोटा घालतो. ) ही बखर तूं गमावूं नको बरें ? तुला मी शिपाई करून बरोबर लढाईस नेईन.

गण० — ( शिवाजीस रामराम करून ह्मणतो. ) रावसाहेब, येवढा मजवर उपकार करा कीं, मी तुमचे पाशीं उभा राहून लढाई करीन असें करा.

शिवा० — बरें बरें, आतां आह्मी जातों ( तान्हाजीस घेऊन आपण झाडा आड जातो. ) पहा, कशींहीं सुलक्षणी मुलें

# दुखवणाईतसरदार.

ह्या जगदीशरावास ईश्वरानें दिलीं आहेत ! अशा मुलांस सोडून जाणें हें बापाला फार अवघड आहे, पण आतां हें पत्र गणपतरावानें त्यास दाखविलें ह्मणजे तो फार समाधान पावेल. बरें, पण हा मुलगा आतां काय करतो आहे तें पाहूं या बरें.

गण० — (खिशांतून कागद काढून पाहतो.) अहाहा ही बरवर कश्वी ! ह्यावर मोहर आहे ! असो, असली ह्मणून काय चिंता? ह्यांत काय आहे तें पाहावें बरें. (लखोटा उलगडून पहातो.) हातर हुंडीचा कागद दिसतो, रावसाहेबांनीं माझी थट्टा केली. (आंबगाईतून निघून बाहेर जातो.)

---

## प्रवेश ६

### जगदीशराव, गणपतराव, हिराबाई, आणि यमुना.

जग० — गणोबा, सरपागे आतां कोठें आहेत?

गण०. — तुमचे सरपागे काळे किंवा गोरे मला ठाऊक

# बाळमित्र.

नाहींत.

हिरा॰ — ज्यांनीं मला मुदी दिली तेच सरपागे, असें बाव
णतात; त्यांवांचून अशी देणगी कोण देणार आहे?

गण॰ — असें काय? मीं तर,मीं कांहीं त्यास ओळखलें न.
आतां काय करावें मी केवळ मूर्ख होय.

जग॰ — तेच असतील, ही त्यांचीच मुदी,म्यां ओळखिली;
हा मीं त्यांची भेट देखील घेतली नाहीं; काय सांगावें, मल
फार वाईट वाटतें. असो, मी उद्यां शिवाजीस भेटेन.

यमु॰ — बावा, ते गेले इतक्यानें, मला आतां बरें वाटतें; ए
तां आह्मी पाहिजे तसें आजचा दिवस तुझ्याशीं बोलूं. ते
आले असते तर मग कुठचें बोलणें आणि कुठचें चालणे

जग॰ — मुलांनो तुह्मी असा धीर कां सोडला? थोडक्याच
वसांत सल्ला होईल अशी बोलवा आहे; सल्ला होतांच मी
निघून घरीं येईन; मग तुह्मांस सोडून कोठें जाणार ना

हिरा॰ — ते सरपागे जर तुह्मांस घरीं रहावयाची आज्ञा
तील तर त्यांनीं दिलेली मुदी हीच त्यांस मी नजर करीन.

यमु॰ — तर मग मी ही मोठ्या हर्षानें त्यांची मुदी त्यांस दे
ईन.

गण॰ — बावा, ही पहा त्यांनीं मला कशी बरवर दिली अ

हे ती.

जग॰— पाहूं;–अरे वाहू! ही तर राजाची मुद्रा आहे ह्या कागदावर. (कागद उलगडून पाहतो.) ही बरवर ऊशाची हें तर मला घरीं राहण्याविषयींचें पत्र आहे; वाहवा! फार बरें झालें, काय सांगू तुह्मांस, मुलांनो?

मुलें॰— बाबा सांगा काय झालें तें.

जग॰— थांबा, मला पुर्ते वाचूं तर द्याल (मुलें भोंवताली पाळा घालितात.) ही अशी चांगली गोष्ट खरी कोठली व्हावयाला, हें आपलें सारें स्वप्ना सारिखें दिसतें.

मुलें॰— बाबा, आह्मी मनामध्यें हर्ष धरितों, आणि तुह्मी आमचा हिरमोड करितां.

जग॰— (मुलांस आलिंगन देऊन ह्मणतो.) मुलांनो, माझें गहणें झालें, बरें!

मुलें॰— झालें राहणें? अहाहा! फारच बरें झालें. वाहवा! वाहवा! काय देवानें मौज केली!

जग॰— मला पागे बरोबर मोहिमेवर जाण्याची तर आज्ञा नाहींच, आणि चाकरी नकरितां घरीं गदा देंणें ही नाहीं. पण कांहीं दुसरेंच आहे.

मुलें॰— तें काय बाबा?

जग० — मी दुखणाईत आहें ह्मणून राजास कोणीं कळविलें नकळें. परंतु राजानें माझी रीत रवेस पाहून किल्याची खरेरख मात्र करावी अशी किल्लेदारीची सनद मला दिली आहे.

गण० — बाबा, तर आतां तुह्मी किल्लेदार झालां काय?

यमु० — बाबा, आतां तुह्मी सर्वांपेक्षां मोठे झालां ना?

जग० — ज्या थोरांनीं मजवर येवढा उपकार केला, कीं जो सांगतां पुरे होत नाहीं, त्यांचेच द्वारां मला ही पदवी मिळाली असें वाटतें.

मुलें० — आतां आह्मी चोंहींकडे धांवून त्यांस पाहून घेऊन येतों.



## प्रवेश ७

### शिवाजी, जगदीशराव, गणपतराव, हिराबाई, आणि यमुना.

(शिवाजी झाडांतून बाहेर निघतो. व जगदीशरावाकडे जातो)

# दुखणाईतसरदार.

जग० — (रामराम करून शिवाजीस भेटतो, आणि हातीं धरून गाद्दीच्यावर बसवितो.) आपण परोपकाराकडे शरीर वेंचितां; आपला उपकार म्यां जन्मपर्यंत आपली सेवा केली तरी फिटणार नाहीं.

हिरा० — आह्मी सर्व तुमचीं उपकारी झालों हें किती सांगावें? तुमच्या पत्रानें जो आह्मांस आनंद झाला तो तोंडानें सांगवत नाहीं. तुह्मीं आतां नवा बाबा आह्मांस दिला असें झालें.

शिवा० — मी काय, आपला राजाच असा कृपावंत! तुमचे नांवाचा एक कागद कचेरींत आला, तेव्हां माझे मनांत आलें कीं, हें विनंतीपत्र तुमचे कुटुंबाकडून आलें असेल. असा निश्चय करून, तुमची शरीरप्रकृति अशक्त, तुह्मांस चाकरीवर दूर पाठविणें हें नीट नव्हे, असें मनांत आणून राजा जवळ रजेची गोष्ट काढिली. आणखी माझे मनांत आलें कीं, रजेपेक्षां दुसरें कांहीं काम मिळवावें; तेव्हां विनंती करून किल्लेदारीची जागा तुह्मांसाठीं मागून घेतली; आणि तुह्मांस हें वर्तमान कळवावया करितां मी पुढें निघून आलों. आतां तुमची भेट झाली, फार आनंद झाला.

जग० — मला हें कांहींच माहीत नाहीं; पण आपण तिचे

पन्नास रुकार दिला ही केवढी गोष्ट ! हें केवळ सामान्य पुरुषाचें करणें नव्हे, आपण तसेच योग्य आहां, केवढा मजवर उपकार केला हा !

हिरा॰ — मी तुमची मुदी घेतली, पण मला लाज वाटते, ही फार मोलाची आहे.

शिवा॰ — चांगली खरी, त्यांत तुझे बोटांत आहे ह्मणून तिची किंमत फारच वाढली; आणि आतां ही माझी आहे असें मला वाटत देखील नाहीं.

यमु॰ — तुह्मी मला ही असेंच उत्तर द्याल ह्मणून मी बोलत नाहीं.

गण॰ — रावसाहेब, बरवर ह्मणून मला हा कामाचा कागद दिला, त्यास हा आपला माघारा घ्या.

शिवा॰ — मुला, जाणून उसूनच हा कागद मीं तुला दिला. आतां तुझा बाप जर तुला मजजवळ देईल तर मी तुला शिलेदार करून घेऊन जाईन.

जग॰ — आमचें हित आपण कराल तें थोडेंच आहे, ईश्वरानें आह्मांवर कृपा करून आपलें येणें इकडे घडविलें.

गण॰ — खरेंच मला शिलेदार करितां ? वाहवा ! तर बरें आहे.

# दुखणाईतसरदार.

शिवा० — होय गड्या.

गण० — मी आतां तुम्हां बरोबर फौजेंत येतों, लोकांस बाबाचे नांवाचा विसर पडूं देणार नाहीं.

जग० — आपण जशी इतकी कृपा केली तशी आतां येवढी एक विनंती सेवकाची ऐकिली पाहिजे.

शिवा० — तुमचा अभिप्राय माझे लक्षांत आला. माझेही मनांत अगोदरच आलें आहे कीं, आजचा दिवस तुमचे येथें राहून तुमची मेजवानी घ्यावी, परंतु तुमचे यमुनाबाईचे मनास येईल तेव्हां.

यमु० — आमचा बाबा राहिला, आतां तुमची मर्जी असेल तंवर तुम्ही आमचे येथें रहावें.

हिरा० — आतां आणीक दुसरे आंबे घ्या.

यमु० — हे आंबे मघां तुमचे येण्यानें फार कडू वाटत होते, पण आतां फारच गोड लागतात.



# बाळमित्र.

## बापू आणि गंगा.

रामराव ह्मणून कोणी एक गृहस्थ व त्याची बायको पार्वतीबाई ह्या उभयतांनीं एक पोरका मुलगा त्याच्या लहानपणापासून बाळगला होता; त्याचें नांव बापू. त्यांनीं त्याचें लालन पोषण असें केलें, कीं कोणाचे मनांत हा बाळगलेला मुलगा असें वाटू नये, केवळ ह्यांचेच पोटचा असें वाटावें. त्या उभयतां स्त्रीपुरुषांस एक मुलगी मात्र होती, दुसरें अपत्य कांहीं नव्हतें; त्या मुलीचें नांव गंगा, ती बापूच्या बरोबरीची होती; त्या उभयतां मुलांची परस्पर प्रीति इतर मुलांपेक्षां विशेष असे.

ज्येष्ठमासीं एके दिवशीं सुप्रभातीं बापू आणि गंगा आपली मैत्रीण भागीरथी हीस बरोबर घेऊन बागांत खेळावयाकरितां गेलीं. गंगा व भागीरथी ह्या दोघी मुली आठ वर्षांचे आंत होत्या; त्या बागामध्यें फार वेळ खेळून आनंद पावल्या. एकीमेकीचा हात धरून गाणें गात गात झाडां खालून फिरताहेत, तं व त्या दोघीजणींची दृष्टि अंब्यांचे झाडावर पाड होते त्यांकडे गेली; त्या झाडावरचे पाड अगोदरच कोणी बहुत करून नेले होते, कोठें दहापांच वर राहिले होते, ते असे पिवळे धमधमीत होते कीं, पाहतांच तोंडास पाणी सुटावें, आणि कोणी ह्मणेल कीं, पाहणारा-

# बापू आणि गंगा.

स तोडून न्यावयासाठीं बोलावितांहेत, अशा त्या पाडांकडे त्यांचें मन वेधलें. बापू पुढें धांवत जाऊन त्या झाडावर चढला, आणि त्याचे हातास जितके पाड आले तितके तोडून खालीं दोघी मुली साडीचा पदर पसरून उभ्या होत्या त्यांजकडे टाकिले.

तेव्हां अशी कांहीं मौज झाली कीं, त्यांतून अलगलेले चांगले चांगले पाड तेवढे भागीरथीचे ओंटींत पडले, तेणें करून ती फार हर्षित झाली आणि तिची कांहीं दृष्टि फिरली; परंतु बापूनें जर दाटून तसें केलें असतें तर तिची दृष्टि फिरली हें नीटच होतें, कां कीं गांवांतील सर्व मुलांपेक्षां बापू फार सुंदर व गुणी होता, पण तसें कांहीं झालें नाहीं. मग ते चांगले पाड भागीरथी गंगास दाखवून ह्मणते, जाऊं दे तुझे पाड घाणेरडे, हे पहा माझे कसे चांगले आहेत ते! ते वेळेस गंगास फार वाईट वाटलें, आणि खिन्न होऊन तिनें तोंड खालीं घातलें; मग खेळणें संपे तेथपर्यंत गंगानें मुखांतून एक चकार शब्द देखील काढला नाहीं.

मग घराजवळ गेल्यावर भागीरथी गंगास विचारून आपल्या घरीं गेली. घरांत जाण्याचे अगोदर बापूनें गंगास विचारिलें कीं, ताई, तूं अशी रुष्ट कां गे दिसतेस? तुझा मजवर राग न सावा, भागीरथीस अंब्यांचा वांटा मिळाला ह्मणून तुझ्या मनांत

# बाळमित्र.

वाईट वाटूं नये, कां कीं, तूं पुरतें जाणतेस कीं, मी तुजवर अ-धिक प्रीति करितों, आणि त्या प्रीतीचें प्रमाण दाखवावयासाठीं मी झाडावरून चांगले चांगले पाड तुझ्याकडे टाकले; पण कसें झालें नकळे, सर्व चांगले पाड भागीरथीचे पदरांत पडले; त्याला माझा कांहीं उपाय आहे? बरें, ते पाड तिच्या पदरांतून निलाजऱ्या सारखे मला घेतां येतात? हें तूंच सांग बरें कसें तें. परंतु त्वां कांहीं येवढ्याश्या गोष्टीवरून नेणत्या पोराप्रमाणें रागें भरूं नये, आणि मजविषयीं तुला कधीं राग यावयाचा नाहीं हें मला पक्कं ठाऊक आहे. तुजविषयीं मी किती जीव देतों ह्याची खातरी एखादे वेळेस अवकाश सांपडेल तव्हां करीन. मी झाडावर असतांना तुला राग आणावा असें माझे मनांत नव्हतें. गंगा ह्मणाली काय मला राग आला? हें तुला कोणी सांगितलें? भागीरथीचे पाड किती का बापडे चांगले असेतना, मला काय करावयाचे आहेत. आधाश्या सारखें माझें चित्त कांहीं खाण्यावर नाहीं, हें तूं जाणतोसच; त्यामुळें मला राग आला असें नाहीं; पण तिनें आपले पाड दाखवून मला हिणावलें, तें मला सोसलें नाहीं. ह्यासाठीं माझी समजी व्हावी असें जर तुझ्या मनांत आहे तर तूं माझे पायां पडून क्षमा मागून घे, नाहीं तर मी तुशीं कधींच बोलणार नाहीं.

# बापू आणि गंगा.

बापू ताम्यानें बोलतो, पायां पडावें! ही गोष्ट मी कदा काळीं करणार नाहीं. मजकडून जर कांहीं अपराध झाला असता तर मग असो. परंतु अपराधा वांचून पायां पडलें असतां अपराध कबूल केला असें होईल. पण तुला मी एक गोष्ट खचीत सांगतों, मी कांहीं लबाड कृत्रिमी नव्हे. तुला रागें भरवावें हें माझ्या मनांत देखील नाहीं. ह्या उपर हें तुला खरें जर न भासलें तर मग तूं हा अन्याय करितेस. मग ती ह्मणाली, बरेंच फिरे बोलतोस; तूं माझें ऐकत नाहींस, आणि अनादर करितोस; ह्याचें कारण मला स्पष्ट कळून येतें कीं, तुझी भागीरथीवरच फार प्रीति आहे, आणि ह्मणून ती ही असें बोलली. ह्याप्रमाणें बोलून बापूकडे न पाहतां धिक्कारानें मान हालवून रागें रागें घरांत गेली.

इतक्यांत भोजनाचें सिद्ध झालें तेव्हां उभयतां भावंडें एका पंगतीस बसून भोजन करूं लागलीं, पण जेवतेवेळेस एकमेकांकडे फारच क्रोध दृष्टीनें पाहत असत. पाण्याचा तांब्या बापूचे आंगें होता ह्मणून गंगा पाणी देखील जेवण होई पर्यंत प्याली नाहीं. ही तिची चर्या बापूनें ओळखून त्यानें ही तिजकडेस पाहिलें नाहीं. तथापि मधून मधून चोर दृष्टीनें गंगा बापूकडे व बापू गंगाकडे पहात असत. एकवेळ उभयतांची एक दृष्ट झाली, तेव्हां गंगा तत्क्षणींच एकीकडे पाहूं लागली, हें बापूनें पाहतांच आपल्या मनांतू-

न गंगा फारच उतरली असा भाव दाखविला. मग जेवण झाल्या वर आईनें गंगास कांहीं विचारलें, तेव्हां गंगानें बापूचे रागामुळें आईशीं कांहीं धड उत्तर केलें नाहीं, ह्मणून आईस राग येऊन तिनें गंगास बाहेर घालविलें. तेव्हां ती रडकुंडें तोंड करून रागाचे भिरीरीनें खोलींतून निघून बागाचा दरवाजा उघडा होता तिकडे गेली. मग उदास होऊन बागाचे बंगल्यांत एक लहान खोली होती तेथें जाऊन आणखी पुष्कळ रडली. मग तिचे मनांत आलें कीं, मीं व्यर्थ बापूशीं कज्जा केला. अशी ती फार पस्ताई पडली, कां कीं ती कधींही रडूं लागली असतां बापू तिचें समाधान अगोदर करीत असे.

जेवावयाचे खोलींत बापू होता, तो गंगा आईस राग आणून बाहेर गेली हें पाहून मनांत फार खेद करूं लागला. आईनें व बापानें त्यास उत्तम आंबे दिले होते ते बहिणीस द्यावयाचा मनसोबा करून ते आंबे खिशांत लपवावयाचा यत्न करूं लागला; त्याचे मनांत कीं, एकदां कसेंही करून कोणत्या तरी निमित्तानें बागांत जाऊन तिला आंबे द्यावे, पण तो मनसोबा आईबापांस कळूं नये ह्मणून कांहीं युक्ति योजूं लागला. त्यानें ते आंबे घेऊन उगीच धुतले, खालीं ठेवले, पुन्हा हातांत घेतले, असें दहापांच वेळ केलें. तेथें जवळच मंगी व चिमणी ह्मणून

# बापू आणि गंगा.

मांजरीचीं दोन पिलीं एकमेकांशीं खेळत होतीं. बापूचे मनांत कीं, आईबापांनीं ह्या पिलांकडे पाहिलें ह्मणजे आपण आंबे खिशांत लपवावे, मग ह्मणतो अगे आई, अहो रावजी, तीं पहा मांजरीचीं पोरें कशीं मौजेनें खेळताहेत! तुह्मांस हसतां हसतां पुरे होईल, तुह्मी अंमळ मागें तर फिरून पहा. मग बापानें अंमळ मांजरांकडे तोंड करून, अंः त्याला काय पहावयाचें आहे असें ह्मणून लागलेंच पुन्हा इकडे तोंड फिरविलें. इतक्यांत बापू खिशांत आंबे ठेवणार होता तो मातक्यान हातांत घेऊन खालींवर पाहूं लागला. पार्वतीबाईनें तें बापूचें कसब पाहून मनांत समजली आणि आपल्या भर्त्यास दुसरेकडे पाहण्याची खूण केली, तेव्हां तो मागें तोंड फिरवून मांजरांकडे पाहिलेंसें करून कांहीं हांसला. बापूचे मनांत कीं, ही माझी युक्ति कोणास समजली नाहीं. आतां आपण बाहेर जाण्याचा यत्न करावा, असें मनांत आणून लटकेंच आंबे चोरवून टाकल्या सारखें केलें आणि एक आंबा आंगरख्याचे घोळांत व दुसरा अंगवस्त्रांत लपविला, इतक्यांत तीं दोघें स्त्रीपुरुषें कांहीं एकमेकांशीं बोलूं लागलीं, तंव बापूचे मनांत आलें कीं, बाहेर जाण्याला आतां ही मवड बरी आहे, मग मांजरांचे मागें धांवून कांहीं दांडगाई व गलबा करूं लागला, तेव्हां आईनें ह्मटलें, कांरे, आमचे बोलण्यांत गलबा मांडला आहेस, जा येथून बाहेर.

तेव्हां असें व्हावें हें बापूचे मनांत अगोदरच होतें, मग कांहीं हिरमुसल्या सारखें करून मांजरांचे मागें धरावयासाठीं ह्मणून धांवला. धांवतां धांवतां चपळाईनें एक आंबा खिशांत व दुसरा पागोट्यांत लपविला, तीं मांजरांचीं पोरेंही बागाकडेसच पळालीं. हाही धूम ठोकून त्यांचे मागें जाऊं लागला.

आई ह्मणाली, बापू, तूं कुठेरे जातोस? तेव्हां तो उभा राहून उत्तर देतो, मी बागांत फिरावयास जातों; मग ती ह्मणाली, कांहीं काम नाहीं तिकडे जाण्याचें; अशीं अक्षरें तिच्या तोंडांतून निघतांच बापूनें किलवाणी तोंड करून ह्मटलें, आई, मी तुझ्या पायां पडतों, मला अंमळ बागांत जाऊंदे; मी कांहीं दांडगाई करणार नाहीं; मग आई बोलली, बरें तर जा.

मग बापूचा आनंद किती ह्मणून सांगावा! लागलीच धांव मारली, तंव पाय अडखळून पडला, पण दैवयोगानें आंब्यास किंवा हातापायांस कांहीं धक्का लागला नाहीं, ह्मणून मग तत्क्षणींच उठून बागांत गेला, आणि सर्व ठिकाणें सोधलीं, मग बंगल्यांत गेला तों ती तेथें गंगा त्याचे दृष्टीस पडली. मग पहातो तों अति खिन्न होऊन डोळ्यांतून अश्रुपात टाकिती आहे. तिनें बापूस दुखविलें व आईही रागें भरली ह्मणून तिची वृत्ति केवळ उदास झाली होती.

# करनकरीस्वभावाचें वर्णन.

बापू तिला नमून बोलला, माझे आई, आतां तुझी माझी गडी असावी ! तूं मजवर रागें भरूं नको; माझे मनांत तुला राग आणावा असें जर असतें, तर मी क्षमा मागितली असती; परंतु जर तूं क्षमा मजपाशीं मागशील तर मी तुजपाशीं मागेन. आतां तुझी माझी पहिल्यासारखी मैत्री होऊं दे. हे घे दूरसाल आंबे मी तुजसाठीं आणले आहेत; तूं एथें होतीस म्हणून मला हे गोड लागले नाहींत. असें ऐकतांच गंगा त्याचे खांद्यावर डोकें ठेवून रडत रडत म्हणाली, तूं मजवर लहानपणापासून माया करितोस, हें मला पुरतें आठवतें. मातस्यान स्फुंदून स्फुंदून म्हणते, माझे सख्या, बापूराया, मी कांहीं आंब्यांकरितां रागें भरलें नाहीं; तूं असें मनांत आणूं नको, पण त्या द्वाड भागीरथीनें मजशीं चढून गोष्ट सांगितली, म्हणून मला राग आला. पण तो राग आतां माझा गेला; हा माझा अन्याय तूं मनावर घेऊं नको. असें बोलतां बोलतां बापूचे खांद्यावरचें असूं आपल्या साडीचे पदरानें पुसून म्हणाली, तुला कधीं कधीं चिडवावें असें मला आवडतें खरें, पण आतां हे तुझे आंबे तूंच खा, मी खाणार नाहीं.

बापू म्हणाला, बरें बाई, तुझ्या मनास येईल तितकें तूं मला चिडीव, पण मी दुसऱ्या कोणाला चिडवूं देणार नाहीं. पण तूं आंबे कां घेत नाहींस ? तुजवांचून माझ्यानें हे आंबे कसे खाववती-

# बाळमित्र.

ला? हें मीं पहिल्यानें तुला सांगितलें, आणि आतांही सांगतों, मी कधीं लबाड बोलावयाचा नाहीं; माझी प्रकृति तुला माहीत आहेच. गंगानें उत्तर केलें कीं, हे आंबे मला नकोत; त्यांनींच इतका राग आणला; असें ह्मणून तिनें ते आंबे तिरस्कारानें रस्त्यावर फेंकून दिले, आणि ह्मणाली, बापूराया आपण गडी झालों, पण मी आतां आईकडे कशी जाऊं? आईकडे जाणें घडतें तर मौज असती. मग बापू ह्मणाला, थांब, हा मी आईकडे जाऊन तिची रजा घेऊन येतों. असें बोलून धांवत जातां जातां ह्मणतो, तूं तिजवर रागें भरलीस ह्याचें कारण मीच, कां कीं मीं प्रथम तुला रागें भरविलें होतें, हें मी आईला सांगतों. इतकाराज्ञ ओरडतां बोलतां लांब गेला.

मग तो आईजवळ जातांच आईनें त्या मुलांचा मनोरथ तत्क्षणीं सिद्धीस जाऊं दिला. अशा त्या दोन मित्रांचें मित्रत्व पाहून कोणी स्वशील सद्गुणावर दृष्टि देऊन दुसऱ्याचा दुर्गुण मनांत आणणार नाहीं.



## करनकरी स्वभावाचें वर्णन.

### जनाबाई आणि तिची कन्या मनी

मनी — नाहीं आई, परकरापेक्षां कांचोळीच अगोदर शिवा-वी असें मला वाटतें.

जना० — अगे, अगोदर एवढा परकराचा चीण शीव; मग पा-हिजे तर कांचोळी शिवावयास लाग. तुझ्या चुलत बहिणी-ला परकरच आवडतो, ह्यासाठीं आधीं तेवढा तो तयार कर, मग दुसरें काम हातीं घे.

मनी — तें नाहीं मी करावयाची; अगोदर कांचोळीच शिवी-न, ती तिला आवडते.

जना० — अगे, कांचोळी अझून बेतली देखील नाहीं; शिवने-स काय? परकराचा चीण राहिला आहे, तेवढा शीव, म्ह-णजे काम झालें. तुझे चुलत बहिणीचा आज वाढदीस आ-हे, ह्याकरितां तिला तूं परकर शिवून दे; कांचोळी मी आ-पल्या जवळची देतें. तिला कांहीं द्यावयास नेल्यावांचून तां तिजकडे जाऊं नये, असें मी म्हणतें.

मनी — आई, तूं म्हणतेस तें खरेंच आहे; पण मला वाट-तें कीं कांचोळी इतक्यांत बोलतां बोलतां तयार होईल.

जना० — मुली, ह्या कामाचा विचार अगोदर कर, तुला ठाव

क, आहे कीं, तुझी मावशी व भावजय मागल्या प्रहर दिवस राहतां तिकडे जाणार आहेत? तुझा जर परकर झाला नाहीं तर तुला कांहीं त्या आपल्या बरोबर नेणार नाहींत.

मनी — त्या कांहीं प्रहर दिवस राहतां जाणार नाहींत, चार घटका दिवस राहतां जातील.

जनी० — काय पोर हुजतखोर पहा! अगे, मी इतका जीव तोडून तुला सांगतें तरी तूं आपलें सोडीत नाहींस; हा तुझा वाईट स्वभाव कधीं जाईल आणि कधीं बुद्धीवर येशील, बाई?

मनी — पण, त्या केव्हां जाणार हें मला जर खचीत ठाऊक असलें तर मग?

जनी० — बरें, बरें, पाहीन आतां; हातच्या कांकणास आरसा कशाला? आरशाची गोष्ट राहूं दे, पण माझी एवढी गोष्ट ऐक; तिसरे प्रहरीं त्यां बरोबर जावयाला सिद्ध ऐस, ह्मणजे झालें.

मनी — असें काय? तर पहा, मी कांचोळी शिवून तिसरे प्रहरींच तयार होऊन बसेन; पण एथें मला कांहीं सुचत नाहीं; मी आपली बागाच्या बंगल्यांत जाऊन शिवीत बसतें. तेथें म

# करनकरीस्वभावाचें वर्णन.

ला पावघटका कमीच लागेल.

ना० — कशावरून?

नी — तिकडे मी आपली एकटी, दुसऱ्याची गडबड नाहीं, आणि उजेडही पुष्कळ आहे.

ना० — तूं तिकडे जाण्या येण्याखालींच वेळ गमावशील; शाळू दिवस आतां भरकन निघून जाईल.

नी — जाईनाकां मेला गेला तर; पहा मी इतक्यांत कशी शिवून तयार करतें ती एथल्यापेक्षां तेथें माझें काम दहा वांटे अधिक लौकर होईल.

ना० —मी तुला सांगून ठेवितें, हें कांहीं शेवटास जाणार नाहीं, आणि तुझें ही जाणें होणार नाहीं; मग हाका मारशील. माझें सांगणें तूं ऐकत नाहींस पण त्याचें फळ तुला भोगावें लागेल ही खूणगांठ बांधून ठेव.

नी — कांहीं का होईना, मी आपली भोगीन. ही पहा मी आतां धांवत धांवत बागांत जातें.

मनी बागाकडे धांवत धांवत गेली. बागांत पोहचल्यावर श्रमभ्रम टाकतां टाकतां स्वस्थ होण्यास तिला एक घटकाभर उगीच सावें लागलें, नंतर हातांत फर्ड घेऊन शिवूं लागली, तों धांवल्याकें जो तिच्या हातां पायांस कंप झाला होता त्याचे योगानें तिला टां-

का देखील मारवेना; शेवटीं आणखी घटकाभर बसून जेव्हां स्वस्थ झाली तेव्हां मग शिवूं लागली. शिवतां शिवतां तें काम अधिकच वाढत चाललें असें तिला दिसूं लागलें, इतक्यांत तिची आई तेथें आली.

जना० —— एथें फार चांगलें शिवणें होत असेल, झाली का कांचोळी तयार ?

मनी —— नाहीं, अझून झाली नाहीं. पण दिवस चारच घटका राहिला असें नाहीं, अझून पुष्कळ आहे.

जना० —— तुझें खरेंच आहे पण, तिसरे प्रहरचा चवघडा वाजून गेला.

मनी —— अझून कांहीं चवघडा वाजला नाहीं, माझे कान तिकडेसच आहेत.

जना० —— तर मला कसा ऐकूं आला कोण जाणे; तुझ्या मावशीनें ही ऐकिला असावा; ती नवें लुगडें नेसून जावयास निघाली आहे, हें तूं आतां पाहशील.

मनी —— आई, तूं मला उगीच भिववितीस; इतक्यांत कोठली जावयाला ती.

जना० —— तुला सारेंच खोटें वाटतें. पहा ती आंगावर दागीने घालून शालजोडी पांघरते आहे; ह्या पहा तुझ्या बहिणी आ-

# करनकरीस्वभावाचेंवर्णन.

ल्या व भाऊ आले.

मनी — अहाग आई, आतां कसें करूं, असें पण कसें झालें?

भाऊ — (आंत येऊन ह्मणतो.) मनुबाई, मनुबाई, चलचल लवकर, मावशी तुजसाठीं खोळंबली आहे.

मनी — बाबा, अंमळसा दम रवा एक क्षणभर.

भाऊ — अगे तिसरे प्रहरचा चवघडा तर वाजून गेला; मावशीनें जेयते वेळेस सांगितलें नाहीं कीं चवघडा वाजतांच जावयाचें ह्मणून? चार घटिका दिवस राहतां तिला माघारें आलें पाहिजे, कारण कीं रामराव भाऊची बायको भेटीला येणार आहे.

जना० — कां, पाहिलें, मने? मी तुला मघापासून हेंच सांगतेंना?

मनी — तर मग आतां कसें करूं आई? (मनीच्या तिघी बहिणी आंत येऊन मोठ्यानें हाका मारितात) चलचल. लवकर ये.

मनी — हां हां, पण इतकी उतावळी कां मांडली आहे?

भाऊ — काय मने, कांचोळी अझून तयार नाहीं? ही पहा, मी आपल्या चुलत बहिणीला कशी कुंची घेतली आहे ती.

पहिलीबहीण — मीं, पहा, तिच्या जरीकांठी फडकी यावया·

ला घेतली आहे.

दुसरीबहीण — मीं तिला खेळावया करितां रुपेरी बाहुल्यांचा जोड घेतला आहे (मावशी आंत येते.)

मावशी — मने, ठाऊक नाहीं तुला मी केव्हां जाणार ती? मी कधीं कोणाचा खोळंबा करीत नाहीं, आणि कोणासाठीं खोळंबणार ही नाहीं; तुला लवकर यावयाचें असलें तर ये, नाहीं तर बैस घरीं.

मनी — मावशी, अंमळ थांब, आतां थोडें राहिलें आहे माझें शिवणें.

मावशी — (सर्व मुलांस बाहेर चला ह्मणते.) बरें तर मने, आह्मी जातों आतां, तूं बैस शिवीत; तुला काम आहे ह्मणून आह्मी तेथें सांगूं. ( सर्व बाहेर निघून जातात.)

मनी — ( रडकुंडें तोंड करून ह्मणते.) आतां काय करूं? फार दिवस माझे मनांत होतें कीं, मी आपले बहिणीस सर्वांपेक्षां चांगली देणगी देईन, तें आज सारें व्यर्थ गेलें; मी अवघ्यांमध्यें मोठी असून घरीं राहिलें, तर मला आतां काय ह्मणतील?

जना० — मला तुझी दया येते खरी, पण तूं माझें कुठे ऐकतेस? तूं अगोदर परकराचा चीण शिवून मग कांचोळीचे नादीं

लागतीस, तर इतकें कशाला होतें. मावशी चार घटका दिवस राहतां जाणार हें जर मनांत न आणतीस, आणि इकडे येण्यांत दोन घटका व्यर्थ नघालविर्तीस, तर आतां तुला तोंड खिन्न करावें लागतेंना; असो, आतां झालें तें बरें च झालें; गेल्या गोष्टीचा खेदकरून काय फळ?

मनी — पण, माझा काका व काकी मला काय ह्मणतील? त्यां चे मनांत येईल कीं, तिनें कांहीं वाईट काम केलें असेल, ह्म णून आईनें पाठविली नाहीं; आणि ह्मणतील, तिला आम चे घरचे कार्याचें सख नाहीं, व बहिणीचे कोडकौतुकाची हौस नाहीं.

जना० — त्यांचे मनांत असें येईल हें तुला वाटलें नापर?

मनी — आई, आतां आणखी तूं मला शब्दाच्या फांसण्या मारूं नको.

जना० — मने, मी कांहीं तुला लावून बोलत नाहीं; तूं गेली नाहींस ह्मणून मला देखील वाईट वाटतें; पण काय करूं? अ सो, तुझें समाधान व्हावयाजोगी मला कांहीं युक्ति सुचली आहे.

मनी — तर बरें आहे आई, मी ही इतक्यांत कांचोळी शिवून तयार करितें. तूं नि मी तशी मागून जाऊं; माझी कांचोळी

पाहून काका काकी फार आनंद पावतील, आणि ह्मणती ल कीं, ही त्याच कामांत होती ह्मणून हिला इतका उशीर लागला; तर आई, तूं बासनांतून नवें लुगडें काढतीस तंव मी इतक्यांत कांचोळी तयार करितें.

जना० — मी नाहीं जावयाची; निलाजऱ्या सारखें मागून जा णें फार वाईट आहे. हा तुझा करनकरी स्वभाव तुझ्या मा वशीला आवडला नाहीं, ह्मणून ती तुला टाकून गेली; प ण आतां माझें ऐक; तिकडे जाण्यांत जें तुला सुख मिळाव याचें तें इकडे राहिल्यानेंच अक्षयी मिळेल, अशी कांहीं युक्ति सांगतें.

मनी — ती कोणती, आई ?

जना० — अगे, युक्ति हीच कीं, आजपासून तूं हा वाईट स्व भाव टाकून दे, आपल्याच हेक्यानें वागत जाऊं नको; आ ईबापांचें कांहीं ऐकतजा, कांकीं त्यांना तुजपेक्षां अधिक समजतें; ह्यांत तुझें कल्याण आहे, आणि त्यांच्या सांगी प्रमाणें वागावयास कांहीं फारसें अवघड नाहीं; तूं शहा णी आहेस ह्मणून तुला सांगतें.

मनी — बरें आई, मी आजपासून तुझ्याच शिकवणी प्रमा णें वर्तेन.

# करनकरीस्वभावाचेंवर्णन.

जना० — फार चांगलें आहे; सोमवारा पावेतों हा तुझा करनकरी स्वभाव सुटला, ह्मणजे तुला मी आपले बरोबर तुझे काकीकडे नेईन; परकर व कांचोळी तुजकडून तुझ्या बहिणीस नेसवीन; तेव्हां मग त्यांस वाटेल कीं, परकर कांचोळी तयार नव्हती ह्मणून पोर आली नाहीं.

मनी — (गहिंवरून ह्मणते.) आहा, आई, तुझे शिकवणीची गोष्ट मी कधीं विसरणार नाहीं.

जना० — शाबास मने! माझें सांगणें तुझ्या मनांत ठसलें एवढ्यानें मलाही फारच आनंद वाटतो; तूं अशी उत्तमगुणानें वागशील तर तुझी जिकडे तिकडे वाहवा वाहवा होईल.



# बाळमित्र.

## दोन कुतरे

### मोगऱ्या आणि गुल्या.

रामजी पाटील ह्यानें दोन वणजारी कुतरे बाळगले होते; एकाचें नांव मोगऱ्या व एकाचें नांव गुल्या. हे (उभयतां) दोन्ही कुतरे एकदांच उपजले होते. पाटील नित्य एका परळांत भाकरी घालून दोघांस बरोबरच खावयास घालीत असे, व दोघांवर सारखीच प्रीति करीत असे; परंतु थोडक्याच दिवसांनीं उभयतां कुतऱ्यांचें आचरण वेगवेगळालें दिसण्यांत येऊं लागलें. मोगऱ्या फार चांगल्या गुणाचा कुतरा निपजला, आणि गुल्या फारच द्वाड निघाला.

मोगऱ्याचा लाड कोणीं केला असतां त्यानें हर्षानें उड्या माराव्या, व कोणी गुल्याचा लाड करूं लागलें असतां त्याचें दुःख नमानितां त्यानें आनंदमय असावें; आणि त्या गुल्याचा लाड धनी करीत असतां त्यासमयीं जर कोणी मोगऱ्याचा लाड करूं लागलें तर त्या द्वाडानें तें नसोसतां त्याच्या आंगावर गुरकावें. कोणी शेजारी गृहस्थ आपला कुतरा बरोबर घेऊन रामजी पाटलाचे गृहाश्यांत आला असतां मोगऱ्यानें त्या कुतऱ्याचे आंगावर नजातां त्याशीं मिळून घेऊन त्याशीं अंगणांत खेळा-

# दोनकुतरे.

वें; ह्यामुळें परकी कुतऱ्यास मोगऱ्या जवळ जावयास फार आनंद वाटे. गुल्यानें परकी कुत्रें पाहिलें ह्मणजे अगोदर त्याचे आंगावर भुंकावें, कदाचित् तें जवळ येऊं लागलें तर गुरगुरावें, आणि एकदांच स्व्यांव करून त्याचे आंगावर धांवून जावें; शेवटीं त्याचे हातापायांला जाऊन डसावें. धन्यानें एखादा चांगला कुतरा पाहून त्याचे आंगावरून हात फिरविला असतां ह्या दुष्टाचें जसें घरच बुडालें असें त्याला वाटून त्यानें अतिशय रडावें.

गुल्याचे द्वाडस्वभावामुळें रामजी पाटील नेहमी त्याचा कंटाळा करी, परंतु त्यामुळें मोगऱ्यावर फारच त्याची प्रीति जडत चालली.

एके दिवशीं रामजी पाटील जेवावयाला बसला असतां त्याचे मनांत आलें कीं, ह्या दोन्ही कुतऱ्यांची परीक्षा पहावी, ह्मणून आपण जातीनें अगोदर गुल्यास जवळ बोलावून त्याचे आंगावरून हात फिरवून, येबेटा, असें ह्मणून त्यास खावयाला दिलें. त्यासमयीं मोगऱ्या दूर होता; त्याचे पायांखालीं दोन कुतरीं होतीं, पण त्याचे मनांत धन्यास कटकट होऊं नये ह्मणून तसाच दूर बसला होता. पाटलानें प्रथम गव्हांचे पोळीस तूप लावून ती गुल्याचे पुढें टांकिली, तेवेळेस मोगऱ्याचे मनांत आलें कीं, जेव्हां

माझी पाळी येईल तेव्हां मलाही मिळेल, अशा समजुतीनें त्या पोळीकडे न पाहतां उगीच बसला होता; नंतर पाटलानें त्यास बो लावून त्याचे पुढें नागलीची भाकर आठ चार दिवसांची शिळी वाळलेली होती ती टाकली. तेव्हां सद्गुणी कुतरा मनांत कांहींच खेद न आणितां संतोषानें त्या भाकरीचा स्वीकार करून खाऊं लागला; तेव्हां त्या द्वाड मत्सरी गुल्यानें पाहिलें कीं, आप त्यापेक्षां मोगऱ्याची भाकर वाईट आहे, पण आपल्या द्वाड स्वभावा वर जाऊन, तो आपली सुंदर पोळी टाकून मोठ्यानें गुरगुरून त्या मोगऱ्याची भाकर घ्यावयास धांवला; ते समयीं मोगऱ्यानें त्याशीं कांहीं खटला नकरितां मुकाट्यानें त्यास ती आपली भाकर दिली.

मोगऱ्या गुल्यापेक्षां बळहीन होता असें नाहीं, त्यापेक्षां परा क्रमी होता; कांतर दोन तीन दिवसांचे अगोदर एके दिवशीं गुल्या नें बाहेरच्या कुतऱ्यांशीं भारी कलागत केली होती तेव्हां गुल्यास फा डून टाकावें अशा बेतानें त्या कुतऱ्यांनीं त्याला भुईवर पाडून त्याची अवस्था फारच कठीण केली; ते समयीं मोगऱ्यानें मनांत द्वेष न ठेवितां सर्व कुतऱ्यांचा पराभव करून त्यांस पिटाळून लाविलें; मग त्या द्वाडास पाटलानें उचलून घरांत आणिलें, असें झालें होतें; त्यावरून पाटलाची खातरी झाली कीं, केवळ भिऊन मो गऱ्यानें आपली भाकर दिली असें नाहीं, ममतेनें दिली.

# दोनकुतरे.

मग पाटलानें गुल्यापुढची पोळी उचलून मोगऱ्यापुढें टाकली, आणि ह्मणाला, तुझे भावानें तुजपुढची भाकर घेतली, आतां तूं त्याची ही खा, हें तुला योग्य आहे. असे गोडशब्द ऐकून मोगऱ्यानें आनंदाची मुद्रा दाखविली; तें पाहून गुल्या त्याचे आंगावर गुरगुरूं लागला. अशी त्याची दुष्ट वर्तणूक पाहून पाटील बोलला, पहा, हा काय द्वेषी कुतरा द्वाड आहे तो! रे मोगऱ्या, हा इतका तुझा हेवा करतो तथापि तूं कांहीं मनास आणीत नाहींस, असा सद्गुणी तूं आहेस, त्यापक्षीं आजपासून तूं माझे खासगीचा कुतरा होशील, आणि हा मळा मी तुझे स्वाधीन करून तुला मोकळें सोडीन. तुझे भावाचे स्वाधीन चौकांतील भोंवरकडी मात्र केली आहे; असें बोलून एक लोखंडाची सांखळी आणून गुल्यास कडाशीं बांधून टाकिलें, आणि मोगऱ्यास मोकळें ठेविलें.

अशी मोगऱ्याची जर अवस्था झाली असती, तर गुल्याला फारच हर्ष झाला असता; पण मोगऱ्या तसा नव्हता, भावासाठीं त्याचें अंतःकरण फार द्रवूं लागलें; तो वारंवार जाऊन त्याचा समाचार घेई.

धन्यापासून जें काय मोगऱ्यास मिळे तें त्यानें गुल्याकडे न्यावें, आणि त्याचा संतोष व्हावा ह्मणून शेपूट हालवून मोठ्या हर्षा

नें उड्या माराव्या, आणि तें भक्ष्य त्यापुढें ठेवावें; रात्रीस त्याजपाशी येऊन त्याचें दुःख उणें व्हावें ह्मणून त्याला चाटावें, व त्याचे आंखडलेले हातपाय मोकळे व्हावया करितां तितक्याच जाग्यांत त्याजकडून उड्या मारवाव्या.

तथापि गुल्याचा तो दुर्गुण गेला नाहीं; मोगऱ्याचा सत्कार त्या ह्राडानें कधींच केला नाहीं; मोगऱ्या जवळ आला असतां भोंकल्या वांचून बापडा कधीं उगा राहिलाच नाहीं; असें होतां होतां कांहीं का दिवसांनीं मृत्यूनें त्याचें गाऱ्हाणें ऐकून त्यास नेलें.

हे मुलांनो, ही गोष्ट वाचून ध्यानांत आणा कीं, दुष्ट चालीनें चालणें व दुसऱ्याचा हेवा करणें ह्याचा परिणाम चांगला होत नाहीं; हेव्यानें व पापाचरणानें आयुष्याचा नाश मात्र होतो; अशा आचरणांत लाभाची जात देखील नाहीं, केवळ शरीरास दुःख दाटणी मात्र आहे; ह्यासाठीं द्वैत भावाकडे लक्ष्य न ठेवितां सर्वत्र समान दृष्टीनें आचरण करावें ह्यांत कल्याण.



# द्वाष्टमुलगी.

काय, तूं माझें ऐकत नाहींस? बरें,आतां ऐकतोस कीं नाहीं? जर ऐकत नाहींस तर मी कधीं तुझें तोंड पाहणार नाहीं; ह्या प्रमाणें उमा नामें एक द्वाष्ट मुलगी होती ती आपले भावास वारंवार बोलून गांजीत असे, आणि सर्वकाळ आपलें वर्चस्व त्याजवर ठेवीत असे.

तिचे मनांत माझा भाऊ जें काय करतो तें नीट करीत नाहीं; वारंवार चुकतो; तो मजप्रमाणें करीत नाहीं; मी यथायोग्य चालीनें चालतें; सर्वलोकांनीं देखील माझे शाहणपणाचा कित्ता घ्यावा.

भावानें कांहीं एक खेळ खेळावयाचें नांव घेतलें ह्मणजे तिनें त्या खेळाची अगदीं हेटाळणी करून टाकावी; मग दुसरे दिवशीं तोच खेळ खेळावयास पुन्हा भावाला बोलवावें; असा तिचा हेकड स्वभाव भावाला मानणें प्राप्त झालें. एखादे वेळेस त्यानें तिचें ह्मणणें नऐकिलें तर तिनें बोलबोलून त्याला पुरेपुरेसें करावें. कदाचित् भावानें त्रासून, तुझें बोलणें रीतीचें नाहीं, असें ह्मटलें असतां लागलेंच तिनें इंगळा सारखें लाल होऊन आदळ आपटीवर यावें; मग त्याला एखादे कोंपऱ्यांत जाऊन उगीच बसावें लागे.

हा तिचा स्वभाव घालविण्या करितां आईबापांनीं तिला फा

र छाडिलें, तथापि गेला नाहीं; त्यांत बापापेक्षां आईनें फारच यत्न केला; ती वारंवार तिला बोध करी, अगे, तूं मुलीची जात, तुझ्या आंगीं जर असा द्वाष्टपणा व उद्दामपणा राहील तर तुला कोणी पायपोसा जवळ देखील उभें राहूं देणार नाहीं. नम्रपणानें सर्वांशीं राहून मृदुभाषण बोलत जावें, सर्वांपेक्षां आपण शाहणी, असें मानून उगीच आपले जागीं आढ्यता आणतीस, हें फार वाईट; ह्यांत कांहीं चांगुलपणा नाहीं; अशी शिकवणीची गोष्ट आई सांगे, पण ती तिच्या मनांत कधींच ठसली नाहीं. तिचा भाऊतर अशी तिची जाळणूक नित्य सोसतां सोसतां त्रासला; शेवटीं तिजवरची प्रीति पहिल्यापेक्षां त्याची कमी होऊं लागली, तथापि तिचा कांहीं द्वाष्टपणा गेला नाहीं, दिवसें दिवस अधिकच झाला.

एके दिवशीं उमाचे आईनें एके गृहस्थास जेवावयाचें आमंत्रण करून घरीं बोलाविलें; तो गृहस्थ मोठ्या कोटींतला संभावित, परंतु मोठा कडकडीत व स्पष्ट बोलणारा होता, आणि उमाचे आईच्या मनांतील जो अर्थ त्यासारखें बोलून उमाचा कानटोंची असा होता; त्यानें ते दिवशीं उमाची तीचाल पाहिली. ती भावाशीं व आईबापांशीं फारच गर्वानें व दांडगेपणानें वागते असें पाहून तो परका पुरुष, त्यावेळेस तिची कांहीं मर्यादा ठेवावी ह्मणून, अमळ उगाच बसला, कांहीं बोलला नाहीं. पण त्याचें त्याला सहन होईना; मग थोडक्याचे

# दांष्टमुलगी.

ळा नंतर तो तिचे आईस ह्मणूं लागला, तुमचे मुली सारखी जर मला मूल असती, तर फार चांगलें होतें. कांहीं एक उपाय करून म्यां तिला मोठीशी पदवी दिली असती.

मग ती ह्मणाली, तें कसें काय? तेव्हां तो बोलूं लागला कीं, मला शिपायांची कवाईत पाहण्याचा फार छंद आहे; जेव्हां जेव्हां मला अवकाश सांपडतो तेव्हां तेव्हां मी कवाईत पहावयास जात असतों; हा मी आतां तिकडून लश्करांतूनच आलों; तेथें मीं कितीएक शिपाई असे पाहिले कीं, ज्यांला मिशा भल्या मोठमोठ्या, व जे उंच धिप्पाड, ज्यांचें स्वरूप उग्र, ज्यांचा स्वभाव अतिक्रूर, व ज्यांचा उद्धटपणा तर फारच होता; ह्मणून आतां मला असें वाटतें कीं, जर तुमच्या उमा सारखी मुलगी मला असती तर लागलेंच तिच्या तोंडावर मिशा चिकटवून, विजार घालून हातांत ढाल तरवार देऊन, त्या शिपायांचा सुभेदार तिला केलें असतें; मग ती फारच शोभती; आणि तिच्या मनास येईल तितका उद्धटपणा मिरवावयास तिला आज्ञा दिली असती.

असें त्या गृहस्थाचें बोलणें ऐकतांच उमा मनांत फारच खजील झाली; तिचें तोंड अगदीं उतरलें; शेवटीं रडूं देखील लागली, आणि तिच्या मनांत पक्कें बिंबलें कीं, हा माझा स्वभाव फारच वाईट आहे, ह्याचा परिणाम ठीक नाहीं, आतां चांगला स्वभाव

धरावा. असा बुद्धीचा निश्चय करून त्या दिवसापासून ती मुलगी आईबापांचे शिकवणी प्रमाणें स्वस्वभावानें वागूं लागली.

आईबापांचा उपदेश ऐकून तिनें अगोदरच जर आपली कुचाल सोडली असती, तर फार चांगलें होतें; कांतर परकी गृहस्थानें उपरोधीक भाषण केलें कीं, साडीचोळी टाकून, ढाल तरवार बांधून, पुरुषाचा वेष घेतला ह्मणजे फार शोभा येईल, अशा भाषणापेक्षां वडिलांची शिकवणी फार चांगली होती; परंतु ती तिचे लक्षांत प्रथम आली नाहीं.

कोणालाही वाईट खोड असली तर त्यानें वडिलांचे शिकवणीवरून ती सत्वर टाकून द्यावी; कारण कीं, तो परकी गृहस्थ जसा त्या मुलीस घालून पाडून बोलला, तसे लोक आपणाला बोलतील; ह्याहून दुःख दुसरें नाहीं, त्यापेक्षां मरण बरें, ह्यासाठीं अगोदरच वडिलांची आज्ञा मानून सुख पावावें हें चांगलें; परक्याचे बोलण्या पर्यंत वाट पाहूं नये.

---

# खोंक.

काशिनाथ नामें मुलगा फार सदय, हास्यमुख, व गुणाचा होता; ज्याची वृत्ति सदां आनंदित असे. फारतर काय सांगावें, पण त्याची आकृति आणि उत्तम रीति पाहून सर्व लोकांचे मनांत त्याविषयीं प्रीति उत्पन्न व्हावी, इतके गुण त्याचे आंगीं होते; पण त्याला एक मोठी वाईट खोड होती, ती हीच कीं, स्वल्प कारणावरून त्याला मनस्वी क्रोध येई; त्या मुळें त्याचे मित्र फार खेद पावत असत.

एखादे वेळेस काशिनाथ आपल्या सोबत्यां संगतीं कांहीं खेळत असतां, त्यांत जर दुसरा कोणी कांहीं बोलला तर त्या मुलाला असा अतिशयित राग यावा कीं, त्यानें रक्तासारखे डोळे करून भुईवर हातपाय आदळावे, शेवटीं वेड्यासारखें होऊन मोठ्यानें ओरडावें देखील.

एके दिवशीं बापानें त्यास सांगितलें कीं, तूं आपले बहिणीकरितां कळसूत्राचा खेळ करीव; अशी बापाची आज्ञा झाली त्यावरून तो मुलगा तमाशाचे विचारांत पडला असतां, आपले खोलींत फिरतां फिरतां त्याविषयींचा मनसोबा आपले मनांत करीत होता; इतक्यामध्यें त्याचा जिवलग मित्र, गोविंदा, हा कांहीं त्यास विचार विचारावयास आला. काशिनाथ तमाशाचे विचारांत निमग्न होता, म्हणून त्यानें गोविंदाकडे पाहिलें नाहीं. गोविं

दानें तीन चार वेळां काशिनाथ, काशिनाथ, ह्मणून हाका मारल्या, तरीं त्यानें पाहिलें नाहीं; तेव्हां जवळ जाऊन त्याचे आंगरख्याचा पदर ओढला. अगोदर त्याचें चित्त भ्रमामध्यें पडलेंच होतें, त्यांत आंगरख्याला हिसका बसतांच झटकन मागें वळला, तों त्या फिरण्यानें त्याचा धक्का गोविंदास लागून तो जिन्याच्या पायऱ्यांवरून गडबडत गडबडत खालीं आला, आणि अचेतन होऊन पडला. जिन्यांतून गडबडतें वेळेस कानशिलापाशीं पायरीचा कांठ लागून खोंक पडली; तींतून भडभडां रक्त वाहूं लागलें, श्वासोच्छ्वास बंद झाले, आणि डोळे पांढरे करून मृतप्राय झाला. हा अनर्थ त्या काशिनाथानें पाहतांच त्याची बोबडी वळली, तोंडचें पाणी पळालें, हातपाय गळाले, आणि हाय हाय अनर्थ झाला, असा मोठ्यानें शब्द करून हंबरडा फोडला. तो सद्गुणी सुकुमार मुलगा, आपल्या मित्रासाठीं प्रसंगीं प्राण ही खर्चणार, त्याला आपल्या हातानें आणलेलें असें संकट प्राप्त झालें; अशी गोष्ट आपल्याकडून घडेल ह्याची त्याला अगाहीं नव्हती.

इतक्यांत अशी त्या मुलाची आरड ऐकतांच त्याचा बाप गलबलून धांवून आला, आणि तत्काळ त्यानें गोविंदास उचलून त्याचे डोळ्यांस पाणी लावलें, व आंगावर शिंपडून थोडेंसें तोंडांत घातलें, आणि आंगावर थंड वारा घातला, तेणें करून गोविं

# खोंक.

दा अंमळ सावध झाला; नंतर कांहीं अवकाशानें शुद्धीवर आला. मग लागलेंच वैद्यास बोलावून आणून ती जखम त्याला दाखविली, तेव्हां वैद्य परीक्षा करून ह्मणाला कीं, निभावलें ह्मणून निभावलें; नाहींतर अंमळ गहूंभर पलीकडे जर ही जखम लागली असती, तर कानशील फुटून भलतेंच झालें असतें. मग औषधपाणी करून त्या गोविंदाला त्याचे घरीं पोहोंचतें करून दिलें. तो घरीं पोहोंचतो तंव त्या मुलाचे आंगांत सनस्वी ताप भरून बरळूं लागला. अशी त्याची अवस्था झाली, त्यावेळेस हा काशिनाथ त्याचे पलंगा जवळून एक क्षणभर देखील इकडे तिकडे हालला नाहीं; लोकांनीं त्याला उदंड सांगितलें कीं, तूं जा आतां बाहेर; पण तो कोमळ हृदयाचा मुलगा, ज्याचे अंतःकरणास गोष्ट लागली, तो तेथून नाहींच हालला.

गोविंदा बरळतां बरळतां असें बोले, अरे काशिनाथा, अरे काशिनाथा, माझ्या प्राणसख्या, त्वां माझी अशी अवस्था करावी काय? त्वां असें करावया जोगें म्यां काय केलें होतें? कारणावांचून माझे डोक्यास खोंक पाडली; असो, पण मला दुःख झालें ह्मणून तूंही दुःखित झाला असशील, हें योग्यच आहे, तथापि तूं दुःखित होऊं नको, मी तुला माफ करितों, आणि मीं तुला रागें भरविलें ह्मणून तूंही माझे अपराधाची क्षमा कर; तुला उप

द्रव द्यावा असें कांहीं माझे मनांत नव्हतें, आणि तुझ्याही मनांत नसेल, पण होणाऱ्या सारख्या गोष्टी झाल्या.

गोविंदानें काशिनाथाचा हात धरला होता, पण तापाचे झांपडीमुळें काशिनाथाकडे न पाहतां वारंवार असें बोलत असे; ते मृदुशब्द ऐकून काशिनाथाचें दुःख दुप्पट झालें. गोविंदाचे शब्द मैत्रीचे होते, परंतु ते काशिनाथाचे हृदयास बाणांसारखे रुतले.

ईश्वर कृपें करून त्याचा ताप शांत होऊं लागला त्याकाळचा काशिनाथाचा आनंद काय वर्णावा ! आपल्या हातानें मित्राचा अपघात झाला असतां त्या अपघातापासून मित्र वांचला, असा जो का हर्ष त्या हर्षाचा उपभोग त्या सुकुमार मुलानें मात्र घेतला.

काशिनाथाचा आनंद जो गुप्त झाला होता तो गोविंदा चांगला बरा झाल्यावर पुनः प्रगट झाला. आपणापासून अनुचित घडलेल्या कर्माचें स्मरण धरून विचारानें क्रोध जिंकूं लागला. गोविंदाला त्या अवस्थेची दुसरी कांहीं खूण राहिली नव्हती, पण तेवढा खोकेचा वण मात्र राहिला होता. त्या वणाकडे पाहून काशिनाथ लाजिरवाणा होई. उभयतांचा स्नेह उत्तरोत्तर दृढ होण्यास तोच वण कारण झाला.

# पितांबर.

सावित्री आठ वर्षांची झाली तंव पर्यंत तिला परकरा शिवाय दुसरें कांहीं वस्त्र मिळालें नव्हतें; अलंकार ह्मणावा तर तिचे पायांत साखळ्या मात्र लहानशा असत, पण तींहीं करूनच पाय फार सुशोभित दिसत. बापडीची वेणी तर कधीं कोणीं घातलीच नव्हती, सर्वदा केंस पाठीवर मोकळे पडलेले असत. असें असतां ती सावित्री एके दिवशीं आपल्या बरोबरीच्या मुलींच्या मंडळीमध्यें खेळावया करितां गेली, तंव त्या मुली वस्त्रालंकारांहीं करून सुशोभित पाहून तिचे मनांत खेद उत्पन्न झाला कीं, मी ह्यांचे बरोबरीची असून मला असें वस्त्र असे अलंकार नाहींत; तर ह्यांप्रमाणें मला असावें. मग खेळ खेळून घरीं आल्यावर लागलीच आईकडे जाऊन आईला ह्मणते, आई, मी रामरावाचे मुलीकडे गेलें होतें; मला वाटतें त्यांची तुझी वोळख असेल, त्यांतून जी का वडील मुलगी ती मजपेक्षां धाकटी असेल, असें मला वाटतें; त्यांचीं वस्त्रें, त्यांचे दागिने तुला काय सांगूं? कोणी चिरडी कोणी पितांबर नेसून, आंगावर चांगलाले पुष्कळ दागिने घालून, खेळावयाला आल्या होत्या; त्या फार चांगल्या दिसत होत्या; त्यांस पाहून त्यांचे आईबापांस किती आनंद वाटत असेल! पण ते कांहीं तुह्मां इतके मातबर नसतील. मी पहा कशी ती, मला ध

इ चिरडी नाहीं, वस्त्रा नाहींत. असें काय मेलें त्या चौघां मुलीस जावें. ह्मणून मी ह्मणतें, आई, तूं मला एक पितांबर दे, आणि त्यांच्या सारिखे वेणीपासून पायां पावेतों सर्व दागिने माझे आंगावर घाल, आणि विठूपाटलाचे बायकोस माझी वेणी घालवया करितां बोलावून आण. असें त्या मुलीचें भाषण ऐकून तिची आई ह्मणते, बरें आहे; अज्ञानें जर तुला सुख होत असलें तर आतां मी तें सर्व तुला खुशीनें देतें; पण, मुली, मला असें वाटतें कीं, हलक्या परकरानें जसें तुला सुख होतें तसें जड पितांबर नेसल्यानें होणार नाहीं; तुज जोगता पितांबर असता तर कधींच मीं तुला नेसविला असता; तुला परकर शोभतो तसा पितांबर शोभणार नाहीं, आणि तुझी आवड ही परकरापेक्षां त्यावर अधिक बसावयाची नाहीं. साविची ह्मणते, आई, असेंगे कसें ह्मणतेस? आई ह्मणते, मुली, तें तसेंच आहे. पितांबर नेसलीस ह्मणजे समजेल. उंच वस्त्रास डाग पडतील, किंवा चोळवटेल, ह्मणून नित्य तुला जपत जावें लागेल, हळूच बसावें, धांवतां नये, उड्या मारतां नयेत, असें होईल, मनास येईल तेव्हां बाहेर गल्लीत खेळावयाला न जातां घरांत सारा दिवस बांधून घेतल्या सारखें उगीच बसावें लागेल. परकर वरचेवर धुतां येतो, तसा पितांबर धुतां

# पितांबर.

येणार नाहीं; आणि मोठें वस्त्र एकवेळ मळलें ह्मणजे त्याची शोभा गेली; हलकें वस्त्र पाहिजे तसें गुधडतां येतें. तूं आपली पितांबरच जर रोज रोज गुधडूं लागलीस तर मी त्यांपेक्षां मातबर झालें ह्मणून नित्य नवा पितांबर तुला कोठून आणून देऊं, बाई? माझ्यानें कांहीं देववणार नाहीं. सावित्री ह्मणते, आई, तूं कांहीं काळजी करूं नको, मी आपली जपून वागलें ह्मणजे झालें कीं नाहीं? मग काय चिंता आहे? आई ह्मणते, बरें तर; तूं ह्या गोष्टीची आठवण ठेव, ह्या हावरेपणानें मग तुला पश्चात्ताप होईल, हें मी तुला आतां सांगून ठेवितें.

हें आईचें सांगणें जरी हिताचें होतें तरी तें मनांत न घेतां दागिन्यांच्या आणि पितांबराच्या सोसानें ती आपल्या बाळपणाच्या स्वभावाचे हातपाय बांधावयास प्रवर्तली. आग्रहामुळें आईनेंही तिचा मनोरथ सिद्धीस नेला. अगोदर तिचे मोकळे केंस होते ते एके ठिकाणीं बळकट आंवळून त्यांची सातपदरी वेणी घातली, त्यांजवर नग गुंफून कपाळावर बिंदी बांधिली, अशी त्या केसांची जरवडबंदी करून टाकली. जेव्हां ते कुरुळ केंस मोकळे असत तेव्हां फार चांगले शोभत, परंतु त्यांची अशी अवस्था झाली. नंतर जरीकांठी, दुमजला, नारळी

# बाळमित्र.

त्दरी, असा एक पितांबर आणून तिला नेसविला, आणि अ पुंगापासून मस्तकापर्यंत सर्व दागिने तिचे आंगावर घातले. त्या काळीं तिला नेत्रसुख उत्पन्न झालें खरें, परंतु त्या भारें क रून तिला पाऊलभर देखील चालावयास कठीण पडूं लाग लें. तेणें करून तिची बाळप्रकृती नाश पावूं लागली, तथापि आंगीं आढ्यता आणून ती आरशांत आपलें रूप वारंवार पा ही. पण पाहतां पाहतां तिची तृप्तिच होईना, असा तिला आनं द झाला. तिचे मनांत कीं, आज मजपुढें रंभा ऊर्वशी तुच्छ अ हेत; आज मजप्रमाणें स्वरूपानें कोणी नाहीं. मग तिला वाट लें कीं, मी आतां आपल्या मैत्रिणीं पुढें मिरवेन; त्या मला पा हून आश्चर्य करितील. असें मनांत आणून त्यांस आपले आईकडून बोलावून आणिलें. त्या मैत्रिणी घरीं आल्या नंतर त्यां पुढें ती मोठ्या संभ्रमानें इकडून तिकडे मिरवूं लागली त्यावेळे स असें दिसून आलें कीं, सावित्री कोणी मोठ्या श्रीमंताची मुल गी, आणि बरकड केवळ दरिद्र्यांच्या पोरी. पण तें नटणें मुरड णें आणि तो आनंद शाश्वत नव्हे, त्यांचा लौकरच नाश होऊन पुढें दुःख दायक घडणी घडतील, हें तिचे लक्षांत आलें नाहीं. सर्व मुलींनीं जवळचे आंबराईत जाण्याचा बेत केला; त्यावेळेस तिकडे जावयाला सर्वांचे पुढें अगोदर सावित्री आपण निघाली.

# पितांबर.

सर्व मुलींनीं सावित्रीचे मनांतला अभिप्राय जाणला कीं, आ ह्मांपुढें तोऱ्यानें मिरवून आह्मांस लाजवावें असें हिच्या मनां त आहे; तर कायचिंता आहे, आह्मीच हिला लाजवूं; आणि आ ह्मांला हिनें खिन्न केलें, तर आह्मी हिला खिन्न करूं असें ह्मणून गांवा जवळच करवंदीच्या जाळ्या होत्या त्यांकडे त्या मुली गेल्या, आणि आंत शिरून त्यांनीं चांगली अलगलेलीं करवंदें तोडून खाल्लीं, व मधाचे पोळीतून मध काढून खाल्ला. वसंतकाळ होता ह्मणू न तेथें बटमोगरा, गुलाब, सोनचांपे, इत्यादि नाना प्रकारचीं फु लझाडें फुलली होतीं; त्यांचीं तीं फुलें तोडून त्यांनीं कांहींच्या मा ळा करून गळ्यांत घातल्या, कांहीं वेणीस गुंफलीं, व कांहीं हुंगा वयास घेतलीं, फुलझाडांवरचीं तऱ्हेतऱ्हेचीं पांखरें त्यांनीं धरू न त्यांचा रंग त्यांचें रूप पाहून पुन्हा सोडून द्यावीं; आनंदानें उ ड्या माराव्या. अशा त्या मुली क्रीडेमध्यें निमग्न झाल्या. सावित्री ला आपल्या पितांबराकडे आणि वस्त्रांकडेसच पाहतां पाहतां पुरे पुरे झालें; त्यापुढें तिला पहिले बाळपणचे खेळ तुच्छसे वा टले होते; पण त्या मुलींची क्रीडा पाहून थोडक्याच वेळेनें तिलाही कांहीं क्रीडा करावयाची इच्छा झाली. तंव त्या सर्व मुली तिला ह्मणूं लागल्या, सावित्रीबाई, तुह्मी ह्या झाडाचे जाळींत येऊंन का, तुमचे पितांबराचा झोळ झाडाला अडकून एखादा फाटेल,

दूरच असा. हें ऐकून तिला धरून आणल्या साररवें उगीच दूर बसावें लागलें. त्यावेळेस तिची वस्त्रालंकारांवरची मर्जी जरा कमी झाली. तिच्या खेळण्यास प्रतिबंध होऊं लागला. तेथून जवळच आंबराई होती. जीमध्यें पाडाचे आंबे खाली पडले आहेत, झाडांस नवी पालवी फुटली आहे, कोकिळा उंचस्वरानें शब्द करिताहेत, सुंदर रावे मयूर इत्यादि नानाप्रकारचे पक्षी छाये मध्यें फळें खावयासाठीं आले आहेत, अशा त्या रमणीय बागांत सर्व मुली गेल्या. सावित्री ही तिकडे जावयास लागली तों मायाजणी तिला ह्मणू लागल्या कीं, सावित्री, तूं इकडे येऊं नको, इकडे चिल्हाऱ्या फार आहेत, त्यांत तुझे पितांबराचा सोगा गुंतेल. असें ह्मणून त्यामुलींनी आंबराईंत जाऊन पहिल्यानें पाड वेंचून खाल्ले; मग त्या मोठ्या आनंदानें सैरावैरा इकडे तिकडे धांवूं लागल्या; भुईशीं लागलेल्या मोठमाठ्या आंब्याच्या खांद्यांवर बसून वाऱ्याचे योगानें झोंके घेत, आणि अतिहर्षानें ओरडत; तो गलबला ऐकून सावित्रीचें मन त्या खेळाकडे वेधलें, परंतु पितांबराच्या लडबडीमुळें, व दागिन्याचे भागमुळें तिला स्वच्छंदें खेळतां येईना, त्यामुळें वस्त्रालंकारें करून तिला जितका आनंद झाला होता तितका जाऊन पश्चात्ताप उत्पन्न झाला, आणि ती खिन्न होऊन बसली; तेव्हां त्यास

# पितांबर.

र्वे मुलींत जी लहान मुलगी होती तिला सावित्रीविषयीं दया आली, आणि जवळच फळांनी भरलेलें एक उंबराचें झाड होतें तें तिनें सावित्रीस दाखविलें; तेव्हां ती संतोषयुक्त होऊन उंबरें घ्या वयास गेली, तों तिची वेणी चिल्हारीस अडकली, ह्मणून मोठ्या नें आरोळ्या मारूं लागली. मुलींनीं ती आरोळी ऐकतांच त्या धांवून आल्या, आणि पाहतात तों तिची वेणी वर गुंतून मान वरती अडकली आहे, पिंताबर वाऱ्यानें उडून कांट्यांवर अडक ला आहे; ही तिची दशा पाहून त्या मुलींनीं तिला त्या संकटांतू न काढलें. कांट्यां पासून वेणी सोडविते वेळेस डोईचे केंसांची फा र ओढाताण होऊन, ते अस्ताव्यस्त झाले. मग तिच्या वेणीचीशो भा काय पहावयाची आहे? फारच चांगली दिसूं लागली.

मग सावित्री फारच कंटाळा पावून संकटांत पडली; वेणी आंवळून बांधल्या मुळें आंत जे कांटे शिरले होते ते वेंचवेंचून का ढतां काढतां तिला पुरेपुरेसें झालें. प्रथम सावित्रीनें आपल्या मैं त्रिणीं पुढें जी आढ्यता मिरविली होती ती आठवून त्या मुली सा वित्रीचें समाधान नकरितां तिला हसूं लागल्या, आणि थट्टा आ रंभिली. मग सरासरी तिचे तोंडावरून हात फिरवून तेथून जव ळच एक टेंकडी होती, तिजवर एक तळें होतें, त्याचे कांठीं बागांत एक मोठा बंगला होता, तो पहावया करितां तिकडे त्या मात्या मु

ली धांवल्या; त्यांच्या बरोबर सावित्रीही हळूहळू जाऊं लागली. हि
चे पायांत मोठा सांखळ्यांचा जोड व तोरड्यांचा जोड होता, तेणेंक
रून तिला पाय उचलावयास कठीण पडे; आणि चोळी अशी तंग
होती कीं, श्वासोच्छ्वास टाकतांना आंगास रग लागे; वेणीच्या पट्यापा
डून बुचडा घट्ट आंवळून बांधला होता, त्यानें डोईचें व मानेचें कात
डें ओढून धरलें होतें; अशी जिथें तिथें जरवडबंदी झाली होती,त्या
मुळें तिला त्या शृंगाराचा कंटाळा येऊन तिच्या मनांत आलें कीं,
हें सर्व टाकून देऊन आपला परकर नेसावा,पण ह्या मुली मजसा
ठीं खोळंबणार नाहींत, कसें करावें?

मग ती तशीच टेंकडीकडे धापा देत देत गेली. त्या मुली भर
कन टेंकडीवर चढून गेल्या, आणि त्यांनीं तळ्याची मौज व बागांत
ल्या बंगल्याची मौज पाहिली. खालचे बाजूस वळणावळणांनीं नदी
वाहत होती तिची मौज पाहून मैदानांत इतस्ततः फिरून विश्रांति
केली. परंतु सावित्रीला त्या पितांबराचे व दागिन्यांचे भारानें त्या टेंक
डीवर चढतां येईना, ह्मणून ती खालींच बसून राहिली; तेथें विचा
र करावयास तिला पुष्कळ वेळ सांपडला; तिचे मनांत पुरतें आलें कीं,
मी ह्या वस्त्रालंकारांचे योगानें फार श्रम पावलें, आणि आजचे करम
चे लाभास अंतरलें; तर ह्यांचा कांहींच उपयोग नाहीं; आई ह्मणा
ली होती त्याचा प्रत्यय आला. ह्या प्रकारें मनांत विचार करते आहे

# पितांबर.

तंव इतक्यांत तिच्या मैत्रिणी धांवत धांवत खालीं येऊं लाग ल्या. जेथें सावित्री बसली होती त्यावाटेनें जातां जातां तिला मोठ्यानें हाक मारून ह्मणाल्या, सावित्री. ऊठ, ऊठ, लौकर, हा पहा, अवकाळ्या वारा आणि पाऊस आला; ऊठ लौकर, नाहीं तर तुझा नवा पितांबर भिजून त्याची घाण होईल. असें ए कतांच नी घाबऱ्यां घाबऱ्यां उठून कोठें अडोशास जाऊन ब सावें ह्मणून धांवूं लागली, परंतु त्या पितांबराचे योगानें तिचे जिवाची लडबड झाली, आणि तिच्या मनांत कीं ह्याला धक्का लागूंनये, त्यामुळें तिला धांवतां आलें नाहीं.

अशा लडबडीनें चालत असतां तिच्या पायांतली तोर डी वारंवार टांचे खालीं येई, ती नीट वर सारावयास तिला क्षणोक्षणीं उभें रहावें लागे; वाटेंत मागरगोटीची जाळी हो ती तींतील एक फांदी तिच्या वेणीच्या गोंड्यास अडकली, ती सोडावयास तिला पाव घटका लागली; असे तिचे वाटेनें भा री हाल झाले. तिच्या मैत्रिणी घरीं जाऊन पोहोंचल्या, ही फा रच मागें राहिली, तों तिला पावसानें गांठलें; मग तिची अव स्था काय सांगावी! पितांबर भिजून चिंब झाला. चिखलांत पाय निसरून चारवेळ बदबदां आपटली, एके ठायीं तर रस्त्यां त पाणी जळबंब भरलें होतें, तेथें तिला वाट सांपडेना, ह्मणून

एके बाजूनें उकिरड्यावरून जाऊं लागली, तों तेथेंही पाय नि सरून त्या घाणींत पडली, तेणें करून तिचें सर्वांग दुर्गंधीनें भरलें; व त्या गर्दींत तिच्या पायांतली तोरडी चिखलांत कोठें निघून पडली कोण जाणे, आणि आंगावर जरीकांठी फडकी होती ती वाऱ्याचे झपाट्यानें उडून गेली; अशी तिला जन्माची आठवण रहावया जोगी तिची दुर्दशा झाली; नंतर जंव तंव घरीं पोहोंचली. चिखलाचे योगानें चोळी पितांबर तिच्या आंगास लाखोट्या सारखा चिकटून बसला होता, तो काढावयास फार यत्न लागला. पितांबर तर कवडीचा माल झाला. ही अवस्था तिच्या आईनें पाहून हेळणेनें तिला ह्मटलें कीं, सावित्री, फडकी व पितांबर नासावयासाठीं आणखी दुसरा तुला आणून देऊं कीं काय? हें ऐकून सावित्री फार लाजून ह्मणाली, आई, तूं आतां मला रागें भरूं नको, मला पितांबर नको, माझा मला परकर दे, तोच बरा आहे, मी मोठी झालें ह्मणजे मग पितांबर नेसेन.

मग सावित्री आपले परकराचा स्वीकार पुनः आनंदानें करून पहिल्या प्रमाणें खेळूं लागली; तिला दुःखाची अद्दल घडली तेणें करून सुंदर सुंदर अलंकार असावे, उंच उंच वस्त्रें असावीं, अशी जी हांव होती ती तिची अगदीं मोडली.

# पितांबर.

त्या मुळें वस्त्रालंकारांची खराबी झाली होती त्यांविषयीं ति चे आईचे मनांतही कांहीं राहिलें नाहीं.

---

# जळतीं घरें.

## नाटक एक अंकी.

### पात्रें,

| | |
|---|---|
| राजाराम | कोणी एक गृहस्थ. |
| रेणुकाबाई | त्याची बायको. |
| परशुराम | त्याचा मुलगा. |
| वेणू | त्याची मुलगी. |
| विठोजीपाटील | एक कुणबी. |
| साकराऊ | पाटलाची बायको. |
| काळ्या. गोमाई. | पाटलाचीं मुलें. |
| सटव्या | राजारामाचा मोतद्दार. |

# बाळमित्र.

## स्थळ,

गांवकुसाजवळ विटोजी पाटलाचें घर. त्या शहरांत तीन घरें जळतात तीं तेथून दिसतात.

## प्रवेश १

### परशुराम आणि काळ्या.

परशु० — (घाबरा झाला आहे, तोंड अगदीं सकून गेलें आहे, केंस व वस्त्रें अस्ताव्यस्त झालीं आहेत, श्वासोच्छ्वास टाकीत मागें पुढें पाहतो आहे.) हाय हाय! आतां कसें होईल? आग फारच चेतली, माझ्या आईबापांची, बहिणीची काय अवस्था झाली असेल? अरे देवा, तूं तरी लवकर धांव, आणि त्यांना वांचीव. देवा लवकर धांव, वाट पाहूं नको. आईबापां वांचून मला कोणी नाहीं. ते नाहींसे झाले तर मग मी काय करूं? अगे आई, तूं कोठें आहेस? अरे बाबा, तां मला एकट्याला इकडे कां पा

# जळतींघरें.

ठविलें? अगे वेणू, तुझी काय अवस्था झाली असेल?
(अशा दुःखें करून त्या बाळास मूर्च्छा आली, सबब ए
का झाडापाशीं टेंकावयास तो गेला.)

काव्या — (झुंजुरकांच न्याहारी हातांत घेऊन घरांतून
बाहेर येतो. परशुरामास न पाहतां ह्मणतो.) अरे,ही
आग तर अझून विझाली नाहीं. बाबा उगाच कशाला
वेड्यासारखा गाडा घेऊन गेला? तो आतां केव्हां येतोय
कोण जाणे. बरें, आतां दिवस निघाया लागला, खिनभ
र वाट पहावी, आतां येईल. (झाडाजवळ बसावयासाठीं
जातो आणि परशुरामास पाहतो.) हा कोणाचा मुल
गा! हा कोणा मातबराचा मुलगा दिसतो, हा ह्यावेळेस
येथें कां आला बरें? (परशुरामास.) मुला येवढ्या प
हांटेस तूं येथें कां आलास? तूं घराबाहेर कां निघाला
स, बाबा?

परशु० — काय सांगूं बाबा? मला कांहीं सुचत नाहीं. मी
येथें कोणीकडे आलों, कोठें बसलों, हें कांहींच मला स
मजत नाहीं.

काव्या — तूं का ह्याच गांवांत राहतोस? आग लागली
तेथें तुझें घर आहे की काय?

परशु० — होय बाबा, मी त्याच आळींतला आहें, त्यागरदींतून मी कसा निघालों असेन तें देवाला ठाऊक.

काव्या — तर काय तुझ्याच घराला आग लागली ती?

परशु० — होय बाबा, माझ्याच. जेव्हां प्रथम आग लागली तेव्हां मी दिवाणखान्यांत छपरपलंगावर निजलों होतों. मला गाढमूढ झोंप लागली होती. भाऊ आले त्यांनीं मला पलंगावरून खालीं ओढलें, आणि मोतादार आला त्यानें लवकर लवकर माझ्या आंगावरचीं पांघुरणें काढलीं, आणि वाटेंत जाळाचा भडका झाला होता त्यामधून मला बाहेर काढलें.

काव्या — अरे, अरे, फार वाईट झालें!

---

## प्रवेश २

### साकराऊ, गोमाई, काव्या, आणि परशुराम.

(साकराऊ परांतून काव्यास हाका मारिते. काव्याचें चित्त परशुरामाकडे लागलें आहे ह्मणून तो ऐकत नाहीं)

# जळतीं घरें.

साकराऊ — (गोमाईस) कायगे, काळ्या कोठे आहे? घरें जळतात तिकडेस घरधनी गेले आहेत, त्यांकडे तर गेला नसेलना? ते आपले पराव्याचे खटपटींत लागले असतील, हा पोर तिकडे जाऊन काय करील, काय जणू.

गोमाई — आई, तो कांहीं तिकडे गेला नाहीं; कोणसा एक मुलगा बाहेर आला आहे त्यासंगें तो बोलतो आहे.

साकराऊ — (बाहेर येऊन काळ्यास बोलते.) अरे, मीं तुला किती हाका मारल्या! तुझें मन कोणीकडे गुंतलें होतें? ओ कां नाहीं दिली?

काळ्या — आई, मीं कांहीं तुझी हाक ऐकली नाहीं. हा बिचारा मुलगा संकटांत पडला आहे, त्या संगतीं मी बोलत होतों.

साक॰ — कांकां, त्यास काय झालें आहे?

काळ्या — थोडक्यांत चुकला, नाहींतर जळून मेला असता. ह्याचें घर जळत असतां त्यांतून ह्याला लोकांनीं बाहेर काढलें.

साक॰ — आय आई, मूल भ्यालें असेल, तरच अगदींच

ड्यावाणी झालें आहे. मुला, तूं त्यांतून निघून इकडे कसा आलास?

परशु० — कसा तें काय सांगूं? तेथें जेव्हां उभें रहावयास जागा नाहींशी झाली, तेव्हां मी लहान असतां ज्या दाईचा लळा मला भारी होता तिजकडे नेऊन पोहोंचवावयास आमचे भाऊंनीं मोतादद्दारास सांगितलें; तो मला खांद्यावर घेऊन निघाला, तों आग विझवावयाला आळींत माणसें थोडीं होतीं ह्मणून लोकांनीं त्यास अडविलें, तेव्हां मला टाकून तो तिकडे गेला; मग मी एकटा राहिलों आणि रडूं लागलों, तों एके स्त्रीनें माझा हात धरून गांवकुसा बाहेर आणलें, आणि मला ह्मणाली, तूं ह्या समोरच्या वाटेनें चल. मग मीं तिनें सांगितल्या प्रमाणें केलें आणि येथवर आलों.

साक० — तुझ्या दाईचें नांव काय, बाबा? तुला आठवतें?

परशु० — नाहीं नाहीं, तिचें नांव मला ठाऊक नाहीं; पण तिच्या मुलीचें नांव गोमाई इतकें मला आठवतें.

गोमाई — आई, हा परशराम तर नसेल ना?

साक० — त्या सारखा दिसतो हा.

# जळतीं घरें.

परशु० — होय होय, तोच मी.

साक० — तूं का आमच्या राजाराम भाऊंचा मुलगा?

परशु० — होय, बाई. आतां माझी ही ओळख पटली, ही गोमाई, हा काळ्या. (तीं परस्परें भेटतात.)

साक० — (परशुरामास मांडीवर घेऊन त्याचें तोंड कुरवाळते, आणि नेत्रांतून आनंदाश्रु टाकिते.) जेव्हां तुझ्या गल्लींत आग लागली तेव्हांपासून मी तुजकरितां धाकांतच होतें, बरें झालें देवानें तुला एथवर आणलें, आणि मला भेटविलें; आतां मला आनंद झाला. तुमचे घरास कांहीं धोका लागेल ह्मणून मीं त्यांना तुमचे घराकडेसच पाठविलें आहे; पण गोमाई, हा परशुराम ह्मणून तुझ्या ध्यानांत कसेंगे आलें?

गोमाई — मी ह्याला पाहतांच अगोदर वळखलें नाहीं. खरेंच; पण मग माझा सारा जीव त्याकडे ओढला. म्यां ह्याला पाहिल्याला फार दिवस झाले आहेत.

परशु० — मी इतके दिवस काकाचे घरीं होतों, तेथून तुक्का आलों. दोन तीन दिवस झाले. मी आपला तेथेंच असतों तर बरें होतें. (गांहिंवर आणून) अरे देवा, आतां माझ्या आईबापांची अवस्था कशी झाली असेल?

# बाळमित्र.

साक० — तुझे गल्लींत आग लागतांच मीं त्यांना एथून पाठविलें आहे कीं, त्यांनीं ह्या प्रसंगीं कामावर पडावें. आणि असें त्यांचेही मनांत येऊन ते धांवून गेले आहेत; तूं कांहीं आईबापांविषयीं काळजी करूं नको; ते आगींत उडी घालून त्यांस जळूं न देतां बाहेर काढतील, ह्याची मला पक्की खातरी आहे. आतां तूं इतके लांब धांवत आला आहेस, ह्मणून तूं भुकेला असशील, तर तोंड धुऊन कांहीं खा.

काळ्या — ही पहा, रावसाहेब, कशी गव्हांची भाकर आहे ती, ही घ्या.

परशु० — तूं अगोदर मला परशाराम ह्मणून हाक मारीत होतास, आणि आतांच कां रावसाहेब ह्मणून हाक मारतोस?

काळ्या — बरें तर, तसेंच कां होईना? परशराम, माझी न्याहारी घ्या.

गोमाई — अंमळ थांबा, परशाराम, तुह्मांला तहानही लागली असेल; मी दुधाची खीर करून देतें.

परशु० — नाहीं नाहीं, माझे आईबाप येवढ्या संकटांत असतां माझ्यानें कसें खाववेल? मी त्यांस डोळ्यांनीं पा

# जळतीं घरें.

हीन मग काय खावयाचें असेल तें खाईन. आतां मी त्यां कडे जातों, आणि त्यांना भेटून येतों.

साक० — बाबा, तूं अंमळ धीर धर, आणि विचार कर; तूं जाऊन काय आगीमध्यें उडी घालणार आहेस?

परशु० — मी त्यांस आगींत सोडून आलों. मला भाऊंनीं बळेंच सटव्याचे खांद्यावर दिलें, आणि त्यास धमकावून सांगितलें कीं, जा, ह्याला येथून घेऊन. ते फार रागें भरतील ह्मणून मी भ्यालों आणि इकडे आलों; पण मला येथें चैन पडत नाहीं, आतां कांहीं का होईना, पण त्यांचें तोंड तरीं मी एकदां पाहून येतों.

साक० — मी तुला जाऊं देणार नाहीं. तुला लागलें वेड, चल मजसंगतीं घरांत.

परशु० — तुह्मांला घरदार आहे, तुह्मी जा; मला आतां घर नाहीं दार नाहीं.

साक० — वेड्या मुला, अशी हाय हाय कां घेतली! तुझें माझें घर वांटलें आहे कीं काय? मी तुला जसें दूध पाजिलें तशी आतां भाकर खाऊं घालीन, इतक्यास चुकणार नाहीं. (परशुरामास बळेंच घरांत नेते आणि काळ्यास सांगते,) खबरदार, येथेंच रहा; जर कोठें बाहेर गे

लास तर मारीन, सोडणार नाहीं. ते आले ह्मणजे मला सां ग; पण घरें जळताहेत तिकडे पहावयास जाऊं नको हो, म्यां तुला बजावलें आहे, आठवण ठेव.

काळ्या — (आपल्यापाशीं.) बरें बरें, माझें काय? मी गेलों गेलों, नाहीं नाहीं. अहा, तिकडे आतां शेकावयाला आगटी भली खाशी झाली असेल. एथून चांगलें दिसतें. ऑँ! मो ठा मनोरा पडलासें वाटतें! अबब, त्याखालीं तर पुष्कळ घरें दबलीं असतील बरें.— वाहवा! बरीच मौज झाली गरीब बिचारें पोर! जाऊं द्याकीं, त्याचें घर जळल्यामुळें माझे न्यहारीस उशीर झाला. (गोमाई हातांत तांब्या घेऊ न बाहेर येती.) बयाला माझी भारी माया; बया, त्वां मज साठीं दूध आणलें असें वाटतें.

गोमाई— काय? तुजसाठीं दूध? नाहीं बाबा, परशरामाला पाणी द्यावयाकरितां तांब्या घेऊन आलें आहे; तो तर खी र किंवा लाडू कांहींच खात नाहीं; आई, आई, भाऊ, भाऊ, करीत बसला आहे, आणि ह्मणतो कीं, मला कांहीं गोड खा वयास नको. माझ्या तोंडाची कोरड वळली आहे, एवढें सें पाणी मात्र गुळणा करावयास द्या ह्मणजे झालें. ह्म णून मी त्याला पाणी नेऊन देतें.

# जळतीं घरें.

काव्या — काय, आईबापांची खबर समजत नाहीं ह्मणून काय उपाशीं मरतो? ही मोठी मौजच आहे तर? आपुन तर ब्वा असें कधीं करणार नाहीं. आप हृय तो सब बिशाद.

गोमाई — तूं मला ठाऊक आहेसरे, आई जरी मेली तरी तिला तसेंच झांकून ठेवून पोटभर आदळशील मग तिला जाळायाला नेशील. मला तर, ब्वा, अंमळ आईबाप जवळ नसले, किंवा कांहीं कारणामुळें त्यांचा थांग नलागला, तर चैन पडत नव्हतें; माझी ताड भूक पळून जाई, खाण्यापिण्याची आठवण देखील रहात नव्हती.

काव्या — घर जळो का राहो, कांहीं कां होईना; आपणाला तर, ब्वा, भूक नसली तर सांगवेना; पण भूक असतां दम धरवणार नाहीं; मग कोणी मरो कीं वांचो.

गोमाई — बरारे आहेस, पहा पहा बरें, ह्या परशारामास आईबापांविषयीं किती दुःख झालें आहे तें! ह्या पोराकडे पाहून माझी देखील भूक पळाली.

काव्या — तर आज तूं आपली खीर भाकर खाणार नाहीस असें वाटतें.

गोमाई — तुझें बरेंरे माराचेक खाण्यावर चित्त. आपली खी

# बाळमित्र.

र खाऊन आतां माझ्या खिरीवर डोळा ठेवितोस.

काव्या —— मी कांहीं तुझी खीर घ्यावी ह्मणून बोललों नाहीं; परवा राम तर खातच नाहीं, आणि तुझ्याही तोंडांत जाणार नाहीं, मग फुकटावारी उगीच कां घाण करावी? ह्मणून म्यां ह्मटलें; ह्यांत कांहीं म्यां तुझी खीर मागितली असें झालें नाहीं. (गोमाई घरांत जाते.) भली पक्की लबाड आहे, माझी डाळच शिजूं दिली नाहीं किंहो. बरें चला, आपली न्याहारी झाली, आतां आपुन गावांत जाऊन घरें जळतात त्यांची मौज पाहूं. घटकाभर तेथें उभें राहून यावें ह्मणजे झालें, कोणास कळणार नाहीं; जरी कळलें तरी माझें कोण काय करणार आहे? आईला कळलें तर दोन शिव्या देईल, उगीच बसेल. (बागांत जावयास निघतो, मातक्यान जावें का नजावें असा मनांत विचार करीत पुढें चालतो, इतक्यांत त्याचा बाप तिकडून येतो त्याला भेटतो.)

---

# जळतीं घरें.

## प्रवेश ३

### विठोजी आणि काळ्या.

( विठोजी पाटील खांद्यावर मोठी संदूक घेऊन येतो. )

काळ्या —— बाबा, तूं अवघ्यांचे मागनें आलास. मी तुजकडेसच येत होतों, बरी गांठ पडली.

विठोजी —— ( परशुरामाच्या घोरांत आहे. ) आपला परशराम इकडे कोठें आला आहे कायरे?

काळ्या —— हो, बाबा. त्याला आल्याला एक खिण झाला.

विठोजी —— होय कायरे? देवानें बरीच किरपा केली समदीं माणसें जिवंत निघालीं. ( संदूक खालीं ठेवून तिजवर बसतो. ) मी जरा इसांवा घेतों.

काळ्या —— बाबा, घरांत चल कीं.

विठोजी —— थांबरे, जरा दम धर, मी येथें बसलों आहें, तूं तिला सांग कीं, मी आलों. ( तोंडावरचा घाम पुसून मनांत म्हणतो. ) बरें झालें मी इथून जाऊन ह्यावेळेस त्यांचे उपयोगीं पडलों. जर ह्यावेळेस गेलों नसतों तर जनाचा थुंका माझे तोंडावर पडता.

---

## प्रवेश ४

### विठोजी, साकराऊ, गोमाई, आणि परशुराम.

साक० — ( घरांतून धांवून जाते, आणि त्याची पाठ रगडते.) आज देवानें मला चुडेदान दिलें.

विठोजी — बरें पण अगोदर परशराम कोठें आहे?

परश० — ( घाबऱ्यां घाबऱ्यां धांवत येतो.) पाटील बाबा, तुह्मी तर एकटेच आलां, माझे आईबाप कोठें आहेत? त्यांची काय अवस्था आहे?

विठोजी — ते शाबूद आहेत बरें, खुशाल आहेत; तूं कांहीं चिंता करूं नको. ( तें एकून परशरामाची मुखश्री टवटवती. आणि तो फारच आनंदित होतो. आणि देवाला ह्मणतो.) हे देवा, दीनदयाळा, तुझी धन्य आहे, तूंच आमचा पाठराखा, तुजवांचून आह्मांस कोणी नाहीं.

गोमाई — आह्मी तेव्हांचीं धरून वेड्यासारखीं झालों आहों. कीं, शेजारचे लोक आले आण हे कां अझून येत नाहींत.

विठोजी — त्यांच्या कळकळीचें तिकडे कोणी नव्हतें; मग दुसऱ्यांस काय? आपले गेले आणि आले, मग उशीर क

# जळतीं घरें.

शाल लागेल?

साक० — पण आग विझाली? आतां तर कोणांचीं घरें जळत नाहींत ना?

विठोजी — छी वेडे, विझाली कश्शी, अझून विझाली नाहीं; लोकांचीं घरें भडाभड चेत घेताहेत, तूं जर तेथें जाऊन पाहशील तर चंद्री गुंग होईल. कितीक लोकांच्या बायका जळाल्या, कितीकांचे दादवे जळाले. धडाधड भिंती पडतात, त्यांखालीं कितीक माणसें दडपलीं; कितीक भुतासारखीं उघडीं नागडीं इकडून तिकडे हंबरडे फोडीत धावताहेत. गाई, म्हशी, घोडीं, बकरीं, हीं मोकळीं सुटून पळताहेत. असा एकच आकांत उठला आहे, देमाय धरणी ठाव अशी अवस्था झाली. कायती गर्दी तुला सांगूं? माझ्या जवळ जवळ भोंतालीं धडाधड जळकीं खांडें पडत, त्यांतून मी कसा वांचलों हें देवाचें देव जाणे, मला मोठें आश्चीर वाटतें!

गोभाई — पहा आई, बाबाच्या मिशा भुंवया कशा भाजल्या आहेत त्या; आणखी आंगावरची लंव देखील भाजली.

विठोजी — हें काय! राजाराम तात्यां करितां जीव कायम राहून माझा हात पाय जरी मोडता तरी मी मागें सोरें नपाह

तों चित्त्या सारखी आगींत उडी घालतों. तात्यांपेक्षां का हात पाय अधिक आहेत?

साक॰ — ह्मणून काय हात पाय मोडून घ्यावे काय?

विठोजी — अगे, तर, वेडे, आपण त्यांचें अन्न खाल्लें, आन त्यांजवर वखत गुदरला तर त्यावेळेस मागें सरावें काय? माझे हात पाय काय, ते शाबूद रहाण्या बदल जीव देखून खर्चीन, पण त्यांना धक्का लागूं देईन काय?

साक॰ — तर अशी काय मोठ्या मारामारीची हीच वेळ पड ली होती ?

विठोजी — होय, अशीच वेळ होती ती; बरी बुद्ध देवानें म ला दिली; मी ऐन वेळेस जाऊन पोहोंचलों; तात्या बाय का पोरांना घेऊन जों दरवाज्यांत येतात तों मी इकडून जा ऊन पोहोंचलों. त्यांचे मनांत आतां आपण निभावलों, इ तक्यांत एकदांच दरवाज्या वरचा बंगला कोसळला, तेव्हां लोकांनीं बोंब केली, अरे हे मेले मेले, इतक्यांत म्यां चप ळाई करून जें का शेजारीं खिंडार आहे त्यांत त्यांस उच लून नेलें, आणि घरांत शिरून वह्या, रुमाल, दागिने, रो कड, पांघरूण, चिरगूट झाडून सारें काढिलें. तें सर्व आ पल्या गाड्यावर घातलें आणि संदूक तेवढी मी घेऊन आ

लों.

परशु० — माझ्या बापाला तुम्ही वांचविलें, तो तुम्हांला फार रुपये बक्षीस देईल, ह्याविषयीं मी तुमची खातरी करितों.

विठोजी — मला दुसरें बक्षीस नको, तुझ्या आईबापांची सेवा चाकरी मजकडून घडली तिच्यानें जो मला आनंद झाला आहे तो त्या बक्षिसापेक्षां अधिक आहे. तात्या आपल्या सर्व मनुष्यांस घेऊन इकडे लोकरच येतील असें वाटतें.

परशु० — माझे आईबाप इकडे लोकर येणार आहेत, काय?

विठोजी — होय बाबा. अगे, लोकर जाऊन त्यांकरितां घर रिकामें करून ठेव, आपून गोठ्यांत राहूं, साईत सईत काय लागावयाचें तें तयार कर, जा.

---

## प्रवेश ५

### विठोजी, काळ्या, आणि गोमाई.

विठोजी — वरकडांचीं ज्यांचीं घरें जळालीं आहेत त्या गरिबांसाठीं मी धर्मशाळा झाडून सारवून ठेवितों, एथें आ

तां लोक फार जमा होतील, त्या आळींतले लोक भिका ऱ्यावाणी जागा पहात हिंडताहेत, त्यांची दशा पाहून मला कींव येते; त्यांना मी आपल्या धर्मशाळेंत रहावयास जागा देईन, जसे आतां इकडेसच आहेत. काय सांगूं! कितीकांचें आंग बहिर होऊन गेलें, कितीक वेड्यासारखे इकडे तिकडे पहातात, कितीक मातींत लोळण घेतात, अशी त्यांची दशा कांहीं सांगतां पुरवत नाहीं.

गोमाई — हाय हाय, बरें झालें, परशरामा तूं इकडे लौकर आलास, नाहीं तर लोकांचे पायांखालीं तुडवून गेला असतास.

विठोजी — माझा गाडा आला ह्मणजे मी मातक्यान तिकडेस जाऊन ह्मातारे कोंतारे, बायका, पोरें, जीं भेटतील त्यांस गाड्यावर घालून घरीं घेऊन येईन. मी गरीब जरी आहें तरी ह्यावेळेस समर्थांच्या उपयोगीं पडेन, आणि मोठा माणूस होईन, कांकीं तितके सारे माझेसे होतील. (तो संदूक उचलावयासाठीं खालीं लवतो.)

काव्या — बाबा, मी उचलावयास हात लावूं?

विठोजी — राहूं दे, तुला उचलतां येणार नाहीं. तूं असें कर, आपल्या घरीं आज पाहुणे लोक येतील त्यांच्या साठीं वा

ण्याचे येथें जा, आणि बाबानें दहा मण कणीक मागितली आहे, असें त्याला सांग. कोणी आला त्याला घांटा घुगरी घालीन, उपाशीं राहूं देणार नाहीं, इतकी शकत आज माझे मधीं आहे; मातबर लोक कांहीं पैका देतील, आपल्याच्यानें एवढें ही का होईना? मी आपलें पोट बांधीन पण त्यांना उपाशीं राहूं देणार नाहीं.

---

## प्रवेश ६

### गोमाई आणि परशराम.

**गोमाई** — बाबा, मी ही उपाशीं राहीन पण तुला उपाशीं राहूं देणार नाहीं. परशरामा, तुझी अशी गत होईल हें कोणाचे ध्यांनीं मनीं देखील नव्हतें.

**परश०** — काय सांगावें, एका एकींच आकाशाची कुऱ्हाड पडली. एक्या रात्रींतून मातबराचे भिकारी होणें हें फार कठीण आहे.

**गोमाई** — कांहीं चिंता नाहीं, तूं अगदीं हवालदिल होऊं नको. आम्हांजवळ आहे तंवर तुम्हांला उपाशी मरूं देणार नाहीं.

आणि मजजवळ जें कांहीं असेल तें तुला किमती वांचून देणार नाहीं काय? पण हें कोणाचें पाऊल वाजतें? कोण आलें बरें?

---

## प्रवेश ७

परशराम, सटव्या, गोमाई,
राजाराम, रेणुकाबाई, आणि लक्ष्मी.

परश॰ — हा आपला सटव्या! अरे सटव्या!

सटव्या — लहानग्या धण्या, फार चांगलें झालें कीं तूं वांचलास.

परश॰ — मी वांचलों, पण माझी आई, बाप, बहीण हीं कोठें आहेत? तीं तुज बरोबर आलीं आहेत काय?

सटव्या — तीं मज बरोबर! कोठें?

परश॰ — तूं कां त्यांना मागें टाकून आलास?

सटव्या — (मागें पाहून.) तीं मागें कुठे दिसत नाहींत.

परश॰ — (गहिंवरून.) तूं इकडे त्यांस सोधावयास आलास कीं काय?

# जळतीं घरें.

सटव्या — ( संभ्रांत होऊन.) हो, हो, ते इकडे आले नाहींत काय? इकडे आले नाहींत तर मग काय होतील?

गोमाई — परसरामा खेरीज इकडे कोणी आलें नगेलें.

परभु० — ( घाबरून.) अरे अरे, तर त्यांचें वर्तमान काय पुढें? विठोजी पाटलांनीं एवढावेळ गोड गोड गोष्टी सांगितल्या; तुझे सांगण्यांत तर घालमेल दिसते.

सटव्या — तूं घाबरा होऊं नको; माझें ऐक अगोदर; मला आग विझवावयाला लोकांनीं अडविलें तेव्हांपून मी लोकांचे गर्दीमधीं मिळलों; मला कांहीं खबर नाहीं, घाबरून को; मी खरें सांगतों; मग मीं त्यांस लई हुडकलें, खिंडारांत गेलों, इकडे तिकडे फिरलों, कांहीं खबर लागली नाहीं; लोकांस पुसलें, त्यांनीं सांगितलें कीं आह्मांला कोठं आढळलीं नाहींत.

परभु० — हाय हाय, अरे देवा, तर तीं खचीत जळालीं असतील.

सटव्या — अझून तर लई ह्मोरें सांगावयाचें राहिलें आहे, तें ऐक; उगाच घाबरा होऊं नको.

परभु० — तर तें काय आहे? तें मला तूं सांगत नाहींस?

सटव्या — तुह्मी लईच घाबरून जातां, मग मी ह्मोरें काय सां

गूं?

परशु० — बेट्या, देवाकडे पाहून खरेंच बोल.

सटव्या — तर, लोक असे चावळत होते कीं गिरस्त आपल्या बायका पोरांना घेऊन बाहेर निघाला, आण त्यालाही वाटलें कीं आपून वांचलों, पण बंगल्याची लई मोठी लग अवचित पडली, ती खालीं तीं समदीं चेपूनशानें गेलीं.
(हें ऐकून परशुराम धाडकन आंग भुईवर टाकतो, आणि मूर्छित होऊन निचेष्ट पडतो.)

गोमाई — (गलबलून त्यास उचलती.) अरे, अरे, पाणी आणा, धांवा, परशाराम मरतो.

सटव्या — तरी मीं त्याला सांगितलें कीं, तूं घाबरूं नको; लोक चावळतात, खोटें का खरें हें मला ठावें नाहीं; गिरस्त कोण होता हेंही लोकांला माहीत नाहीं, आण हें खोटें असलें तर मग कसें?

गोमाई — हा मेल्या द्वाडा अवचित्या, भलतेंच बोलतोस. माझ्या बानें त्याला कसें चांगलें सांगितलें होतें, तें आतां त्याच्या मनांत देखील राहिलें नाहीं.

सटव्या — (परशुरामाचे पायांला हात लावून म्हणतो.) हाय हाय, माझे लहानग्या धण्या, तुझे पाय तर अगदीं

# जळतीं घरें.

माथणी वाणी गार पडलें.

गोमाई — हा द्वाडा मेल्या, त्वां ह्याचा प्राण मात्र घेतला. इकडे कशाला आलास, तिकडेच कां मेला नव्हतास?

सटव्या — पण मीं ह्याला अगोदर सांगितलें नाहीं? कीं तूं घाबरा होऊं नको ह्मणून? हें तुझ्या देखत बोललों नाहीं? (परशुरामाचें डोकें उचलून ह्मणतो.) दादा, ऊठगे माझे आई. (पुन्हा डोकें उंचून भुईवर सोडतो.)

गोमाई — अहारे, मेल्या अनाड्या, जर त्याचा जीव राहिला असला तर तुझ्या आपटण्यानें निघून जाईल. तूं त्याला मारून टाकशील, दूर हो, तूं त्याला हात लावूं नको. अरे परशरामा, सख्या, तूं कोठें गेलास? एकदां देहावर येऊन मजकडे पहा. अग आई, अरे काळ्या, धांवारे धांवा. (ती घरांत पाणी आणावयास धांवती.)

सटव्या — (परशुरामाचे तोंडाकडे लवून पाहतो.) नाहीं नाहीं, अझून कांहीं मेला नाहीं, नाका तोंडा वांटे वारा येतो हा, हा जर मेला तर मी विहिरींत उडी घालीन (मोठ्यानें ओरडून.) अहो परसराम, अहो परसराम, सुध्दीवर आणावयाचा मला येखादा उपाव ठावा असता तर लई चांगलें होतें. (परशुरामाचे तोंडावर आपल्या

तोंडानें गार वारा फुंकितो.) हें फुंकणें मला लई मोठे दुःखाचे डोंगरा सारखें झालें, म्यां खबर सांगितली ह्मणून असें झालें, मी वाईट खरा, पण ह्याला म्यां घाबरें होऊंन का असें सांगितलें असतां ह्यांनीं डोळे पांढरे केले, ही ह्यांची चूक. म्यां अगोदरच फोडून सांगितलें होतें, पण परसरामजी तुह्मीं ऐकिलें नाहीं. माझी बायको मेली तव्हां मला ही दुख लई झालें होतें, तव्हां जर म्यां असें करून प्राण टाकला असता तर मग मला लोक वेडा ह्मणते. परसराम, आतां मी कोणाची गत करूं! हे शुध्धीवर येतील असें मला दिसत नाहीं. (इकडे तिकडे पाहतो.) अहा! ती तिठे विहीर आहे, तेठून तरी पाणी आणावें, तें तोंडावर टाकलें ह्मणजे लौकर उठतील. (इतक्यांत राजाराम कुटुंबा सुध्धां येतो. त्यास पाहून सटव्या पळून जातो.) देवकरो कीं माझा धनी परसरामाला असें न पाहो. तोका आपला जीव देईल काय जणु. मी तर, दादा, मेल्याहून मेला झालों.

राजा॰ — तो कोण आतां पळत गेला? आपला सटव्या असेल असें वाटतें; अरे सटव्या, अरे, परशराम कुठें आहे?

रेणु॰ — आह्मांला भेटूं नये ह्मणून पळाला असेलसें वाटतें;

पण त्यानें परशरामाला कुठे ठेवलें असेल बरें ?

लक्ष्मी० — (परशरामास भुईवर पडलेला पाहून बोलती.) हा कोण बरें भुईवर पडला आहे? (लवून पाहती.) अरे देवा, हा तर माझा भाऊराया आहे, अग आई, हा मेलासा दिसतो. हाय हाय.

रेणु० — अगे काय ह्मणतीस काय? परशरामच कीं काय? अगे खरेंच, हाय हाय, अरे पाणी तरी आणा कोणी, (ती त्याजपाशीं बसती.)

राजा० — आह्मीं आतांच एका अनर्थांतून मुक्त झालें तों दुसरा अनर्थ पुढें वाढून ठेवलाच आहे काय? मघांका हीं कमी झाला होता वाटतें, ह्मणून आतां तो पुरता प्राप्त झाला. (परशरामाचे तोंडाकडे पाहून बोलतो.) थांबा, घाबरूं नका, हा कांहीं मेला नाहीं; श्वासोश्वास वाहतो आहे, (रेणुकाबाई तोंडांत तोंड घालून रडते.) रडून रडून डोळे जातील, उगीच ओरडूं नका, अमळ धीर धरा.

लक्ष्मी० — अरे देवा, हें त्वां काय केलें, आह्मी सर्व आगींत जळून मेलों असतों तरी बरें होतें.

राजा० — (परशरामास रेणुकाबाईचे मांडीवर देतो, आपण विहिरीकडे धांवत जाऊन ओंजळींत पाणी आणून

त्याचे तोंडांत घालितो. परशराम सुसकारा टाकून मा
झे आईबाप कोठें आहेत असें ह्मणतो.) त्या मूर्खानें
आह्मी जळालों असें सांगून ह्यापोरास अशा अवस्थेंत
घातलें आहे असें वाटतें.

लक्ष्मी — (आनंदानें ह्मणती.) अहो, पहा, हा डोळे उ
घडूं लागला.

तुका॰ — सख्या परशरामा, कायगे आई झालिं तुला?

परश॰ — (सावध होऊन इकडे तिकडे पाहतो.) मी कुठे
आलों? असें काय झालें हें मला? (उठून बसतो.) अहा
माझे आईबाप आले!

लक्ष्मी — (त्यास आलिंगून.) अहा! माझे भाऊराया, तूं
उठून बसलास, इतक्यानें माझे जिवांत जीव आला.

परश॰ — तुला पाहून मला किती आनंद झाला ह्मणून
सांगूं ताई?

तुका॰ — आमचें सर्वस्व गेलें ह्मणून आह्मी दीन झालों ह
सों. पण घर दार सोने रुपें व आमचे प्राण ह्यांहून अधि
क जें पुत्ररत्न तें आह्मांपाशीं राहिलें, इतक्यानें आ
मांस जीवन कळा आली, आणि संपत्तिवानाहून अह्मी
अधिक झालों.

# जळतीं घरें.

रेणुका० — आमचें जें कांहीं जळालें त्याचा खेद आतां करावा नलगे.

राजा० — खरेंच, आमचा परशाराम आमच्या दृष्टीस पडला, हीच मोठी गोष्ट झाली. अशा संकटांतून तुह्मी तिघेजण वांचलां हें पाहून जळाल्या जिनगीचा खेद माझे मनांत कांहींच राहिला नाहीं.

लक्ष्मी० — पण, भाऊराया, तुला असें पडावयाचें काय कारण झालें होतें बरें?

परशु० — ताई, तें तुला काय सांगू? मला सटव्यानें असें केलें.

राजा० — कां? मीं तुह्मांला सांगितलें नाहीं?

परशु० — त्यानें मला सांगितलें कीं, तुह्मी सर्व आगींत सांपडलां.

लक्ष्मी० — (जवळचे टेंकडीकडे पाहून.) रावजी, तो पहा, सटव्या तिकडचे आंगें उभा आहे.

राजा० — सटव्यारे, अरे सटव्या. तो मला उत्तर देत नाहीं. तो भितोसें वाटतें, परशारामा, जा तूं त्या वेड्याला घेऊन ये.

परशु० — अरे सटव्या, ये खालीं, भिऊनको. मी जीवंत

आहें.

सटव्या.— (दूर उभाराहून ह्मणतो.) खरेंच बोलतोस कायगा?

परशु.— खरेंच नाहीं, तर काय खोटें? त्वां कधीं मेल्या माणसाचे तोंडांतून शब्द ऐकिला काय?

सटव्या — (हळूहळू उतरूं लागून बोलतो.) मलाचाकरीवरून बरतरफ कराल कीं काय? तुह्मी कराल असें मला वाटत नाहीं. जर करावयाची मर्जी तुमची असली तर मग मला खालीं उतरावयाची तरीं मेहनत कशाला देतां बाबा?

राजा.— पहा कसा मूर्ख आहे तो. आपण काय बोलतों ह्याचा परिणाम नपाहतां लोकांचे सांगण्यावरून माझे पोरास भिवविलें?

रेणुका.— थोडक्यांत निभावलें, नाहीं तर परशरामाचा घात तुजकडून झाला असता.

परशु.— आई, आतां क्षमा करा, हा त्याचा अपराध नाहीं; माझाच आहे.

सटव्या — खरीच गोष्ट सांगतो हा; म्यां ह्याला घाबरूं नको ह्मणून सांगितलें होतें; मग कां घाबरावें? पण ह्यानें

मजवर दया केली ह्मणून लई आनंद झाला. आजपु न कोणी माणूस डोई इतक्या खांचे मंदीं पुरल्या वांचून तो मेला असें मी समजणार नाहीं.

---

## प्रवेश ८

### विठोजी, राजाराम, परशुराम, गोमाई, आणि साकराऊ.

**विठोजी** — ( घरांतून बाहेर येतो ) अरे, तो रानवर कीठें आहे रे?

**गोमाई** — ( सटव्याकडे बोट दाखवितो. ) बाबा, हा पहा, आपले धन्यांचे मागें कसा उभा आहे तो.

( राजारामास पाहून मोठ्या आनंदानें रामराम करितो. )

**राजा०** — तूं इतका लवून रामराम करूंनको, तूं माझा

जिवलग आहेस, त्वां मला आज सर्वस्वें जीवदान दि लें.

विठोजी — असें कोठें झालें आहे महाराज! आपून मजवर फार उपकार केले आहेत. आणि आजही मज गरिबाची चाकरी घेतली, आणि कृपाकरून माझे घरीं आलां, हाच मला लई लाभ झाला. आजच्या वेळेस माझी थोडी बहुत चाकरी आपल्या दृष्टीस पडली, इतक्यानें मला मोठा आनंद झाला आहे.

राजा० — हें खरेंच, पण आह्मी तुजवर आज पावेतों जे उपकार केले ते व पुढें ही जे जन्मवर करूं, ते सर्व तुझ्या उपकाराच्या पासंगास देखील पुरणार नाहींत.

विठोजी — असें काय ह्मणतां महाराज ? माझी काय आजची चार घडींची चाकरी, आणि आपून तर लई दिसां पून मला पोसलें आहे. पहा, हें घरदार, शेत, वाडी, गाडा नाडा, बैल ढोर, सर्व आपल्या पुण्य प्रतापानें मला मिळालें आहे. आतां आपली लई खराबी झाली आहे तर आपून जें काय मला शेत वगैरे दिलें आहे तें आपून घ्यावें; हा आपलाच माल आहे, दुजा भाव मनामधीं आणूंनका; असें केल्यानें मला लई आनंद होईल.

# जळतीं घरें.

राजा ० — बरें तर, तूं ह्मणतोस त्या पक्षीं ह्या समयीं मी घेतों; पण पुढें ह्याबदल तुला कांहीं दुसरें देईन, त्याला तूं ना ह्मणूं नको. माझ्या जहागिरीच्या सनदांची पेटी त्वां आगींतून काढिली, आमचें वंश परंपरेचें उपजीवन जिवा कडे न पाहतां त्वां रक्षिलें; तर आतां आह्मांस एथें घर दार कांहींच राहिलें नाहीं, ह्याकरितां मी आपल्या जहागि रीच्या गांवीं जाऊन रहावें असें योजिलें आहे; तेथें तुला ही सर्व खटल्या सुद्धां घेऊन जाईन, आणि वंश परंपरा तुला पोटाची काळजी नपडे असें कांहीं तेथें करून देई न.

परशु ० — बाबा, माझ्याही मनांत असेंच आहे; मला ह्यांनीं फार संभाळलें, नाहीं तर माझी दशा झाली अ सती.

साक ० — आतां उठा, चला आमचे घरांत जागा कांहीं फारशी चांगली तुह्मां योग्य नाहीं, आपली सांकडी आहे. आह्मां गरिबांचे घरांत आपली पायधूळ पडली ह्मणजे आह्मी लई सुखी होऊं.

विठोजी — (आपला गाडा कितीएक लोकांस घेऊन येत आहे असें पाहून ह्मणतो.) भाऊसाहेब, आपून मला हु

कूम देतील तर मी त्यांची थोडी शेवा चाकरी करायला जाईन ह्मणतों.

राजा. —— मी ही तुज बरोबर येऊन त्यांचें समाधान करितों. त्यांजवर व मजवर प्रसंग एक सारखाच आहे, तथापि माझ्यापेक्षां त्यांचा फार नाश झाला. आतां मला असें वाटतें कीं, नाश व दुःख हीं कांहींच नाहींत; उलटें ह्यांत माझें हित झालें, कोणतें कीं द्रव्य खर्च केल्यानें मिळावयाची नाहीं अशी जी अमूल्य वस्तू ह्मणजे तुझ्या कुटुंबाच्या परिचयाची व तुझ्या स्नेहाची दृढि तीं ह्यां मिळविली;

---

## माळाबाग.

विद्याधर ह्मणून कोणी गृहस्थ होता. त्यास प्रपंचाच्या निर्वाहासाठीं वडिलोपार्जित स्वास्थ्य वतनवाडी वगैरे सांगावया जोगतें कांहीं नव्हतें; तरी तो थोड्यामध्यें संतुष्ट राहून योग्य आचरणानें वागत असे. आपल्यापाशीं जें काय आहे तितक्यांत संतुष्ट असावें, ही गुह्य गोष्ट त्याला ठाऊक होती, ह्मणून

# मोठा बाग.

द्रव्यद्वारा मिळणारे जे द्रव्यवंताचे विलासाचे पदार्थ त्यांवांचू न त्यास काळहरण करणें अवश्य होतें. तथापि दुसऱ्याचे वि लास पाहून ते आपणास नाहींत ह्मणून तो खेद किमपि मा नीत नव्हता, आणि थोडक्यांत संतुष्ट राहून आपल्या सुखां त किमपि अंतर पडूं देत नव्हता. त्याला जन्मादारभ्य एकवे ळ मात्र दुःख प्राप्त झालें होतें, तें हेंच कीं, त्याची सुशीळ प तिव्रता स्त्री मेली, पण त्यासमयीं त्याचे अंतःकरणाचे विसां व्यास एक नारायण नामें पुत्र राहिला होता. तो फार सुशीळ असे, तेणें करून त्याचें अंतःकरण तसेंच सुखी राहिलें होतें. आपल्या स्थितीप्रमाणें पुत्रानेंही मिळेल तेवढ्यांत संतुष्ट अ सावें, ह्याविषयींच्या विचाराकडे त्यानें आपलें मन योजिलें. ना रायणही सद्गुणी, चतुर, व समंजस होता; हे त्याचे गुण पा हून संपत्तीच्या प्रत्येक पदार्थांमध्यें गुण असून दुर्गुण किती आहेत हें पुत्रास दाखविण्याचा यत्न विद्याधरानें मांडला. असा तो बाप अल्पसंतोषानें सुख आपण जातीनें अनुभवून पुत्रा चेही मनांत ठसवावें ह्याविषयींचा उद्योग करिता झाला. तो पु त्राचे कल्याणाची वांछा धरून मनांत ह्मणत असे कीं, स्वल्पां त देहाचा निर्वाह करून आनंदित असल्यानें श्रीमानापेक्षा ही सुखाचा लाभ अतिशयित होतो. जो न मिळावयाचा पदार्थ

# बाळमित्र.

त्यावर प्रीति व आशा ठेवणें हा केवळ मूर्खपणा होय. अशी बुद्धि जर पुत्रास मजकडून मिळेल तर इतरवस्तूंपेक्षां ती बुद्धि त्यास फार हितावह होईल, असें तो वारंवार चिंतन करीत असे.

एके दिवशीं विद्याधर नारायणास समागमें घेऊन एक फार रमणीय बाग होता तेथें गेला; असा बाग नारायणानें कधींच पाहिला नव्हता. त्या बागांत नारळी, पोफळी, आंबे, अशोक, इत्यादि वृक्षांची निबिड छाया आहे; द्राक्षांचे मंडप, व जाई, जुई, चमेली, मोगरा, गुलाब, शेवंती इत्यादि नाना प्रकारची फुलझाडें फुललीं आहेत; पुष्पांचे परिमळाचा घमघमाट जिकडे तिकडे चालला आहे; जागीं जागीं कारंज्यांचे फंवारे उडताहेत; हौदांतून कमळें फुललीं आहेत; त्यांजवर भ्रमर गुंजारव करिताहेत; मंद शीतळ वायू झुळझुळ वहात आहे; तेथील वागणारे मनुष्यांची मुखश्री सुप्रसन्न होत आहे, असें तें अतिरमणीय स्थळ पाहून नारायणाचे अंतःकरणास अति आनंद झाला. एकदांच सहस्रावधि रमणीय पदार्थ त्याचे दृष्टींत येतांच तो आश्चर्यांत निमग्न झाला. आणि त्याची बुद्धि अगदीं गुंग होऊन गेली. हें पाहून विद्याधरानें पुत्राची चकभूल जावी ह्मणून तेथें एक बंगला होता त्या ठिकाणीं त्यास नेऊन भोजन घातलें. भोजन झाल्या नंतर नारा

# मोठा बाग.

यण आपल्या बापास ह्या प्रमाणें बोलूं लागला.

दादा, पाहिलेंना तुह्मी? इकडचे लोक कसे श्रीमंत आहेत ते? बागाचे दरवाज्यापाशीं कितीरथ उभे होते; आणि त्या लोकांचे आंगावर कसे भरजरी बादली पोषाक, व कंठी चौकडे वगैरे किती अलंकार होते. पहा, त्यांचें कसें भाग्य आहे तें, जें जें मनांत येईल तें तें घ्यावयास व करावयास ते समर्थ आहेत. असें आपणास कां नाहीं बरें? ह्या लोकांपाशीं रुपये फार आहेत तसे तुह्मांपाशीं कां नाहींत? मी खरेंच सांगतों, आपण गरीब आहों हें आतां माझे ध्यानांत येऊं लागलें. पाहिलें असतां ते तुह्मांपेक्षां स्करीतीनें चालणारे नाहींत. मग असें होण्याचें कारण काय?

हें ऐकून विद्याधरानें उत्तर दिलें कीं, मुला, आह्मी गरीब आहों असी तुझी समजूत झाली काय? तर आतां मी तुला सांगून ठेवितों कीं, आपण त्या लोकांपेक्षां फार मातवर आहों.

नारा० — तर मग तुह्मांपाशीं इतका पैका आणि असा बाग कुठे आहे?

विद्या० — हा काय? ह्यापेक्षां मजजवळ पैका व बाग चांगला आहे.

नारा० — काय ह्मणतां? बाग तुह्मांपाशीं आहे तर मीं कधीं

पाहिला नाहीं, दादा, तर तो मला दाखवाना.

विद्या० — बरें, तुला एखादे दिवशीं दाखवीन.

नंतर एके दिवशीं विद्याधर पुत्रास, चल, तुला आपला बाग दाखवितों, असें ह्मणून, जेथून फार लांबवर देश दृष्टीस पडत होता अशा पर्वतावर त्यास घेऊन गेला. त्या पर्वताचे उजवे बाजूस एक फार मोठें रान आहे, तें असें कीं, त्याची हद्द काळे धारेशीं लागलेली आहे, डावे बाजूस सुंदर मौजेचें हिरवेंचार कुरण आहे, व पिकांनीं भरलेलीं शेतें आहेत, पुढचे बाजूस फार मोठे मैदानांत पुष्कळ नद्यांचे प्रवाह वाहताहेत, जिकडे पहावें तिकडे मनुष्यें आपआपल्या कामांत तत्परतेनें लागलीं आहेत, कोणेक ठिकाणीं कुणबी शेतें कापिताहेत, कोणेक ठिकाणीं कोळी नद्यांत मासे धरिताहेत, कोणेक ठिकाणीं कितीएक लोक शस्त्रें घेऊन मृगयेसाठीं धांवताहेत, मेंढरांचे कळप व गुरांचीं खिल्लारें जिकडे तिकडे चरताहेत, व छायेंत बसताहेत, असें फार सुंदर स्थळ पाहून विद्याधर व नारायण ह्यांस अतिशयित आनंद झाला. त्यासमयीं नारायणानें बापास प्रश्न केला.

नारा० — दादा, तुमचा बाग अझून कोणीकडे आहे? आपण तेथें केव्हां जाऊन पोहोंचूं?

विद्या० — मुला, हल्लीं आपण आपल्या बागांतच आहों, हाच

# मोठाबाग.

माझा बाग.

नारा० — काय? हाच बाग? हा बाग नव्हे, हातर डोंगर आहे.

विद्या० — भोंवताली पहा, जेथ पर्यंत तुझी दृष्ट पोंहचते तेथ पर्यंत जे मळे, व शेतें, कुरणें, व बाग बगीचे आहेत ते सर्व माझे आहेत.

नारा० — हें मी खरें समजणार नाहीं, उगीच तुह्मी माझी थट्टा करितां, दादा.

विद्या० — नाहीं नाहीं, थट्टा नव्हे; मी खरेंच सांगतों. तूं असें पहा कीं, मालकानें जें जें करावयाचें तें तें करावयाचा अधिकार मलाही आहे. मालका प्रमाणें ह्यांपासून मलाही सुख मिळतें.

नारा० — तें कसें तें मला समजून सांगा.

विद्या० — बरें, हा सर्व मुल्ख तुझाच जर असता तर तूं काय करतास?

नारा० — मी मालक आपले मालाचें जसें करितो तसें मीही करितों.

विद्या० — तें काय बरें?

नारा० — पहिल्यानें तर ह्या रानांतली झाडी तोडून सर्पण

पुष्कळ जमा करितों, मग हरणें धरावयास मृगयेस जातों, आणि बैल, गाई, ह्मशी, इत्यादि जनावरें पुष्कळ बाळगितों, शेतांचे दिवसांत शेतें कापून रूड्या घालून ठेवितों.

विद्या० — तूं ठीकच बोलतोस, नारायणा; तुझें आणि माझें मत एकच पडतें, जसें तूं करीन ह्मणतोस तसेंच मी करीत आहें; ह्याविषयीं पाहिजे तर तुझी खातरी करून देतों.

नारा० — ती कशी करतां, दादा?

विद्या० — प्रथम मळा जितकें सर्पण लागतें तितकें हे लोक ह्या रानांतून तोडून आणून मला देतात.

नारा० — बरें, तर, मीं कधींच तुह्माला ह्यालोकांस हुकूम करतांना पाहिलें नाहीं.

विद्या० — मला इतकी खटपट करणें नको, हुकमा शिवाय ते आपाप माझे घरीं आणून देतात.

नारा० — लोक तुमचे घरीं सर्पण आणून देतात हें खरें, पण तुह्माला त्यांस पैसे द्यावे लागतात कीं नाहीं?

विद्या० — बरें, मी जर ह्या रानाचा खरा धनी असतों तर मला कांहींच खर्च न लागता कीं काय?

नारा० — मग कांहींच खर्च नको; लोक फुकट तुमचे घरीं

# मोठाबाग.

आणून पोहोंचविते, त्यांस दमडी ही द्यावी लागतीना.

विद्या० —— तूं असें समजतोस काय? मला वाटतें कीं, त्यास दुप्पट खर्च लागता. कसा तर, लांकडें तोडावयास माणसें चाकरीस ठेविलीं पाहिजेत, त्यांस कुऱ्हाडी वगैरे सामान दिलें पाहिजे, ह्याला पैसे खर्चावे लागतें कीं न लागते?

नारा० —— बरें तर ही गोष्ट राहूं द्या, पण तुम्हांला त्या रानांत मृगयेस जाण्याचा अधिकार आहे काय?

विद्या० —— मृगयेस स्वतः जाण्याचें काय कारण?

नारा० —— हरणें धरून आणावयासाठीं.

विद्या० —— बरें, मला हरणें पाहिजेत तर मी पारध्यास सांगेन; त्याजकडे हरणें पुष्कळ असतात त्यांतून मला पारधके ल्याशिवाय पाहिजेत तितकीं मिळतील. त्यांत कदाचित् त्या रानांतलीं ही हरणें असतील.

नारा० —— पण त्यांस रुपये द्यावे लागतीलना?

विद्या० —— होय, पण पारध्यास दरमाहा द्यावा, आणि बाघरा, जाळीं, फासे, घेऊन द्यावे, इतक्या खटपटीपेक्षां पैसा टाकून घ्यावें ह्यांत फार स्वस्त आहे. आमचा शिकारखाना फार चांगला, सुंदर, बेताचा आहे. त्वां पाहिलेंना, थोडक्यांच्या शिकारखान्याचा नाश तीं हरणें व पांखरें कसा क

रिताहेत तें? आणि त्यामुळें त्यांस केवढा उपाधि आहे तो? तसें कांहीं मला आहे? मी कसा आपला बिनघोर आहें ब रें?

नारा० —— आणि ह्या कुरणांत गाई, म्हशी, मेंढरें, चरत आहेत हीं सर्व तुमचींच आहेत?

विद्या० —— होय, माझींच आहेत; तुला जें रोजरोज लोणकढें तूप, दूध, दही, लोणी मिळतें तें कोठून? ह्या गाई म्हशींचें.

नारा० —— पण दादा, हे सर्व कळप, व खिलारें, व शेतें भातें, नद्या, हीं सर्व जर तुमचीं आहेत, तर मातबर लोकांचे येथें जसे रोज नाना प्रकारचे भोजनास पदार्थ असतात तसे तुमच्या येथें कां नाहींत?

विद्या० —— बरें, पण मातबर लोकांचे पात्रावर जितके पदार्थ असतात तितके सारे ते खातात कीं काय?

नारा० —— असें नाहीं, त्यांतून जितके त्यांस रुचतात तितकेच ते खातात.

विद्या० —— मी कांहीं पात्रावर पदार्थ वाढल्यावर मग निवडानिवड करीत नाहीं, अगोदरच पाहून पाहिजेत तितकेच शिजवितों, उगीच नासावयास अधिक शिजवीत नाहीं. तसें

# मोठाबाग.

मजजवळ नाहीं खरें, पण जर फार पदार्थ करावे तर मा जोऱ्या सारिखे टाकावे कसे? अधिक खावे तर पोट मोठें केलें पाहिजे, ह्मणजे ठीक पडेल.

नारा० — पण दादा, मातबर लोक जसें नाना प्रकारचें उत्तम भोजन करितात, तसें कांहीं तुह्मी करीत नसालसें वाटतें.

विद्या० — येवढें बरीक असमंजसपणें बोललास. मुला, ऐकिलें, त्यांपेक्षां ही मी अतिशयें करून उत्तम भोजन करितों. श्रीमंतलोक तोंडास रुचि यावयासाठीं चटण्या कोशिंबिरी इत्यादि नाना प्रकारचे पदार्थ करितात. ती रुचि मजपाशीं स्वतः सिद्ध आहे.

नारा० — बरें, श्रीमंत लोकांपाशीं त्यांचे इच्छे पुरतें द्रव्य आहे, तसें तुह्मांजवळ कां नाहीं?

विद्या० — त्यांपेक्षांही मजजवळ विशेषें करून आहे, तें कसें ह्मणशील तर मला इच्छा नाहीं.

नारा० — पण, मला वाटतें कीं, इच्छेची शांति करावी ह्यांत फार सुख आहे.

विद्या० — नाहीं, इच्छेची शांति करण्यापेक्षां इच्छाच नहोऊं द्यावी ह्यासारखें सुख दुसरें नाहीं.

नारा० — मला वाटतें कीं, ईश्वर मातबर लोकांस सोनें रुपें फार देतो, तस्मात् त्याची कृपा तुजपेक्षां मातबर लोकांवर अधिक आहे.

विद्या० — तुला आठवण नाहीं कीं, सोमवारचे दिवशीं मीं तुला जेवणांत जिलिबी वाढली होती, तिजवर तुझी भारी आवड बसली होती?

नारा० — होय दादा, तुह्मीं मला ती एकच वाढली होती.

विद्या० — तूं आणखी मागत होतास, पण दुरडींत पुष्कळ जिलिब्या असतां मीं तुला वाढल्या नाहींत. ह्याचें कारण काय तें तुझ्या लक्ष्यांत आलें?

नारा० — हेंच कारण असेल कीं, फार खाल्ल्यानें कदाचित् अजीर्ण होईल.

विद्या० — होय, हेंच, पण मीं केलें तें ठीक केलें कीं नाहीं?

नारा० — ठीकच केलें, दादा. तुमची ममता मजवर भारी आहे, मला आरोग्य होण्याविषयीं तुह्मीं तत्पर आहां हें मी पक्कें जाणतों. ते दिवशीं तुमचे मनांत असें आलें असेल कीं, ह्या जिलिब्या खातेवेळेस तर ह्यास गोड लागतील पण पुढें ह्यांपासून कांहीं विकार होईल. असें नसतें तर तुह्मी आणखी वाढावयास कांहीं नाबर नव्हतां, हें

मला समजतें.

विद्या० — देव मजपेक्षां तुजवर ममता कांहीं कमी करतो, असें तुला वाटतें काय?

नारा० — नाहीं, तुह्मी फारदां सांगितलें कीं, गरिबापासून मातबरा पर्यंत देवाची कृपा सारखीच आहे.

विद्या० — तर मग देवाला द्रव्य देण्यास कठीण काय आहे?

नारा० — कांहीं कठीण नाहीं, जशी मी पायांखालची माती देण्यास समर्थ आहें, तसा तो द्रव्य देण्यास समर्थ आहे.

विद्या० — तूं ह्मणतोस कीं, देवाची कृपा मजवर आहे, व द्रव्य देण्याचें त्यास कांहीं कठीण नाहीं; असें जर आहे तर तुला द्रव्य कां दिलें नाहीं? ह्यावरून काय समजावें?

नारा० — जें मी द्रव्य इच्छितों तें नाशास कारण होईल.

विद्या० — ह्याविषयीं तुह्मी पक्की खातरी आहेना?

नारा० — होय, पक्की आहे. आतां मी तुह्मांपुढें निरुत्तर झालों. तथापि, दादा, —

विद्या० — तथापि दादा कशाला, काय तुझे मनांत असेल तें बोलसना?

नारा० — ह्या सर्व देश तुमचा हें कांहीं माझ्या मनांत खरें भासत नाहीं.

विद्या० — कां बरें, ह्याचें काय कारण?

नारा० — तुह्मांला आपल्या इच्छे प्रमाणें ह्याचा उपभोग करतां येत नाहीं ह्मणून.

विद्या० — गांवांत एक मोठा नामांकित पुरुष जगत्‌शेट ह्मणून आहे तो तुला ठावका आहे?

नारा० — होय, शहराचे भोंवताले जे मोठ मोठे बाग आहेत ते त्याचेच नव्हत?

विद्या० — हो हो, ते सर्व त्याचेच आहेत. पण त्यास इच्छे प्रमाणें आपल्या सर्व बागांचा उपभोग घडतो काय?

नारा० — नाहीं, दादा, तो बिचारा द्राक्षांचा एक दाणा देखील त्यांतला खात नाहीं.

विद्या० — कां बरें? तो मालक आहे, आणि त्याचे बागांत नाना प्रकारचे पदार्थ आहेत, मग कां उपभोग करीत नाहीं?

नारा० — उपभोग करावा खरा, पण त्यांतून जर तो कांहीं खाईल, तर त्याची प्रकृति अगदीं बिघडेल.

विद्या० — ह्यावरून असें समज कीं आपल्या जवळ जरी

चांगले पदार्थ अनुकूळ आहेत, तरी एखादा समय असा येतो कीं, त्या पदार्थांचा उपभोग इच्छे प्रमाणें करतां येत नाहीं, कांहीं तरी अडचण असते. माझी ही अवस्था तशीच आहे, ह्मणून मला इच्छे प्रमाणें ह्या माझे बागाचा उपभोग करवत नाहीं. तें कसें ह्मणशील तर, जगत्शेटास जशी प्रकृतीची अडचण आहे तशीच मला द्रव्याची अडचण आहे; बरें, तूंच सांग कीं, ह्या दोघांतून दैववान् कोण आहे.

नारा० — खरेंच दादा, ज्याची प्रकृति चांगली तो दैववान्. प्रकृति नीट नाहीं तर उपभोगाचे सर्व विषय व्यर्थ आहेत. पण तुह्मांला कधीं घोड्यावर बसणें आवडतें?

विद्या० — मला वाटतें ते समयीं मी घोड्यावर बसून विलास करतों.

नारा० — तर तुमचें कुरण आहे, मग तुह्मी घोडा बाळगून त्यास येथील गवत कापून कां नेत नाहीं?

विद्या० — मुला, मी तसेंच करितों. ज्या घोड्यावर मी बसतों तो घोडा ह्या कुरणांतल्या कापलेल्या गवताच्या पेंढ्या खात असेल.

नारा० — पण मीं तुमचे पागेत कधीं घोडा पाहिला ना

हीं.

विद्या० — ईश्वर कृपेनें मला इतका खर्च नाहीं.

नारा० — तर मग जेव्हां तुह्मांला घोड्यावर बसण्याची इच्छा होत असेल तेव्हां कांहीं बसणें घडत नसेल.

विद्या० — छी, छी! तूं चुकून बोलतोस; मी असा खबरदार आहें कीं, जेव्हां घोड्यावर बसल्यानें आपलें हित आहे असें वाटतें तेव्हांच मात्र मी बसावयाची इच्छा करितों; आणि त्यासमयीं एक दोन रुपयांचा खर्च भाड्यास करितों ह्मणजे पाहिजे तसा घोडा मिळतो. तितका खर्च करण्या पुरतें ईश्वरानें मला सामर्थ्य दिलें आहे.

नारा० — भाडें, तें काय? त्यापेक्षां एक मोठा रथ असावा, त्यास खासे मजेचे घोडे लावून त्यांत बसून विलास भोगावा, हें मला चांगलें वाटतें.

विद्या० — तें चांगलेंच आहे, पण एक्या रथाचे मागें खटपट किती आहे बरें? तुटलें मोडलें नीट करावयास सुतार लोहार वगैरे ह्यांचीं नित्य गरज लागती; आणि घोड्यांस जर कांहीं आजार झाला, किंवा गाडीवान् हजीर नसला, तर त्याचें काम बंद होतें; तीं दोनी यथास्थित असलीं तरच तो चालावयाचा; त्यांतही आणखी रथ उलटण्याचा धोका

आहे. खाण्याची स्वस्थता असल्यानें मनुष्य स्वस्थ बसतें, व्यायाम घडत नाहीं, त्यामुळें प्रकृत बिघडती; ह्मणून मी तुला, नारायणा, खरेंच सांगतों, मला पायीं चालावयाचें पडतें ह्याचें मला कांहीं एक वाईट वाटत नाहीं. बरें, आतां सूर्य अस्तास चालला, लौकर घरीं गेलें पाहिजे, नाहीं तर रात्र होईल, आंधार पडेल; पण माझा बाग पाहून तुला कांहीं आनंद झाला?

नारा॰ — दादा, तो तुमचा खरा बाग असता तर मला संतोष झाला असता.

हें ऐकून विद्याधरानें हास्य वदन केलें, आणि उभयतां, पितापुत्र, घरीं जावयाकरितां पर्वतावरून चालते झाले. त्यासमयीं असें झालें कीं, ते दोघे वाटेनें जात असतां एक्या शेतांत जळबंब पाणी सांचलेलें त्यांचे दृष्टीस पडलें, तेव्हां हा तलावच आहे असें त्यांस भासलें.

विद्या॰ — अरे कर्मा! ह्या अवघ्या शेतांत पाणी कसें भरलें आहे हें! नदीचा बांध फुटला काय? अरेरे, ह्या सालचा तर दाणा अगदीं बुडाला असें दिसतें.

नारा॰ — शेताचे मालकास हें वर्तमान समजलें असतां त्यास फार दुःख होईल.

विद्या० —— त्याचा केवळ इतकाच नाश झाला असें नाहीं; आतां ह्या शेताचा बांध फुटला आहे तो बांधावयास त्याला मनस्वी पैका लागेल; ह्या खर्चा खालीं ह्या शेताचें दहा वर्षांचें पैदास्तीपेक्षां अधिक जर बूड नहोईल तर त्याचें प्रारब्ध सबळ.

नारा० —— अबब! फार नाश झाला तर.

विद्या० —— (कांहीं पुढें जाऊन.) ह्या ठीकाणीं पाणचक्की होतीनाहीं?

नारा० —— पाणचक्की तर, दादा, ती आपल्या पुढेंच आहे.

विद्या० —— अरे होय, खरें, तीच आहे; तिचा शब्द मला ऐकूं आला नाहीं ह्मणून भ्रांति पडली. पण मी प्रतिज्ञा करतों कीं, महापूर येऊन ती चक्की वाहून गेली. (उभयतां जवळ जाऊन पहातात, तों तिचा अगदीं विध्वंस झाला आहे.) अरे अरे, गरीब बिचारा, इचा धनी त्यानें आतां काय करावें? येवढें नुकसान भोगावयास मोठा दौलतदार मनुष्य असावा ह्मणजे ठीक.

नारा० —— माझ्या ही मनांत फार वाईट वाटतें. पण, दादा, सूर्य मावळला तरी अझून ते गवंडी तेथें काम करितात,

# मोठाबाग.

हें काय?

विद्या० — मला ठाऊक नाहीं, पण विचारलें असतां समजेल. (गवंड्यांस हाक मारून पुसतो.) रे गवंड्यांनो, तुह्मी इतक्या रात्रीस काम कां करीत आहां?

गौंडी — ह्या ठिकाणीं आह्मांस सारे रात्र जागून काम केलें पाहिजे; कालचे रात्रीं एथें चोर आले होते, त्यांनीं आंत जावयासाठीं बागाची भिंत फोडून बंगल्यांतील सरंजाम चोरून नेला. चोरी झाल्याची गोष्ट आज सकाळीं समजली, ह्मणून बरें झालें, रात्रीच गूल झाली असती तर फार वाईट होतें.

विद्या० — कां? कां? असें कां ह्मणतां?

गौंडी — कारण कीं, चोरांनीं बंगला जाळावयाची तयारी करून ठेविली होती. त्यांचा मनसूबा असा होता कीं, आपण सांपडतों असें झाल्यास बंगल्याला आग लावून द्यावी, आणि त्या गडबडींत निघून जावें, परंतु ती आपली गुपचुप चोरी झाली ह्मणूनच बरें झालें. बागाचा धनी ह्मणत होता कीं, मी मोठा भाग्यवान; जर कदाचित् मजकडून रात्रीं चोरांस उपद्रव लागला असता तर माझे डोळ्यां देखत येवढी इमारत जळाली असती; आतां इतकेंच मात्र, भिं

नीची दागदुजी केली, आणि कांहीं नवा सरंजाम खरेदी केला ह्मणजे झालें. फारतर एक रामोशी चाकरीस ठेवावा लागेल.

विद्या॰ — (हें ऐकून मुकाट्यानें अंमळ दूर जाऊन ह्मणतो.) नारायणा, हा इतका अनर्थ झालेला पाहून तुला दुःख वाटत नाहीं?

नारा॰ — मला हो कां तिऱ्हाईत ठिकाणीं दुःख, माझें कांहीं नासलें नाहीं.

विद्या॰ — पण अशी नुकसानी जर तुझी झाली असती तर? जसें त्या बागाचे धन्यानें आज सकाळीं पाहिलें तसेंत्वां पाहिलें असतें, ह्मणजे पाणचक्की वाहवली, व शेतांत पाणी शिरलें, व चोरी झाली, हे अनर्थ पाहिले असते तर तूं दुःख रहित असतास काय?

नारा॰ — शंभर वांट्यांनीं अतिशयें करून दुःखांत बुडालों असतों.

विद्या॰ — अशीं दुःखें तुला नित्य नित्य भोगावयाचीं जर प्राप्त होतीं तर आतां जसा तूं सुखी आहेस तसा तेव्हां असतास काय?

नारा॰ — नाहीं, मी तर कधींही सुखी नसतों, केवळ दुःखस

# मोठाबाग.

मुद्रांत बुडून गेलों असतों.

विद्या० —— तर, बाबा, नारायणा, असेंच आहे; ज्यांपाशीं संपत्ति फार आहे त्यांचे मागें असे अनर्थ नित्य आहेत; त्यांचें अंतःकरण सदा सर्वदा द्रव्यांतच गुंडाळलेलें असतें; शेवटीं द्रव्यच त्यांचे नाशास कारण होतें. एखादे सालीं खरपड पडलें, किंवा कांहीं एक योजलेली गोष्ट व्यर्थ झाली ह्मणजे इतक्यानेंच त्यांची नुकसानी होती; मग त्यालोकांस असें वाटतें कीं, खर्च कमी केला असतां आपली प्रतिष्ठा उणी पडेल, ह्याभयानें ते अधिक अधिक खर्च करितात. जों जों त्यांचे द्रव्यास खांच पडत जाती तों तों ते अधिक खर्च करून आपण संपन्न आहों असें लोकांत सोंग आणितात. अशी जी लयास जाणारी प्रतिष्ठा तिचा सांभाळ त्यांस विशेषें करून करावा लागतो, अशा वागणुकेचा परिणाम शेवटीं असा होतो कीं, चाकरांचा गेजमुराथकतो, ह्यामुळें ते नाना प्रकारें त्रास देतात, काम नीट करीत नाहींत, व आज्ञा पाळीत नाहींत, व अमर्यादेचें भाषण करितात, व घरांत चोरी मारी करितात; पुत्रास सद्गुण न शिकवितां द्रव्य वाढवावयाची इच्छा करितात, तेणें करून पुत्र कुमार्गी लागून चोरी लबाडी अशीं नीच कर्मे करू

लागतात; आपण कर्ज भरू होतात, मग ज्यांचें देणें ते घरदार विकून घेतात, व येणें तें कोणी देत नाहीं; अशीं अनेक प्रकारचीं संकटें उभीं राहिलीं ह्मणजे त्यांच्या आंगीं द्रव्याचा दम पहिला असतो तो अगदीं निघून जातो; मग त्यांची अवस्था काय पहावी? दरिद्रानें पीडिले होऊन लोकांच्या नरकांत बुडून भयां भयां करीत अन्नाचे मागें हिंडतात.

नारा० — (आंग थरारून.) काय भयंकर गोष्ट सांगितली ही!

विद्या० — खरेंच आहे; अशा गोष्टीचा दाखला पाहिजे तर संपन्न असून दरिद्री झालेले असे मनुष्य गांवांत पुष्कळ दाखविनों. त्यांकडे पाहिलें असतां अविचार आणि धनद्रव्य ह्यांचा दम, ह्यांचा परिणाम शेवटीं कोणत्या रीतीनें होतो ह्याची समजूत होईल, आणि द्रव्यादिकें करून जे अंध आहेत त्यांचे डोळे उघडतील. संपत्ति ही दुपारच्या सांवली प्रमाणें आहे.

नारा० — तर ईश्वरानें आपणांस साधारण स्थितींत ठेविलें आहे हें ठीकच केलें; त्यांत आपणावर ईश्वराची कृपा आहे असें तुह्मी मानितां ना?

# मोठाबाग.

विद्या०——होय खरेंच आहे; कोणतीही गोष्ट दूरवर विचार करून करावी; अगोदर लोभ जिंकला पाहिजे; इच्छाकरणें तरी आपली योग्यता व वैभव पाहून करावी; अमर्याद इच्छा करूं नये; सर्वदा संतोष वृत्ति असल्याचे पोटीं कोणत्याही पदार्थाची कमती वाटत नाहीं. पहा बरें, मला कांहीं स्रख कमी आहे कीं काय? तूंही तशी वृत्ति ठेवशील तर तुलाही कांहीं कमी नाहीं, आणि तुला तरी पडिलांपेक्षां विशेष स्रख भोगण्याविषयीं इच्छा कशी होईल. अरे, सर्व पृथ्वी माझी आहे, अशी भावना असली ह्मणजे सर्व मालआपलाच आहे. काम मात्र यथा योग्य केलें पाहिजे, मग उदरपूर्ति सहज होते. ईश्वरानें पर्वताच्या मध्य भागा प्रमाणें जी चांगली स्थिति तींत तुला ठेविलें आहे; पर्वताच्या माथ्यावर वायु इत्यादिकांचा उपद्रव, आणि तळीं ओढे नाले दलदल. ह्याप्रमाणें संपत्तीच्याही तीन स्थिती आहेत, अतिशयित संपत्ति पर्वताच्या माथ्याप्रमाणें आहे, मध्यम संपत्ति मध्यभागा प्रमाणें, व कनिष्ठ संपति खालच्या भागा प्रमाणें आहे; पर्वताच्या मस्तकावर जसा वायूचा झपाटा फार तसा अतिशयित संपत्तिचा नास राजा चोर इत्यादि रूप वायूचा झपाटा भारी लागतो.

# बाळमित्र.

पर्वताचा मध्यभाग जसा निर्वात असतो तशी मध्यम संपत्ति निरुपद्रव असते; पर्वताच्या खालच्या भागांत चिखल ओढे नाले असतात, ह्मणून तेथें चालणारास जसें पाऊल टाकावयास कठीण पडतें तसें कनिष्ठ संपत्तिवानास हरएक मनांत आणलेली गोष्ट करावयास अवघड पडती; ह्यासाठीं जे वरल्या प्रदेशींचे संपत्तिवान लोक आहेत त्यांजकडे कधीं कधीं दृष्टि योजावी, पण कशा करितां? त्यांचे संपत्तीची ईर्षा करावयासाठीं नव्हे, त्यां भोंवताला जो संकटाचा वेढा आहे तो आपणाला नाहीं ही ईश्वरानें मोठी आपणावर कृपा केली हें मनांत आणावयासाठीं. आणि कधीं कधीं खालच्या प्रदेशीं असणारे जे दरिद्री लोक त्यांजकडेही दृष्टि योजीत जावें, पण त्यांचे गरिबीचा उपहास करण्या करितां नव्हे, त्यांपेक्षां आपणास ईश्वरानें सुखी ठेविलें आहे हें मनांत आणावयाकरितां. असें अवश्य केलें पाहिजे. हा जो मीं तुला उपदेश केला हा दृढ मनांत धरून तसा वर्तत जा, आणि पुढें आपल्या पुत्रासही असेंच शिकवीत जा, ह्यांत हित फार आहे; असें बोलत बोलत ते पितापुत्र उभयतां घरीं पोहोंचले.

# मोठाबाग.

ह्याप्रमाणें विद्याधरानें ईश्वरानें कृपाकरून दिलेल्या अन्नो दकावर संतुष्ट राहण्याचा उपदेश पुत्रास केला. ज्यास जन्मपर्यंत भय नाहीं असें वतन पुत्रास साधून देण्याविषयीं उद्योग विद्याधरानें मात्र केला.

---

# लपंडाव.

## नाटक,

## दोन अंकी.

### पात्रें.

| | |
|---|---|
| रामराव | कोणी गृहस्थ. |
| शिवराम | रामरावाचा मुलगा. |
| दुर्गा. मथुरा. | रामरावाच्या मुली. |
| कावेरी. मनूलंगडी. | त्या मुलींच्या मैत्रिणी. |

# बाळमित्र.

| | | |
|---|---|---|
| वडीलरत्नपारखी.<br>धाकटारत्नपारखी. | - - - - - | शिवरामाचे मित्र. |
| तात्या | - - - - - - - - | ओळखीचा मुलगा. |
| भिंग्या | - - - - - - - - | मोतादद्दार. |

## स्थळ,

## रामरावाची खोली.

## अंक १.

रामरावाचे खोलींत घडवंचीवर कागदाचे रुमाल आणि पोथ्या आहेत, आणि कोंपऱ्यांत एक शिंग आहे.

---

## प्रवेश १.

## शिवराम आणि दुर्गा.

शिव० ——(बाप माडीवरून खालीं उतरत आहे त्यास म्हणतो.) बाबा, तुम्ही कांहीं काळजी करूं नका, ह्या पोथ्या मी जपून फळीवर ठेवीन.(हर्षानें उड्या मारीत खोलीचे बाहेर येतो.) आतां आम्ही चांगला चांगला खेळ खेळूं.(मो

# लपंडाव.

जर गेल्या आंगणा, उंदीर करिती दणाणा, अशी ह्मण आहे.) (दुर्गा आंत येती, तीस ह्मणतो.) बरें दुर्गा, आई बाहेर गेली? आपली मित्र मंडळी आली आहे कीं नाहीं?

दुर्गा — माझ्या मैत्रिणी आल्या, पण अझून तुझे मित्र आले नाहींत.

शिव० — हें तर वाजबीच आहे; मुली जशा सर्वदा खेळावयास रिकाम्या, तसे मुलगे नसतात; त्यांस खेळावयाला आणावयाचें झाल्यास ते विद्याभ्यासावरून बळें ओढावे लागतात. मी पैज मारतों कीं, ते दोघे रत्न पारखी ह्यावेळेस अभ्यासांत गुंतले असतील.

दुर्गा — हें मी पक्कें जाणतें कीं, आमची थट्टा करावी हाच त्यांचा अभ्यास असेल. पण रावजींनीं आपणांस येथें खेळण्याची आज्ञा, खरोखरीच दिली आहे कीं काय? ही आपली खोलीतर अगदींच लहान पडली; येथें फिरतां देखील येत नाहीं.

शिव० — मज सारख्या सद्गुणी मुलानें विचारल्यावर ते नाहीं कसे ह्मणतील, वेडे पोरी! पण तूं त्या पोथ्या संभाळ हो.

दुर्गा — तूं काय मला शहाणपण शिकवितोस? मला ठाऊक आहे; मी त्या सर्व सोईनें रचून ठेवीन.

शिव० — (आंगीं प्रौढता आणून.) तें काम अस्मादिकांचें; त्याची वहिवाट मजकडे आहे.

दुर्गा — खरेंचखरे बाबा, तुझ्याहून दुसरा कोण चतुर आहे? पण तुज बरोबर मला काम करणें प्राप्त आहे. मी अगोदर मोठमोठाल्या पोथ्या दुसरें ठिकाणीं नेतें.

शिव० — छे छे, बायकांनीं त्यांस हात देखील लावूंनये; पण एक एक पोथी घेऊन माझे हातावर बरीक रचीत जा, येवढें काम कर ह्मणजे पुरे.

दुर्गा — बरें, कां होईना. (ती एकेक पोथी त्याचे हातावर रचिते, पोथ्यांचा गंज त्याचे हनवटी पर्यंत झाला.) आतां पुरे झालें?

शिव० — (हनवटी वर करून.) आणखी एक ठेव बरें; हाँ, पुरे आतां, पुष्कळ झालें. (तो एक दोन पावलें हळूहळू चालतो, तों सगळ्या पोथ्या खालीं समईवर पडतात.)

दुर्गा — (मोठ्यानें हांसून.) अहाहा! तिकडेसच चळथ पाडली, पाहा ह्या सुंदर पोथ्या, ह्यांस रावजी कोणाला बोट देखील लावूं देत नाहींत, आणि त्यांची अशी अवस्था झाली! आतां हें समजल्यावर रावजींस फारच आंनद होईल, आणि तुला बक्षीस मिळेल.

# लपंडाव.

शिव०— हा कांहीं माझा अन्याय नव्हे, माझे हाताचा अन्याय आहे, (तो पोथ्या उचलावयास लवतो, जेंवजेंव तो उचलावयास जातो तेंव तेंव त्या आणखी आणखी ढांसळतात.) काय बेट्या पोथ्या, ह्यांना गोपाळा सारखें निसटून जावयास फार कळतें.

दुर्गा— हें काम मी हात लावल्या शिवाय व्हावयाचें नाहीं; पहा मी ह्या आपले साडीचे ओंच्यांत घेतें, तर तूं मेटा खुंटीं बसून ती चळथचीचळथ माझे पदरांत टाक.

शिव०— हा हा ! त्वां भली खाशी कल्पना काढली.( तो मेटा खुंटीं बसून तिचे साडीचे ओंच्यांत पोथ्या ठेवितो.)

दुर्गा— हळूच ठेव भाउराया; पोथ्या चोळवटतील बरें; आतां मी ह्या दप्तराचे खोलींत नेतें अँ. मुलांपेक्षां मुलीच शाहाण्या असतात असें सर्वलोकांस मान्य करणें प्राप्त आहे आतां.

शिव०— होय, तशा मुलीं मध्यें तूंच मुख्य आहेस वाटतें? ह्मणूनच घरांत तूं रोज रोज उलाढाल करतेस ती नीट करण्या करितां मथुरेस खटपट करावी लागते.

दुर्गा— तुह्माही पंतोजी तुजकडे नित्य नित्य न पाहतात र तुझे कागद तुला सांपडते तें मी पाहतें. असो, पण आ

तां अवघ्या पोथ्या झाल्याना?

शिव० — होय, चल आतां, येथें कांहीं राहिलें नाहीं, (ती बाहेर जाते. शिवराम खोलीतला केर काढून जागा स्वच्छ करितो.) वाहवा! खाशी मजेची जागा बनली; आतां येथें खूब मौज होईल. पण ते अझून कां येत नाहींत कोणजाणे ब्वा; मला मित्राचे घरीं जावयाचें झालें तर मी कधीं उशीर लावीत नसतों.

दुर्गा — (मातक्यानें आंत येते, आणि आसपास फिरून पाहते.) बरीच जागा झाली, पण भाउराया, हें शिंग कोठें तरी दडवून ठेवबा, आतां तुझे मित्र येतील त्यांचे दृष्टीस हें पडलें तर ते सारा दिवस वाजवून वाजवून कपाळ उठवितील.

शिव० — बरें, मी ह्याला सांदींत लपवून ठेवितों, हें कदाचित माझ्या उपयोगीं पडेल. पण तुझ्याव मैत्रिणी आतां येथें येऊन कलकलाट करतील. पाहूं बरें आतां कोण बाजार भरवितो तें.

दुर्गा — मी आपल्या मैत्रिणींस हाक मारावयास जातें.

शिव० — माझ्या खिजमतगारास सांग कीं, माझे मित्र आले ह्मणजे त्यांना मजकडे घेऊन ये.

दुर्गा — बरें. (ती बाहेर जाते.)

शिव० — ह्या शिंगाच्या आवाजामुळें कितीवेळ मी खेळसोडून घरांत आलों असेन? ह्याचा आवाज मोठा द्वाड आहे, तो अझून माझे कानांत गुणगुण करतो आहे. माझे मित्रांचें घर येथून दोनशें पावलें लांब आहे, आपण शिंग वाजवावें ह्मणजे त्याची ललकारी ऐकून आतां लौकर धांवत येतील. (तो शिंग फुंकतो.) अरे! हें मोठें आश्चर्यच आहे. ते माडीवरून येताहेतसें वाटतें, (तो कानोसा घेतो.) होय होय, खरेंच ते दोघे पारखी आले. आतांच वरंगावर चवरंग मांडून, जसा कोणी गादीवर बसतो तसा मी बसेन. (तो चवरंगावर चवरंग मांडावयास लागतो. इतक्यांत दोघे पारखी येतात.)

---

## प्रवेश २

शिवराम, वडील पारखी, आणि धाकटा पारखी.

शिव० — तुह्मी आंत येण्याची इतकी जलदी कां केली? हा

त्यापाशीं अंमळ थांबून मला गादीवर बसूं द्यावयाचें होतें. मी तुह्मांला मोठे समारंभानें आंत घेणार होतों.

**व॰पा॰** — ही गादीना? ह्या गादीवर जरी तूं संभाळून बसतास तरी ह्यावरून खालीं पडून हातापायांस एकादी दुखापत मात्र करून घेतास, आणखी कांहीं नाहीं.

**शिव॰** — खरेंच गड्या, अशा गतगोष्टी बरवरीत पाहिल्या आहेत खच्या.

**व॰पा॰** — हा माझा भाऊ तर कांहीं तुजसारखा असल्या गादीवर बसला नव्हताना? पण ह्यानें एके दिवशीं जिन्याचे पायऱ्यांवरून लोटांगणें खात खात खालीं पडून नाक ठेंचून घेतलें.

**धा॰पा॰** — ख ख ख खरेंच, माझें नाक अझून दुखतें आहे, तो तो तो तात्या मो मोठा द्वाड पोर आहे.

**शिव॰** — तात्या आज इकडे येणार आहे काय?

**व॰पा॰** — ईश्वर करो कीं, तो इकडे नयेवो. तो इकडे यावयाचा आहे असें आह्मांला समजलें असतें तर आह्मी घरांतून बाहेरच निघतोंना.

**धा॰पा॰** — दु दु दुसऱ्याला उपद्रव द्यावा इतकें मात्र त्याला कळतें.

# लपंडाव.

शिव० — हें कशावरून ह्मणतोस तूं?

व०पा० — दोन तीन दिवस झाले, मी आणि माझा भाऊ दो घेजण बाहेर जावयास निघालों होतों; मी अंमळ कशालासा मागें राहिलों, माझा भाऊ माडीवरून खालीं उतरत होता; तों, तो कोणी कडून येऊन जिन्याजवळच्या खोलींत बसला होता कोण जाणे; त्यानें हळूच बाहेर निघून एका एकीं माझे भावाचे पाठींत धपका मारिला, तेव्हां माझा भाऊ घाबरून पाय निसरून जिन्यांत पडला, तो खालीं च आला.

शिव० — त्याचा स्वभाव कसा आहे ह्याची परीक्षा मीं त्याचे तोंडावरूनच केली असती; त्याचें येथें हें येणें प्रथमच आहे. तुमच्या मुलांत माझे मुलास येऊं देत जा, ह्मणून त्याचे बापानें आमचे रावजींपाशीं फार फार आग्रह करून सांगितलें.

व०पा० — ही मोठी वाईट गोष्ट झाली. त्याचा माझा आतांशीं अबोला आहे.

शिव० — तुह्मी ते एक्या बिऱ्हाडीं राहतां, ह्मणून रावजींनीं रुकार दिल्हा. तर तो आल्यानें तुह्मांला संतोष होईल कीं नाहीं?

# बाळमित्र.

व०पा० — संतोष? संतोष पुसाल तर तो दहापांच कोस दूर असता तर बरें होतें. तो आमच्या शेजारीं आल्यापासून आह्मांला एक क्षणभर ह्मणाल तर सुख नाहीं. तोवारंवार आपणच खिडक्यांचीं भिंगें फोडून आह्मांवर आळ घालतो.

शिव० —— त्याचे बापाजवळ त्याचें गाऱ्हाणें कोणी सांगत नाहीं?

व०पा० — त्याचे बापाची प्रकृत एक तऱ्हेची आहे. कोणीं जाऊन कांहीं सांगितलें तर अंमळ त्यास रागें भरलासें करतो, आणि त्याबद्दल कांहीं खावयाला देऊन त्याचे लाड करतो.

शिव० — मी जर तुमचा बाप असतों तर कध्धीं त्या बिऱ्हाडीं राहतों ना, आणखी कोठें जाऊन राहिलों असतों.

व०पा० — होय, खरी गोष्ट, आतां आमच्या बापानें हीअसाच निश्चय केला आहे. त्या घरधन्यास त्यानें सांगितलें कीं, आह्मी हें बिऱ्हाड सोडून जातों, बाबा. आणि आह्मांस ही ताकीद केली कीं, आजपासून तुह्मांला जर कानात्याशीं बोलतां चालतां पाहिलें तर मज सारिखा वाईट कोणी नाहीं; ह्याप्रमाणें आह्मांस सांगितलें आहे. तात्या आ

# लपंडाव.

मची थट्टाच करितो, परंतु लोकांचे आंगावर धूळ तर टाकतो, चिचोंऱ्यातर सोडितो. काय एकेक कीं दोन दोन, किती गोष्टी सांगूं? एके दिवशीं तर एका बायकोच्या आंगावर तोटाच सोडला, ती अशी घाबरली कीं, सारे लोक पाहून हसूं लागले. अशी भलभलत्या खेळावर त्याची प्रीति फार आहे. आणि तो तऱ्हेतऱ्हेच्या रंगाचे मासे रस्त्यांत धरतो.

शिव०— रस्त्यांत मासे धरतो ह्मणजे?

व०पा०— होय जसे कोळीलोक गळ टाकून नदींतले मासे धरतात तसा तो खिडकींत उभा राहून वाटेनें जाणारे येणारे लोकांचीं पागोटीं आंकडीनें उचलून घेतो. कोणी गरीब गुरीब त्याचे घराखालीं गोष्टी सांगत उभे राहिले ह्मणजे तात्यानें लौकरलौकर माडीवर जाऊन एक चिंब्याची लांब आंकडी घेऊन युक्तीनेंच त्यागरिबाचें पागोटें वर उचलून घ्यावें, आणिआपणएक कुत्रें अगोदरच सिद्ध करून ठेवलेलेंच असतें त्याचे शेंपटास त्यापागोट्याचें एक शेवट बांधून तें कुत्रें रस्त्यांत सोडून द्यावें; त्याकुत्र्यानें जिकडे जिकडे पळावें तिकडे तिकडे त्याचे मागें पागोटें फरफटत जावें, मग त्या गरिबानें जेव्हां लांबवर मागें धांवावें तेव्हां त्याचे हातीं पागोटें लागावें.

शिव० — पण हा कांहीं खेळ नव्हे, ही तर शुद्ध लोकांस पिडा द्यावयाची गोष्ट आहे.

व०पा० — ह्याही पेक्षां त्याचें दुसरें आचरण फार वाईट आहे; कुत्रें, मांजर, कोंबडें, वगैरे जें काय त्याचे हातीं सांपडेल त्याचा पाय मोडल्या वांचून सोडावयाचा नाहीं. एके दिवशीं त्यानें वाटेंत सरांटे टाकिले होते, तेव्हां त्याचाच कोणी आप्तविषयी तिकडून आला, तंव ते त्याच्या पायांला मोडले, आणि तो बिचारा लंगडत घरीं गेला. घरच्या चाकर माणसांला उपद्रव म्हणजे किती करतो सांगूं? मी खरेंच सांगतों त्याचा बाप जर चाकर माणसांस रोजमुरा आधीं देताना तर कोणी त्याचे घरीं राहतेंना.

शिव० — असें आहे त्यापक्षीं मी त्यास अगत्य पाहणार; थट्टा करणाऱ्या पोरावर माझी भारी भक्ति आहे.

व०पा० — थट्टा ही सर्वांस प्रिय आहे, परंतु त्याची थट्टा करण्याची चाल कांहीं मुलखा निराळीच. तुम्हाही हंसणें फार आवडतें हें मला ठाऊक आहे, परंतु तूं कांहीं कोणास दुःख देत नाहींस; ह्या व्रात्य कारट्याला लोकांची दुर्दशा पाहून भारी हर्ष होतो आणि हंसूं येतें.

## लपंडाव.

शिव० — मला त्याचें कांहीं एक भय वाटत नाहीं, मी ज झाला तसा होणारा आहें, ह्मणून मलाही बरेंच झालें, मौज पहावयाला सांपडेल.

व० पा० — तात्या येथें येणार असला तर माझ्या भावास घरीं जावयाची आज्ञा द्या कशी. नाहीं तर तो आणखी एखादी दुखापत करील.

धा० पा० — हो हो हो, खरखरेंच, मी आपला जातों.

शिव० — नाहीं, नाहीं, तूं जाऊं नको. मी कांहीं त्याच्यासाठीं तुमची मैत्री तोडणार नाहीं, त्याला त्याच्या पायरीनेंच ठेवीन. पण बाहेर कोणाचे पाय वाजतात बरें? तो तात्याच येत असेलसें वाटतें. नाहीं तर माझी बहीण मुलींना घेऊन आली असेल.

---

## प्रवेश ३

### शिवराम, दुर्गा, वडीलपारखी, कावेरी, भीमा, आणि मनू.

दुर्गा — भाउराया, बरें, मैत्रिणी आपले घरीं आल्या त्यांस

या, बसा, कांहीं ह्मणावें कीं नाहीं?

शिव० — बायकांतला कारभार कोणीं करावा, त्यांत कांहीं मर्यादा रहात नाहीं, हें मला समजतें.

दुर्गा — मर्यादेनें चालावें हें तुला समजतें? बरें तर, पण तात्या कां अझून आला नाहीं? (पारख्याशीं बोलते.) मी ह्मटलें तुह्मी त्यास आपले बरोबर घेऊन याल.

व०पा० — नको, नको, नको, ईश्वर कृपा करून आह्मांला त्याचे संगती पासून सोडवील तर बरें.

मनू — खरेंच, तात्या सारखा द्वाड पोर ह्या पृथ्वींत धुंडाळल्यानें सांपडणार नाहीं.

कावेरी — त्याची रीत अशी आहे कीं, दुसऱ्यास त्रास देऊन आपण मोज पहावी. ह्यामुळें दुसऱ्याला दुखवण्या विषयीं त्याचें मन फार आहे.

दुर्गा — तूं कांहीं भिऊं नको, मी ठाकठीकपणानेंच वागेन.

शिव० — होजीहो. दुर्गा, मुलींना तूं संभाळ (पारख्यांकडे पाहून) तुह्मांला मी संभाळतों.

व०पा० — मजविषयीं चिंता नको; तो माझी थट्टा करणार नाहीं; माझा तुसडा स्वभाव त्याला पक्का माहीत आहे, पण

# लपंडाव.

माझ्या भावाविषयीं मात्र मला अंमळ काळजी आहे.

**भीमा** — तो मऊ लागलें ह्मणजे कोंपरानें खणतो, आणि कठीण लागलें ह्मणजे नांव घेत नाहीं, अशी त्याची चाल आहे.

**दुर्गा** — खरेंच आहे, पहा, मांजराच्या मागें कुत्रें लागलें असतां जेव्हां का तें मांजर शेंपूट पिंजारून त्याचे आंगावर फुसकारून धांवतें, तेव्हां कुत्रें शेंपूट पाडून पळून जातें. तसाच तो आहे.

**शिव॰** — दुर्गा, तूं मांजरा प्रमाणें चाल.

**दुर्गा** — तूं नरसिंह अवतार धर. पण सर्वांनीं आतां खालीं बसावें हें मला बरें वाटतें. तो मेला कारटा अझून येत नाहीं मग कशा करतां उगीच उभें रहावें?

**शिव॰** — अगे उगी, तो आला पहा.

---

## प्रवेश ४

### तात्या, शिवराम, दुर्गा, मथुरा, आणि वडीलपारखी.

# बाळमित्र.

तात्या — (शिवरामास व दुर्गास पाहून नमतो.) मी तुमचा सेवक आहें, मजवर दया असावी; तुमचे राव जींनीं मला तुह्मांमध्यें खेळावयाची आज्ञा दिली आहे, ह्मणून मी आजचा दिवस तुह्मांमध्यें खेळेन.

दुर्गा — मी घरधनीन आहें, ह्मणून तुला ह्या सर्व पाहुण्यांचीं वेगवेगळालीं नांवें सांगितलीं पाहिजेत. हिचें नांव कावेरीबाई.

तात्या — अतनत, हें नांव ऐकून मला फार आनंद झाला.

दुर्गा — आणि ह्याचें नांव —

तात्या — आहा! याची माझी तर पक्की ओळख आहे, (भीमाकडे बोट दाखवून) हिचें नाव काय बरें असेल? हिचें नांव साडेभावार्थी बाई असेल. ही फार भोळी दिसते. हिला लोकांस वांकोल्या दाखवितां फार चांगल्या येतात. (मग खोलीत लंगडशाई घालीत घालीत मनीकडे बोट दाखवून ह्मणतो.) हा नर लंगडशहा बादशाहा; ही माराचे भयानें पळतां पळतां पडली, आणि पाय मोडला ह्मणून ही रोज रोज लंगडशाई खेळती. (वडील पारव्याकडे बोट दाखवून ह्मणतो,) हे नर मोठे दोढ्ढाचार्य, आह्मां गरिबांकडे पाहत देखील नाहींत. (धाकट्या पार

# लपंडाव.

ख्याकडे बोट दाखवितो,) ह्याचें नांव तर उघडच आहे; ह्याचे आईनें ह्याची लहानपणीं जीभ चांगली ओढली नाहीं, ह्मणून हा तुतुतु करितो, आणि ह्याजवरून तोत्रोपंत नांव पावला.

शिव० —— तूं लोकांला नांवें ठेवण्याविषयीं इतका चतुर आहेस तर त्वां मला काय नांव दिलें?

तात्या —— मी अझून तुला पुरता जाणत नाहीं, पण थोडक्याच अवकाशांत तुझेही गुण बाहेर काढीन.

दुर्गा — तात्या, माझें बोलणें तुला फार कडू लागेल, मीं जर तुझे गुण काढले तर मग कसें होईल? ईश्वराचे इच्छेंकरून जो कोणाचे शरीरीं स्वाभाविक अवयव आहे तो काढून त्याची थट्टा करावी हें चांगलें नव्हे; तूं इतका योग्यतेचा आहेस हें मला ठाऊक नव्हतें, ह्यांस सर्व माहीत आहे. दुसरे कोणी असते तर सांगते; पण हे सर्व माझे मित्र आहेत, ह्याजकरितां तोंडावर नक्षत्र पडलेल्या पोरास म्यां बोलाविलें ह्मणून हे मला शब्द लावीत नाहींत.

शिव० — शिवरामा, मी खरेंच सांगतों, तुझी बहीण बोलण्यांत मोठी चतुर आहे, असा पंडित घरांत असल्यावर मग न्याय मनसूबा विचारावयास कोठें बाहेर जावें न

लगे.

**शिव०** —— मी खरें बोलण्याविषयीं कोणाची भीड धरीत नाहीं, ह्मणून माझी प्रीत तिजवर फार आहे.

**तात्या** —— पण तो ऐकिलेंना? मी कसें खरें बोललों तें? ह्मणून तुझी प्रीत मजवरही असावी. (दुर्गाकडे पाहून नमतो,) दुसऱ्याचे गुण बाहेर काढण्याचें तुझें काम तें मीं घेतलें, ह्मणून रागें भरूं नको, क्षमा कर, आतां आपण गडी धरूं. (तिचा हात धरितो.)

**दुर्गा** —— (तात्यास हात धरूं देते.) बरें पण——

**तात्या** —— (अकस्मात् धाकट्या पारख्याकडे फिरून त्यास कुचेष्टेनें ह्मणतो,) तूं चांगला पोर दिसतोस ह्मणून तुला भेटावेंसें वाटतें, थांब. (धाकटा पारखी त्यास भेटावयास भितो, तात्या त्यास बळात्कारानें ओढितो, तेव्हां तो मूल रडूं लागतो.)

**शिव०** —— सोड, सोड त्याला, नाहीं तर——

**तात्या** —— नाहीं तर काय करशील, माझ्या लहानग्या छबड्या?

**शिव०** —— मी लहान आहें खरा, परंतु माझ्या मित्रास सहाय होण्या पुरतें सामर्थ्य माझे आंगीं आहे बरें! हें मीं तुला अगोदर सांगून ठेवतों.

# लपंडाव.

**तात्या** — तर मी ही तुह्मांमध्यें तुमचा मित्र होण्यास येणार. त्यास पाहूं बरें अगोदर, तूं आपले मित्राचें साह्य कसें करतोस तें. ( तो लागलाच धाकटे पारख्याचे अंगावर चालून जाऊन त्यास बिलगतो. शिवराम त्यास पाडतो आणि आपण त्याचे उरावर बसतो. इतर मुलें त्यांस सोडवायास धांवतात. )

**शिव०** — बायांनो, अंमळ कृपा करा आणि दूर व्हा; मी कांहीं ह्याला मारीत नाहीं. कां तात्याजी, आतां कसा रंग आहे? तुझी पाठ म्यां भुईस लावली असें वाटतें.

**तात्या** — ( बळ करून उठावयास पाहतो. ) अग आई, शिवराम्या, गचांडी सोडून माझे छातीवरून ऊठ, नाहींतर मी मरतों आतां.

**शिव०** — अगोदर तूं आपल्या अपराधाची क्षमा मागून घे, ह्मणजे सोडीन.

**तात्या** — ( तापून ह्मणतो. ) अरे जा, कसली क्षमा. तूं सोडतोसकीं नाहीं?

**शिव०** — अशानें मी सोडावयाचा नाहीं. त्वां सर्व मंडळीचा अनादर केला आहे, ह्यासाठीं सर्वांपुढें नाक घांस, चुकलों ह्मण, तोंडांत मारून घे, तर सोडतों.

# बाळमित्र.

**नात्या** — बरें बाबा, तूं ह्मणतोस तर करतों.

**शिव०** — मातब्यान जर असें करशील तर तुला आम्ही तळ घरांत कोंडून टाकूं, ह्मणजे तंटाच उरकेल. (नात्यास उठूं देतो, मग तो रागावला असें पाहून त्यास ह्मणतो.) इतकें रागें भरण्याचें कारण नाहीं, प्रथम तुजकडूनच आगळीक झाली.

**कावेरी** — (मथुरेस एकीकडे नेऊन ह्मणते) तुझा भाऊ इतका धैर्यवान आहे हें माझ्या लक्ष्यांत नव्हतें.

**मथुरा** — तो सिंहासारखा धैर्यवान् आहे, तरी तो कधीं कोणाशीं कज्जा करीत नाहीं; ह्यागांवांत ह्यासारखा सुशीळ मुलगा दुसरा कोणी नाहीं. (सर्व मंडळीस ह्मणते.) आतां उगीच कां खोळंबतां? कांहीं तरी खेळ काढा. पाखऱ्यांनो, तुमच्या मनांत काय खेळावयाचें आहे?

**व०पा०** — तें बायकांनींच ठरवावें.

(नात्या वडीलपाखऱ्यास व शिवरामास वांकोल्या दाखवितो.)

**दुर्गा** — पहा, माझ्या शिवरामाच्या डोळ्यांत कसें पाणी आहे तें! इतर मुलांनीं ह्याचे शहाणपणाचा कित्ताच घ्यावा! बरें तर, आतां आह्मी घरकुलांत भातुकली खेळूं. तुह्मांला

तर बुदबळांचा खेळ भारी आवडतो. चला, उठा माझे गड्यां नो, सर्वांनीं माझ्या खोलींत यावें.

तात्या —— काय, तुह्मी सारे मला एकट्याला सोडून जातां?

शिव० —— नाहीं नाहीं, मी तुज करितां येथें राहतों. पण मी कदाचित् बाहेर गेलों तर लौकरच येईन.

तात्या —— तूंही जातोस तर, ब्वा, मी कांहीं दुसऱ्याचे घरांत एकटा राहणार नाहीं, मला भय वाटतें.

---

## अंक २

### प्रवेश १

### शिवराम आणि तात्या.

तात्या —— मी तुज बरोबर आलों ह्याचें कारण असें आहे कीं, मी येथें असल्यानें तुह्मी सारे माझी एखादी थट्टा कराल आ तां तूंनि मीच येथें आहों, ह्याकरित्तां त्याची थट्टा करण्या विषयीं आपण कांहीं तरीं एखादी कल्पना योजूं.

शिव० —— माझेही मनांत तेंच आलें आहे.

तात्या —— मला वाटतें कीं धाकट्या पारख्याची थट्टा करा वी, हें बरें.

शिव० —— छी छी, त्याचें मन दुखवावें अशी जर त्वां थट्टा योजिली असली तर त्याविषयीं मी रुकार देणार नाहीं; हा मी आपले कानावर हात ठेवितों.

तात्या —— कां? असें कां? अवघे लोक तर ह्मणतात कीं शिवराम मोठा थट्टेबाज आणि खेळाडू.

शिव० —— तें खरें, पण मी कोणाचें मन दुखवावयाचा नाहीं. बरें, तूं कोणती युक्ति योजितोस पाहूं बरें?

तात्या —— ह्या पहा दोन सुया मजपाशीं आहेत, ह्यांच्या अणकुच्या वर करून ह्या मी दोहों गाद्यांत घालून ठेवतों, ह्मणजे एकाएकीं कोणाचे ध्यानांत येणार नाहीं, मग त्या दोन गाद्या दोघीजणींस तूं बसावयास दे, मी जर द्यावयास जाईन तर त्या समजतील, आणि ह्मणतील कीं, ह्यांत कांहींतरी कृत्रिम आहे, ह्याकरितां तूंच दे. मग जेह्वां का सुया टोंचतील तेह्वां त्यांना तोंड दाखवावयाला अशी लाज वाटेल कीं काय सांगूं? वाहवा, ह्या गोष्टीची कल्पना करतांना देखील हंसतां हंसतां पोट फुटतें. तुझी भोळी बहीण ह्यांत फार आनंद पावेल.

शिव० —— पण मी जर तुला असें करीन तर मग तुला कसें वाटेल?

# लपंडाव.

तात्या —— त्यांची माझी गोष्ट वेगळी, त्या मूर्ख आहेत.

शिव० —— त्या कशा मूर्ख? त्या अशी वाईट थट्टा करीत ना हींत ह्मणून तूं त्यांस मूर्ख ह्मणतोस काय?

तात्या —— तूं मोठा बावळट आहेसरे; बरें ही कल्पना तुझ्या मनास येत नाहीं तर दुसरी कल्पना तुला सांगूं?

शिव० —— बरें सांग तर.

तात्या —— पहा, हा मजजवळ बळकट सुईदोरा आहे, त्या बसल्या असतील तेथें आपण जाऊन एकानें त्यांस बोलावयाच्या हंसायाच्या नादांत लावावें, आणि एकानें हळूचकन त्यांच्या साड्या बसकराशीं शिवून टाकाव्या, मग जेह्मां का त्या उठतील तेह्मां कशी मौज होईल पण. वाहवा, काय ख्याशी कल्पना आहे!

शिव० —— शाबास! बरेंच सांगतोस; त्यांच्या चिरड्या फाटाव्या, आणि त्यांस आईबापांनीं खूप ठोकावें, असें तुझ्या मनांत आहे वाटतें?

तात्या —— कायती मौज ह्यांतच आहे.

शिव० —— कोणाचा नाश न करितां दुसऱ्या रीतीनें मौज होणार नाहीं कीं काय?

तात्या —— पण, मला कांहीं त्या नाशाचे योगानें दुःख होत ना

हीं.

शिव० —— तर तूं आपल्या मात्र स्वार्थावर दृष्ट देतोस, लोकांचे बरेवाइटाकडे अगदींच पहात नाहींस.

तात्या —— आह्मी, ब्वा, खेळ खेळूं लागलों ह्मणजे आह्मांला कांहीं तरी चेष्टा केली पाहिजे. ह्यासाठीं तुला सांगतों, मनूलंगडी आणि पारखी ह्यांस भिवविलें पाहिजे.

शिव० —— तें चांगलें नव्हे; तुला जर कोणीं भिवविलें तर मग कसें होईल.

तात्या —— चल, आतांच कां होईना. ज्याचे मनांत मला भिववायाचें असेल त्यानें खुशाल भिववावें; मजकडून कांहीं मनाई नाहीं.

शिव० —— (एकीकडे होऊन हळूच बोलतो.) तें आतां आह्मीच पाहूं. (मोठ्यानें.) बरें तर, पोरांस भेडवावयाची कल्पना कशी काय आहे?

तात्या —— मजपाशीं राक्षसाचा एक मुखवटा आहे, तो मी घरीं जाऊन घेऊन येतों, तूं लहान लहान मुलींस मात्र एकीकडे आण; मग पहा कशी मौज होईल ती. हा मी आतांच आलों ह्मण.

शिव० —— (हळूच आपणाशीं बोलतो.) थांब, मी एक तुजकरि

तां चांगला मुरवबटा आणितों. (मोठ्यानें.) पण तात्या, तात्या !—

**तात्या** — कॉं? काय ह्मणतोस?

**शिव०** — त्यांस एकीकडे आणलें ह्मणजे त्या भितील खऱ्या. हें मलाही बरेंच वाटतें. पण, तात्या, ह्या खोलींत एक खराच मोठा ब्रह्मराक्षस आहे. आपण येथें दोघेजण एकटेच आहों, जर का तो आला तर आपणांस जीवंत सोडणार नाहीं, खाऊनच टाकील.

**तात्या** — ही काय तूं राक्षसाची गोष्ट बोलतोस?

**शिव०** — मी खरेंच बोलतों; तो यावयाचा झाला ह्मणजे अगोदर दणदण पाय वाजतात, मग एकाएकीं मशाला लागलेल्या दिसतात; त्याच्या बराबर पुष्कळ भुतावळ असते. (अंमळ घाबरल्याचें सोंग घेतो.) हें पहा, पाय ऐकूं येतात; आतां कसें करावें?

**तात्या** — (अंमळ घाबरून ह्मणतो.) अरे कर्मा, आतां राक्षस येथें येतो कीं काय?

**शिव०** — (तात्यास एका कोंपऱ्यांत नेऊन हळूच कांपत कांपत बोलतो.) येथें ब्रह्मराक्षस असतो ह्याचें कारण लोक असें सांगतात कीं, ह्या खोलींत एक कृपण पुरुष रहात हो

ता, त्याजवळ द्रव्य पुष्कळ होतें, मग तो मेला तेव्हां संबंध होऊन ह्या खोलींत राहिला आहे. ह्याकरितां इकडे कोणी येत देखील नाहीं.

तात्या — (हें ऐकतांच त्याचा चळकांप होतो. आणि बोबडी वळते.) दुसरे कोणाला तरी लौकर हाक मार, कां तर माझा जीव धसधस करतो; माझ्यानें येथें उभें रहावत नाहीं, मी पळून जातों.

शिव॰ — कशी गे भ्याली! आतांच ना तूं धटाईच्या गोष्टी सांगत होतास?

तात्या — मी कांहीं भ्यालों नाहीं; तूं असें समजूं नको, पण मी मुखवटा आणावयास जातों.

शिव॰ — बरें तर, जा तूं, मी येथें सर्व तयारी करून ठेवितों. मग भली खाशी मौज होईल.

तात्या — वाह्नवा! तर मग आतां आमचें हंसतां हंसतां पोट फुटेल.

शिव॰ — ते तर फारच भितील.

तात्या — खरेंच, गड्या, तर मी लौकर येतों. (तो बाहेर निघून जातो.)

शिव॰ — (एकटाच आपण बोलतो.) भलारे, तूं बरकडांस

## लपंडाव.

भिववावयास पाहतोस, आणि मी भ्यावयाचा नाहीं अशी प्र तिज्ञा भोगतोस, तर पहा, मी तुलाच भिववावयाची युक्ति क रीन.

---

## प्रवेश २

### शिवराम, दुर्गा, मथुरा, कावेरी, मनू, आणि वडीलपाररवी.

दुर्गा — शिवरामा, तात्याला रस्त्यांतून धांवत जातांना आ ह्मीं आतां पाहिलें, तर कोणी काय केलें त्याला? त्याशीं तुशीं कांहीं खटखट झाली कीं काय?

शिव॰ — नाहींनाहीं, तो तर मला आपला जिवलग मित्र मा नितो; त्याचे मनांत लहान मुलांची कांहीं थट्टा करावयाची आहे; त्यास मी बाह्यात्कारीं अनुकूळ होतों, आणि असा कां हीं मनस्कबा करतों कीं तोच फसेल; मग पुनः आमचे घ राकडे ढुंकून पाहणार नाहीं असें वाटतें.

दुर्गा — बरें, कोणाता मनसुबा करणार आहेस तूं?

शिव॰ — माझा मनस्कबा तुला लौकरच कळून येईल, पण मला तुशीं बोलावयास आतां तिळमात्र अवकाश नाहीं;

तो आतां येईल, तो आल्याचे पूर्वीं मला सर्व तयारी क रून ठेविली पाहिजे, ह्मणून मला अंमळ बाहेर जावयाची आज्ञा दे.

**कावेरी** — बरें तर, जा, पण लौकरच परत येहो, तुझा मन स्वभाव आह्मांस फार ऐकावासा वाटतो.

**शिव॰** — सर्व तयारी करून मी तुह्मांस अगत्य सांगेन. (तो बाहेर निघून जातो.)

**दुर्गा** — अहाहा, फार चांगले दोघे मित्र मिळाले आहेत, पाहूं, बरें, दोघांच्या मसलतीनें काय ठरतें तें.

**ब॰ पा॰** — दुर्गाबाई, शिवरामाला केवळ तात्याचे ओळींत बसवूं नका.

**मनू** — पारखी, तूं ठीक बोललास, एक मर्यादेचा, भला, आणि एक ह्राड व्रात्य; त्याला त्याला कोठें लावतां?

**कावेरी** — शिवराम जर तात्याला येथून काढून लावण्याची कांहीं युक्ति योजील तर आह्मांवर त्याचा फार उपकार होईल. तो ह्या ठिकाणीं असल्यानें आह्मांस कधीं चैन पडणार नाहीं.

**दुर्गा** — मला असें धोरण दिसतें कीं, शिवराम तात्यास अमर्याद शिक्षा करील.

# लपंडाव.

व०पा०——असें कसें होईल? शिवराम जर तात्याची तशी खूप थट्टा करील, तर त्या योगें करून त्याला शिकविल्या सारखें होईल. मग आपल्या मुलास चांगल्या चालीचा उपदेश मिळाल्यामुळें शिवरामाची युक्ति ऐकून तात्याचा बाप फार संतोष पावेल, असें मला वाटतें. शिवरामा सारखा तात्या असता, तर त्याचा बाप त्याकरतां आपलें अर्धें द्रव्य संतोषानें खर्च करता.

मनू ———दुर्गा, तूं आपल्या भावाच्या युक्तीस विघ्न करूं नको.

दुर्गा ———पण मने, माझा स्वभाव अंमळ पडरवर आहे, आतां मी येथें तुह्मांमध्यें मुख्य असतां आईस वाईट वाटेल असें काम इकडे होऊं देणार नाहीं.

मनू ———त्याच्या मनांत आहे तसें त्याला आजचा दिवस करूं दे, त्याचा अन्याय आह्मी आपल्या आंगावर घेऊं.

शिव०——(आनंदानें हंसत येतो.) तात्या आतां कध्धां का येईना, त्याला खेळावयास घेण्या करितां आह्मी तयार आहों.

दुर्गा ———पण मला सांग, त्वां काय मनसुबा केला आहे तो.

कावेरी——आह्मांला सांग, आह्मी त्यांत येतों.

शिव०—— नाहीं, नाहीं, बायांहो; त्याचें कांहीं कारण नाहीं;

माझ्या मनसब्यांत अंमळ धिंगामस्ती होणार आहे, त्या साठीं मी तुह्मांस आह्मांमध्यें घेणार नाहीं; म्यां मोतद्दारास सांगून अगोदरच गकठीक करून ठेविलें आहे; माझ्या मनांतली गोष्ट त्या मोतद्दाराचे मनांत ठसली आहे, तो मला साह्य करील.

दुर्गा——पण तूं कांहीं आह्मांला आपला मनसबा असून कळूं देत नाहींसना?

शिव॰——मी तुह्मांला इतकें सांगून ठेवितों; आतां आपण लपंडाव मांडूं ह्मणजे तात्याचे मनांत संशय येणार नाहीं, प्रथम मी तात्यास आंधारामध्यें सांपडेन, मग जो कोणी माझे डोके बांधील त्यानें हातचलाखी करून मला पहावयास वाट ठेवावी, ह्मणजे मी तात्यासच धरीन, मग त्याचे डोळे बांधल्यावर तुह्मी सर्व खोलींतून दिवा विझवून बाहेर निघून जा, आणि आह्मां दोघांस मात्र त्या ठिकाणीं असूं द्या, मग जेव्हां तुमची गरज लागेल तेव्हां मी तुह्मांस बोलावीन.

व॰पा॰——तो जर धबाधबी करूं लागला तर मग कसें करशील?

शिव॰——अरे, जाऊं दे, त्याच्यानें काय व्हावयाचें आहे? पा

# लपंडाव.

हिलें नाहीं मधां, एक कलथी दिलीतर कसा भोंपळ्या सा रखा बदकन् आदळला तो? तो टणक दिसतो खरा, प ण अगदीं फोपसा आहे, त्याचा अनुभव मीं अगोदरच घेतला आहे. आतां लहान मुलांस इकडे घेऊन ये, ना त्या आला ह्मणजे त्यांची कदाचित् थट्टा करील, अगे मथु रे, तूं जाऊन त्यांस घेऊन ये.

मथुरा—— होय, (ती बाहेर निघून जाते.)

शिव०—— माझे डोळे बांधते वेळेस वाट ठेवावयाचें तुह्मांस पक्कें स्मरण असूं द्या, आणि जेव्हां मी तुह्मांस खूण करीन तेव्हां वाटेचे नीट संधान ठेवून दिवा विझवून पळूनजा.

कावेरी—— होय होय, आतां ध्यानांत आलें.

शिव०—— अगे उगी, कोणी येतो आहे. (दाराजवळ जाऊ न हळूच कानोसा घेतो.) हाँ तो आला, आतां आपण लोकर खेळावयास लागूं या, नाहीं तर त्याचे मनांत संशय येईल. अगोदर झटकन कोणाचे तरी डोळे बांधा.

कावेरी—— पहिला डाव मजवर आहे. (मनू कावरीचे डोळे बांधिते.) (सर्व मुलें खेळूं लागतात.)

---

# बाळमित्र.

## प्रवेश ३

### शिवराम, तात्या, कावेरी, आणि मनू.

(तात्या आंत येतांच कावेरीस चिमटा घेतो, ती हात लांब करून त्याला धरते.)

कावेरी—— हा तर तात्या आहे, त्यानें मला चिमटा घेतला ह्या वरून तोच आहे हें मी पक्कें जाणतें.

शिव०—— त्वां खरेंच ओळखलें, पण तो अझून खेळावयास लागला नाहीं, तर आतां नव्यानें डाव मांडूं.

तात्या—— शिवरामानें खरी गोष्ट सांगितली.

कावेरी—— बरें तर, आतां नवा डाव नवा पाव, मीं जर आतां तुला फिरून धरलें तर मग तुझे डोळे बांधून डाव घेईन; रडी खाऊं देणार नाहीं.

तात्या—— बरें बरें, आतां फिरून खेळूं. (बगलेंतला मुखवटा काढून शिवरामास निस्करता दाखवितो.) कां चांगला आहेना?

शिव०——(त्यास पाहून अंमळ कावरा बावरा होतो.) अरे बापरे, फारच भयंकर आहे, ह्यास पाहून मलाच अगोदर भय वाटतें; आतां हा लपवून ठेवूं आणि ह्या खेळावयाच्या नादांत

# लपंडाव.

लागल्या ह्मणजे हळूचकन आपण बाहेर निघून जाऊं.

तात्या —— (शिवरामाच्या कानाशीं लागतो.) होय होय, अगोदर मी पोरीबारींची थट्टा करतों.

शिव० —— (तात्याशीं हळूच बोलतो.) मी अगोदर कावेरीचे डोळे बांधून तिला फिरवीन; ती मला धरील तेव्हां तिचे मनांत असें येईल कीं, हा तात्याच आहे; मग तिजवरच डाव येईल.

तात्या —— (हळूच बोलतो.) बरेंबरें, मी हा तिला मागून जाऊन धक्का देईन.

मनू —— तुह्मी खेळ विरस करतां; तुमची मसलत काय ती लौकर होऊं द्या कशी.

तात्या —— सारीं उगीच कां उभीं राहिलां? आह्मी तयार आहों.

शिव० —— (जणू कावेरीस धक्का द्यावा अशा बेतानें तिचे मागें मागें फिरतो, तात्या घडवंची आणावयास घरांत जातो, असें पाहून शिवराम कावेरीस हळूच ह्मणतो.) कावेरी, आतां मी तुझ्या वाटेंत येतों, (कावेरीनें अडखळून पडावें ह्मणून तात्या तिचे वाटेंत एक घडवंची आणून ठेवितो, शिवराम त्या घडवंचीस एकीकडे ठेवून आपण

त्या जागीं मेटाखुटीं बसतो, आणि तिला ऐकूं जाई असा कांहीं शब्द करितो, ती चांचपत चांचपत जाऊन त्यास धरिते, आणि हा कोण आहे? असें सोंग आणते.)

कावेरी——(अंमळ गुटमळून त्यास चांचपून ह्मणते.) हा शिवराम आहे!

शिव०——(खिन्न झाल्या सारखें दाखविनो.) होय मीच आहें; काय, गड्या, मीच सांपडलों फिरे; गोष्ट वाईट झाली.

कावेरी——(डोळ्यावरचें फडकें सोडून.) आहा, मला पाडावयाचा मनसबा केला होता काय? हें काम त्याच्या वांचून कोणी करणार नाहीं, हें मी पक्कें जाणतें. पण मी आतांच त्याचें वदें काढीन. (ती शिवरामाचे डोळे बांधिते, आणि पहावयास अंमळशी वाट ठेवून त्यास चाली प्रमाणें विचारते.) तुझे बापाचे पागेंत किती घोडे आहेत?

शिव० —— तीन, एक काळा, एक पांढरा, व एक तांबडा.

कावेरी—— तर तीनवेळां फिर, (शिवरामास तीन वेळां फिरवून ह्मणते,) आतां जो कोणी तुझ्या हातीं लागेल त्याला धर.

शिव० ——(चांचपत चांचपत इकडे तिकडे फिरतो, सर्व पोरांस आंगावर घेतो. कोणी थापडी मारली तरी त्यास मा

# लपंडाव.

रूं देतो, आणि कावेरीचे मागें लागल्याची हलकावणी दाखवून एकाएकीं तात्यासच जाऊन धरितो.) आहा, भली सांपडलीगे, हा कोणी पोर दिसतो, हा तात्या नर नव्हे! (मग डोळ्यां वरचें फडकें काढून.) होय, तोच!

तात्या—— (शिवरामास हळूच ह्मणतो.) पण त्वां मलाक शा करितां धरिलें बरें?

शिव०—— (हळूच सांगतो.) तूं कांहीं चिंता करूं नको; मी धाकट्या पारख्याला तुझ्या आंगावर ढकलून देईन.

तात्या—— (हळूच ह्मणतो) बरें तर गड्या, तूं पाहशील मी त्यास कसा बारीक चिमटा घेतों तो, असा कीं रक्तच नि घेल. (शिवराम तात्याचे डोळे बांधून वरकड सर्व मुलांस खोलींतून बाहेर जावयाची खूण करितो, तीं दिवा विझवून दुसरे खोलींत जातात. दिवे विझाल्या नंतर मोनद्दार तोंडा स काळें लावून, वर चुन्याचे ठिपके देऊन, डोईस मेंदराच्या लोंकरीची टोपी घालून, फाटकें रकटें नेसून, हातांत टेंभा घेऊन दाराजवळ येतो, शिवराम त्याला तेथेंच उभें रहा वयाची खूण करितो.)

शिव०—— (तात्यास खोलीचे मध्य भागीं उभें करून विचार तो.) तुझे बापाचे पागेंत किती घोडे आहेत?

# बाळमित्र.

तात्या —— तीन, एक काळा, एक तांबडा, आणि एक पांढरा.

शिव० —— अरे, मुलांनो, आतां पहा कशी मौज होईल ती, तंवर तुह्मी आप आपल्या जाग्यावर उभीं रहा. (लटकें पर नेटकें बोलून ह्मणतो.) तात्या, तूं तीन वेळां फिर, जो कोणी हातांत सांपडेल त्यास बळकट धर. (तात्या फिरूं लाग त्यावर शिवराम शिंग घेऊन येतो, व मोतद्दारास घाग र माळा वाजवावयाची खुणेनें आज्ञा देतो, मग आपण बोलतो.) राक्षस आलारे आला, पळ तात्या, जीव घेऊन पळ. (मग मोठा गलबला करून दार लावितो, आणि मो तद्दाराचे पाठीमागें लपून शिंगांतून शब्द काढून बोल तो :) कायरे? तूं माझें द्रव्य घ्यावयास आलास काय?

तात्या —— (भयानें लटलटां कांपतो, आणि घाबरून डो ळ्या वरचें फडकें काढावयास विसरतो. आणि मोठ्यानें किं काळी फोडून बोंब मारितो.) अरे शिवरामा, अरे पार ख्यानों, धांवा, लौकर या, माझ्या उरावर राक्षस बसला.

शिव० —— (शिंगाचे आवाजांतून ह्मणतो.) त्या सर्वांस मीं भय दाखवून पळविलें, आतां तूं डोळ्यावरचें फडकें काढू न माझें तोंड पहा.

(तात्या डोळ्यावरचें फडकें न काढितां भय पावून हातांनी

# लपंडाव.

बळकट तोंड झांकतो; जसा जसा राक्षस पुढें येतो तसात सा तो मागें हटतो.)

शिव० —— अरे काढ तोंडावरचा रुमाल! ऐकतोस कीं नाहीं? (तात्या थरथर कांपत कांपत डोळ्यावरचा रुमाल काढितो, परंतु डोळे उघडून पहावयास भितो; शेवटीं राक्षसास पाहतांच मोठ्यानें किंकाळी फोडितो, आणि अगदीं गर्भगळित होऊन जागच्या जागीं थिजून राहतो; मग इकडे तिकडे फिरून दाराजवळ येतो; दार गच्च लावलेलें पाहून पायांत पाय गुंतून तोंडघशीं पडतो, आणि भयामुळें त्याचे तोंडाकडे न पाहतां भुईत मान घालून बसतो.)

शिव० —— तूं काय माझे हातांतून पळून जावयास पाहतोस काय?

तात्या —— (भयानें बोबडी वळली आहे, ह्मणून गुंतत गुंतत बोलतो.) मीं कांहीं तुमचा अन्याय केला नाहीं; मीं कधीं तुमचें द्रव्यही नेलें नाहीं.

शिव० —— त्वां कधींच अन्याय केला नाहीं काय? रस्त्यांत येणारे जाणारे मनुष्यांचे आंगावर थुंक कोणरे टाकतो? आणि लोकांचीं पागोटीं आंकडीनें कोणरे उपलीन अ

सतो? कुत्रीं चिमण्या ह्यांचे हात पाय कोण मोडीत असतो? लहान पोरांस पाडावया करितां माझ्या खोलींत घडवंची कोणीरे आणून ठेविली? असे असे अपराध तुजकडून कांहींच घडले नाहींत काय? आणि मुलांस भेडावयासाठीं तुजजवळ आतां मुखवटा नाहींरे?

तात्या—— महाराज, तुह्मी ह्मणतां इतकें ही खरेंच आहे; आतां माझ्या अपराधाची क्षमा करावी; मी आपल्या आईबापांचा एकुलता एकच आहें; आजपासून असें करणार नाहीं.

शिव॰—— तुझें बोलणें खरें कशावरून? ह्यास जामीन कोण आहे?

तात्या—— तुह्मीं जीं मुलें आतां पकडून लाविलीं त्यांना आणा, ह्मणजे तीं जामीन होतील.

शिव॰—— तूं खरेंच बोलतोस तर माझ्या हातावर हात मार.

तात्या—— नाहीं महाराज; मी खरेंच सांगतों.

शिव॰—— बरें तर, आतां मी तुला सोडितों, पण खबरदार, आजपासून असें करशील. माझ्या मनांत तुला खावयाचें असतें तर केव्हांच ह्या खिडकींतून घेऊन गेलों असतों.

लपंडाव.

( राक्षस तो टेंभा आंधारांत गरगर फिरवून निघून जातो, तेणें करून तात्या भेदरून बेशुद्ध होऊन भुई वर पडतो.)

---

## प्रवेश ४

### रामराव, तात्या, शिवराम, मोताद्दार, कावेरी, आणि मनू.

राम०——(हातांत दिवा घेऊन येतो.) कसलारे इकडे ग लबा आहे हा?

तात्या——(मान वर नकरितां बोलतो.) मीं कांहीं गलबा केला नाहीं, महाराज ब्रह्मराक्षसबावा. आतां तुह्मी मा झे जवळ येऊं नका.

राम०——(तात्या भुईवर पडलेला पाहून.) हा कोण भु ईवर पडला आहे?

तात्या——तुह्मीं आतांच मला कृपाकरून सोडून दिलें आ णि असें ह्मणतां?

राम०——वेड्या सारखा तूं असें काय बोलतोस? मीं केव्हां

कृपा केली?

तात्या—— महाराज मी कांहीं पैका न्यावयास आलों नाहीं.

राम०—— पैक्याचें गाणें काय बोलतोस? हें आहे तरी काय? तुझें नांव तात्या, मी तुला ओळखत नाहीं कीं काय?

तात्या—— होय होय, महाराज, तेंच माझें नांव; पण आतां तुम्ही माझा प्राण घेऊं नका.

राम०—— मला आश्चर्य वाटतें, तूं येथें कां पडलास? (दिवा खालीं ठेवून तात्यास भुईवरून उचलून धरतो.)

तात्या——(पहिल्यानें पळून जावयाकरितां कवंनून निसटावयाचा यत्न करितो, मग रामरावास ओळखून ह्मणतो.) रावसाहेब, तुम्हीच आहां? तो गेला काय? (भोंवतालीं कावरा बावरा पाहून मोठ्यानें आरोळी फोडून ह्मणतो.) तो राक्षस आहे तो पहा तिथें आहे. (शिवराम दार उघडितो, सर्व मुलें खदखदां हांसत आंत येतात.)

राम०—— अरे पोरांनो, काय रे आहे?

शिव०——(पुढें येऊन.) तुमचा मोतद्दार आहे कीं नाहीं, तोच राक्षस. तो पहा रगटें नेसला आहे.

मोत०——(तें सोंग टाकून.) होय, महाराज, मींच सोंग घेतलें होतें.

# लपंडाव.

राम॰ —— शाबास शिवरामा, फार चांगल्या शाहणपणाचा खेळ काढला.

शिव॰ —— म्यां ठीकच केलें, सगळ्यांना विचाराना? ह्यानेंच अगोदर भिववायाची मसलत काढली कीं, आपण लहान पोरांस भेडावूं. तो ह्याचा मनोरथ म्यां सिद्धीस जाऊं दिला नाहीं. पहा पाहिजेतर ह्याजजवळ एक मुखवटा आहे, तो ह्यानें काढावा.

राम॰ —— (तात्यास ह्मणतो.) कायरे? खरेंच कायरे हें?

तात्या —— (तो मुखवटा रामरावा पुढें टाकितो.) आतां माझ्यानें बोलवत नाहीं, हा मुखवटा घ्या रावजी.

राम॰ —— तर मग तुला आतांची योग्य शिक्षा झाली.

कावेरी —— आह्मी दुर्गाबाईपासून मागून घेतलें होतें कीं, शिवराम तात्याची जी थट्टा करील ती करूं द्या. तरही त्याला बरीच अद्दल घडली.

मनू —— अगोदर तो आमची जी थट्टा करणार होता ती जर तुह्मांस समजली असती तर मग.

राम॰ —— कायरे तात्या, तूं प्रथमारंभीं आजच आलासना? आणि त्वां अशी धुंडाई मांडली? अरे मुलींची मर्यादा ठेवून खेळावें तें टाकून त्यांची थट्टा करणार होतास काय?

निघ येथून, जा आपल्या घरास, जर का आजपासून तु ला माझे पोरां बरोबर खेळतांना पाहिलें, तर मी मुलाजा करणार नाहीं; कान उपटून हातावर देईन. म्यां तुला हां कून लावलें हें ऐकून तुझा बाप तुझ्या अपराधाची चांग ली शिक्षा करील; जा कसा येथून, तोंड दाखवूं नको, (ता त्या लाजून निघून जातो.) मुलांनो, तुह्मी आजपासून अ शी कोणाची वाईट थट्टा करीत जाऊं नका; कदाचित् कोणी तुमचा कसाही जरी अपराध केला तरी असा खेकखेकत जाऊं नका; लहान पोर एकदां भेदरलें ह्मणजे प्राणच सो डील; ह्याकरितां कोणी वाईट काम करावयास जर इच्छी ल; तर त्याशीं नम्रपणानेंच वागलें पाहिजे, आणि त्याचें वर्दे काढणें झालें तर सुरीतीच्या वाटेनेंच काढावें. आजपा सून तुह्मी पक्की आठवण ठेवा, आणि तात्याची जशी थट्टा केली तशी दुसऱ्याची थट्टा कधीं करूं नका, ह्या विषयीं का नास खडा लावून घ्या; बरें तर बरें, नाहीं तर तो आणि तु ह्मी प्राणास मुकलां होतां, असली थट्टा कोणी करतो कीं काय? आज देव बऱ्यावर होता ह्मणून बरें झालें.



# रामा मुलगा.

रामा ह्मणून एक चार वर्षांचा मुलगा होता; तो मुळचा कांहीं जातीचा व्रात्य नव्हता, पण त्याचे आईनें जरबेंत नधरितां स्वेच्छे प्रमाणें त्यास वर्तूं दिलें; ह्मणून तो छांदिष्टपणा करूं लागला. बापानेंही मनांत आणलें कीं, जर आतां आपण ह्यास मागितलेली वस्त देत नाहीं तर हा रडरडून जिवाचा आकांत करील, असें समजून त्यानेंही त्या पोराचा फारच लाड चालविला, तेणें करून तो पोर फारच वेडावून नाना छंद करूं लागला. रामाचे छंद पुरवाया जोगती त्याचे आईबापांचे आंगीं शक्ति नव्हती, कारण कीं त्यांचा हातावरचा संसार, पदरीं गरीबी, ह्यामुळें मागितलेली वस्त त्यास कधीं मिळे कधीं नमिळे; असें होतां होतां तो मूल कांहींका दिवसांनीं अतिशयित हट्टी होऊन आईबापांशीं भांडूं लागला. जें न मागावयाचें तेंच मागावें, तें आईबापांनीं नदिलें तर लागलेंच मोठ्या क्रोधास चढून आंगरखा टोपी वगैरे जें काय आंगावर असेल तें फाडून तोडून टाकावें. आईबापांनीं एखादी शिकवणीची गोष्ट सांगितली तर त्यानें तिचें उलटें करावें.

अशी त्याची दुष्ट वागणूक पाहून त्याचे आईबापांस अत्यंत दुःख झालें.

त्याची आई असें ह्मणे, मीं अगोदर फार आशा ठेवली होती कीं, हा पोर चांगला सुशील सद्गुणी निवडेल, आणि

# बाळमित्र.

ह्याचे मनांत वागेल कीं, तीर्थरूपमातोश्रींनीं माझ्या बाळप णां मजकरितां फार खस्ता खाल्ली आहे, तर आपण ही त्यांस वृ द्धापकाळीं सुख द्यावें, असें मनांत आणून पुढें आमची कांहीं सांभाळ करील; तें कांहींएक नहोतां उलटा दुःखास मात्र कार ण झाला.

बापही ह्मणे कीं, हा बेटा वंशांत लाजलावणा निघाला. ह्याच्या भऱ्यावर कोणी नाहीं; हा एखादे दिवशीं चोरी मारीत सांपडून सुळावर जाईल. ह्याकरितां ईश्वर करो कीं, असा सम य येण्याचे अगोदर माझे डोळे झांकोत, ह्मणजे बरें.

अशा काळजीमुळें तो गृहस्थ झुरणीस लागला, आणि दिवसें दिवस त्याची शक्ति क्षीण होऊं लागली; अन्नोदकावर ची वासना देखील बंद झाली; पूर्वीप्रमाणें कामकाज करीत असतां त्याचें अंतःकरण सुप्रसन्न राहीना; रामाच्या द्वाड स्व भावाची तो वारंवार चिंता करी; रात्रंदिवस कसें होईल काय होईल ह्याकडे लक्ष्य; असा त्यास मोठा हृद्रोग लागला, तेणेंक रून त्याचें शरीर कृश होऊन अस्थींचा पंजर मात्र राहिला. त्या चें शरीर अगदीं काळें ठिकर पडलें.

एके दिवशीं तर तो फारच औदासिन्य आणि खेद पावू न बाजेवर पडला होता, तो त्याच्यानें खालीं उतरून येववे

# रामा मुलगा.

ना; इतकी अवस्था झाली तथापि त्याविषयीं रामाच्या मनांत कांहीं एक वागलें नाहीं, आणि तो नित्याप्रमाणें आई जवळ फराळास मागूं लागला; तेव्हां आई ह्मणाली कीं, बाबा, तुला फराळाचें करून घालावयास माझ्यानें उठवत नाहीं.

तेव्हां रामा रुसला, ह्मणून त्याचे आईस फार वाईट वाटून रडूं आलें; बापानेंही मोठ्यानें ऊसकारे टाकिले. देतील ह्मणून अंमळ दमरवाऊन रामा उभा राहिला; शेवटीं त्याचे मनांत आलें कीं, कोणी उठत नाहीं तर आतां आपणच करून खावें; असा निश्चय करून शेजारणीचे घरीं विस्तव मागावयास गेला, तों त्या घरची मुलगी दार उघडावयास आली, तिनें रामास पाहतांच ह्याचे आचरणावरून कपाळास आंठ्या घातल्या, आणि रागें भरून उद्धटपणानें बोलली कीं, तूं कशाकरितां आमचे येथें आलास? रामा ह्मणाला; मी विस्तव मागावयास आलों; तेव्हां मुलीनें उत्तर केलें कीं, बरें तर, आतां मीं तुला कवाड उघडलें त्यापक्षीं पाहिजे तर विस्तव देतें, पण इतःपर तूं माझे घरीं कव्हीं येऊं नको. रामाच्या स्वभावास तर उणें उत्तर सोसतनसे, आणि ती मुलगी तर त्यास फारच धिक्कारून बोलली, तें सर्व ऐकून घेतलें आणि मनांत खि

न्न होऊन विस्तव नघेतां निघून गेला.

मग दुसरे शेजारणीचे येथें गोंवरी घेऊन विस्तवा क रितां गेला, तिनें फटीवाटें गुपचूप पाहून दार नउघडतां आ पण माडीवर निघून गेली, अशी त्याची जिकडे तिकडें अप्रति ष्ठा झाली; हें पाहून घरीं आला, आणि त्यानें मनांत आणलें कीं, मला एक म्हातारी खाऊ देत असे तिजकडे जाऊन कांहीं मागावें; असा विचार करून तिजकडे गेला, आणि तिजपाशीं फराळाचें मागूं लागला; तेव्हां ती म्हणाली, तूं आपले आईजवळ माग, त्यानें उत्तर केलें, ती बाजेवर निजली आहे; मग म्हातारी बोलली कीं, तर तूं आपल्या बापाजवळ माग; रामानें उत्तर दि लें कीं, तोही बाजेवर निजला आहे, आणि उभयतांही दुख णाईत आहों म्हणून सांगतात. असें त्याचें भाषण ऐकतांच म्हातारी मोठे डोळे फाडून त्यास म्हणाली, वाहवारे मूर्खा, अरे ज्यांनीं तुझें लहानपणापासून तुझें लालन पाळण केलें त्या चे दुखण्याची खटपट व कांहीं काळजी नकरितां आपले पो टाची मात्र चिंता करीत हिंडतोस, तर तुला लाज कशी वाट त नाहीं? जा येथून, दुष्टा, मला तोंड दाखवूं नको; मजजव ळ कांहीं ज्यास्त असल्यास जीं मुलें मातापितरांची भक्ति क रितात त्यांस देईन, तुझ्या सारख्या अधमास देणार नाहीं; तों

# रामा मुलगा.

तर आपल्या आईबापांस आजपावेतों दुःखाशिवाय कांहीं च दिलें नाहीं.

हें तिचें बोलणें ऐकून रामाचें डोकें भरून आलें, आणि मुकाट्यां घरीं जावयास निघाला; वाटेनें येत असतां मनांत कल्पना करतो कीं, मीं पुष्कळवेळां दुखणाईत पडल्याचीं सोंगें घेतलीं होतीं, तसें तर आतां आईबापांनीं सोंग घेतलें नसेलना? असें ह्मणून ह्याविषयींची खातरी करून घेण्या करितां हळूच बाजेजवळ जाऊन पाहतो, तंव त्याचे गालाचे अगदीं पोचे बसून तोंडावर प्रेतकळा आली आहे, हें पाहून मनांत फार कष्टी झाला, आणि तोंडावर पांघरूण घेऊन स्फुंदस्फुंदून रडूं लागला, आणि मनांत पश्चात्ताप पावून ह्मणतो, मी केवढा अभागी, माझे आईबापांची अशी अवस्था झाली; आतां जर हीं मेलीं तर माझी काय गत होईल? एकांच मला कोणी भाकरीचा तुकडाही देतनाहीं; माझा स्वभाव फार वाईट आहे ह्मणून अशी दशा झाली. अगे माझे आई, तूं मजवर भारी ममता करितेस, आणि म्यां द्वाडानें तुला कधीं सुखाचा लेशाही दिला नाहीं. आतां माझा बाबा ह्या दुखण्यानें मरेलकीं काय कोण जाणे. ह्याप्रमाणें रामा चिंता करीत असतां तेथून उठून ज्या शेजारणीनें गहिल्यानें त्यास धिक्कारिलें होतें तिच्या घरीं पुनः गेला, आणि दीनवाणीनें ईश्व

राचें नांव घेऊन आईबापांकरितां थोडीशी भाकर मागितली; तेसमयीं त्याचें दीनभाषण ऐकून घरधनीन बाहेर आली, आणि त्यास ह्मणाली कीं, तूं ह्याप्रमाणें मागतोस ह्मणून मी तुला भाकर व दूध देतें, हा विस्तव घेऊन जा, आणि ह्यावर दूध तापीव, आणि आईबापांस खाऊं घाल. ते तुजसाठीं फार मेहनत करितात, तर त्यांही त्यांच्या खाण्यापिण्याचा बंदोबस्त ठेवावा हें ठीक आहे. ह्मातारी प्रमाणें हीही रागें भरेल ह्मणून आईबाप दुखणाईत आहेत हें रामा कांहींच बोलला नाहीं. जर बोलता तर ती घरधनीन तत्काळ त्यांचे समाचारास गेली असती, कारण कीं, रामाचीं आईबापें फार भलीं होतीं.

इतक्यांत रामानें घरीं येऊन दूध तापवावया करितां विस्तव पेटविला, दूध ऊन झाल्या नंतर बाजेजवळ दोन पाट मांडले. ही खटपट करितां व घरांत इकडे तिकडे वावरतां जे शब्द झाले ते ऐकून आई बोलली, आज रामा काय इतकी खटपट करीत आहे कोण जाणे. हें ऐकून तिचे नवऱ्यानें उत्तर केलें कीं, तो कांहीं उत्तम आचरण करीत नसेल, ह्याविषयीं तूं मनांत कांहीं एक संशय येऊं देऊं नको. परंतु ती माय माउली तिच्यानें राहवेना, ह्मणून ती तोंडावरचा पदर सारून पाहूं लागली, तो रामा चुलीजवळ दोन मोठ्या वाट्या घेऊन त्यांत आपले

# रामामुलगा.

हातांनीं भाकर बारीक चांगली कुसकरून भुगा करीत आहे, तें पाहून ती आपले भर्त्यास हळूच ह्मणते कीं, दोन वाट्या आणिल्या आहेत त्या अर्थीं कांहीं तरी आह्मां करितां खटपट करितो आहे, असें वाटतें; नाहीं तर ह्याला दोन वाट्या आणावयाचें प्रयोजन नव्हतें. हें ऐकून तो ह्मणतो, ईश्वर करो कीं हें तुझें बोलणें खरें होवो. जशी मला त्याच्या वाईट चाली विषयीं खातरी आहे तशी तो सद्गुणी निवडेल ही माझी खातरी असती, तर मला फार समाधान होतें.

इतक्यांत रामानें दूधभाकरीचा काला दोन वाट्यांत घालून माता पितरांजवळ आणिला, आणि बोलला कीं, अहो बाबा, अगे आई, तुह्मी उठा, ह्यां तुह्मां करितां दूधभाकरीचा काला आणिला आहे. हे शब्द ऐकून बाप बोलला, काय रामा, त्वां आह्मां करितां दूधभाकर आणली आहे? ही तुला कोणीं दिली? रामानें उत्तर केलें कीं, ही मला आपला शेजारी रामजी पाटील ह्याच्या बायकोनें दिली. तेव्हां उभयतांस अति आनंद होऊन तीं त्यास ह्मणालीं कीं, बरें तर, वाट्या खालीं ठेव. त्यासमयीं त्यांची मुखश्री टवटवीत दिसूं लागली, आणि खडबडून उठून पुत्रास अति हर्षानें आलिंगन देऊन बोलली कीं, तूं इतका दुर्लक्षणी खरा, परंतु ह्या तुझ्या उत्तम वागणुकेनें आमचें जन्म सफळ झालें. अ

# बाळमित्र.

सें ह्मणून तिघें ही रडलीं. त्या काळीं रामा शुद्धीवर आला होता, ह्मणून त्यानें आईबापांस प्रार्थना केली कीं, मी आजपर्यंत केवळ दुराचरणी होतों, परंतु इतःपर माझी वर्तणूक पाहून तुह्मांस अतिशयित आनंद होत जाईल.

इतक्यांत शेजारीण ह्मातारी ही कांहीं अन्न घेऊन आली, तिनें रामाचें उत्तम आचरण पाहिलें, तेणें करून तिचाही कंठ सद्गदित झाला, आणि तिनें रामास आशीर्वाद दिला.

मग त्या चौघांनीं ही एके पंगतीस बसून भोजन केलें. असें भोजन त्यांनीं पूर्वीं कधीं ही केलें नव्हतें. त्या दिवसचा जो आनंद त्याच्या योगें करून त्या उभयतांची प्रकृति दिवसें दिवस चांगली होत चालली, तेणें करून रामासही अतिशयित सुख मिळूं लागलें, आणि त्यादिवसापासून त्याचे शेजारीपाजारी त्याजवर पुत्रापेक्षां अधिक ममता करूं लागले.

---

# यमा मुलगी.

यमा पांच वर्षांची मुलगी होती; ती आपले आईवर फार प्रीति ठेवीत असे, व सदा सर्वदा निजपाशीं रहावयास इच्छी;

# यमामुलगी.

आईचा क्षणमात्र वियोग तिला सोसावयास कठीण पडे. एके दिवशीं यमाची आई बाजारांत जावयास निघाली, तेसमयीं यमानें आईपाशीं भारी छंद घेतला कीं, मला बरोबर बाजारांत ने; तेव्हां तिची आई ह्मणाली, तूं बाजारांत माझा पाय गोंवा करशील; तूं कांहीं येऊं नको. यमा ह्मणाली, मी तुला कांहीं एक उपद्रव देणार नाहीं; ह्याप्रमाणें तिनें अतिशयित आग्रह केला ह्मणून यमास आईनें बरोबर घेतलें.

मग उभयतां मायलेंकी बाजारांत जावयास समागमें निघाल्या. त्यांचे घरापासून बाजार फार लांब होता. त्या रस्त्यानें मनुष्यांची दाटी ही फार होती, त्यामुळें असें झालें कीं, यमानें आईचा पदर धरला होता तो हातचा सुटला, तेव्हां पुढें जातांजातां बाजारा जवळ पोहोंचे पर्यंत यमा आपले आईस चुकून मागें राहिली, तथापि यमानें आईस सहजांत आटोपलें; पण तो बाजारचा घोळका मोठा त्यांत तिनें सावधपणें चालावें तें न करितां माकडांचा तमाशा होत होता तो पाहण्याचे नादास लागून तेथेंच उभी राहिली, मग पुढें बघून जों पाहते तों आई कोठें नाहीं; तेव्हां लौकर पुढें धांवून गेली तरीं आई दृष्टीस पडेना; तेव्हां एके उमाळ्याचे जाग्यावर उभी राहून पांच चार वेळां हाका मारल्या तरीं आई ओ देईना, मग कावरी बावरी होऊन

आईला इकडे तिकडे पाहूं लागली, पण आई कोठें ही दृष्टीस पडेना, व तिचा शब्दही कानावर येईना; मग तर फारच घाबरी झाली. लोकांच्या दाटीमध्यें जावयास तिला धैर्य होईना, तेव्हां ती एकीकडे उभीराहून आई आई ह्मणून अतिशयें करून रडूं लागली.

त्या वाटेनें जाणारे येणारे लोकांनीं तिला पाहिलें; त्यांतून एकजण ह्मणाला, पहा, ही मुलगी संकटांत पडून धायमाय मोकलून रडते आहे. दुसऱ्या कोणेकानें विचारलें, मुली, तुला काय झालें? यमानें उत्तर दिलें कीं, आईची व माझी चुकामूक पडली, तेव्हां तो ह्मणाला, मुली, चिंता करूं नको, तुझी आई तुला लौकरच भेटेल. तिसरा ह्मणतो, मुली, उगीच कां रडतेस? तुझ्या ओरडण्यानें आई येते कीं काय? ह्याकरितां उगी ऐस.

ह्या प्रमाणें बहुतेक लोक तिजशीं एक दोन शब्द बोलून जात. असें होतां होतां अकस्मात् प्रारब्ध योगाचे बळें करून त्याच वाटेनें एक लंगडी गवळण जात होती तिनें यमास त्या क्लेशांत पाहिलें, तेव्हां तिचे मनांत कळवळा आला, आणि उभी राहून ती यमास ह्मणते, मुली, जेव्हां आईची तुझी चुकामूक झाली तेव्हां तुझी आई कोठें जात होती? यमानें उत्तर केलें कीं, ती बाजारांत कापड ओळीकडे जात होती; तेव्हां गवळण

ह्मणाली कीं, मुली, रडूं नको, मी बाजारांतच जाते, तिकडे तुझी आई सांपडेल. असें ऐकतांच यमानें त्या गवळणीचा पदर बळकट धरिला, आणि दोघीजणी लौकरच बाजारांत गेल्या; तेथें यमानें आईस पाहतांच मोठ्या आनंदानें हाक मारली; ती हाक आईचे कानीं पडतांच लगबगीनें धांवून येऊन तिनें यमास पोटाशीं धरलें, आणि ह्मणाली कीं, तूं मजपासून चुकून कोणीकडे गेलीस ह्यामुळें मी फार काळजींत पडलें होतें. मग यमानें रडतरडत सारें वर्तमान आईस सांगितलें कीं, मी तेथें माकडांचा तमाशा पहावयास उभी राहिलें, आणि पुढें पाहतें तंव तूं कोठें दिसेनाशी झालीस; तेव्हां तुझें नांव घेऊन म्या पुष्कळ हाका मारल्या, तरीं तुझा ठिकाणा कोठें नाहीं; शेवटीं ह्या गवळणीनें मजवर दया करून लोकांचे दाटींतून संभाळून आणून मला तुजजवळ पोहोंचतें केलें. हें ऐकून यमाचे आईनें त्या गवळणीचा मोठा उपकार मानिला, आणि तिची फार फार स्तुती करून तिजजवळ जें बाकी लोणी राहिलें होतें तें घेऊन तिनें मागितल्यापेक्षां अधिक पैसे तिला दिले. उभयतां मायलेकींनीं घरीं पोहोंचे पर्यंत त्या गवळणीचे उपकारा शिवाय दुसरी कांहीं एक गोष्ट काढली नाहीं.

कितीएक दिवसांनंतर यमानें त्या गवळणीचे घरीं जाण्या

# बाळमित्र.

विषयीं आईला विचारून एक चोळी लुगडें घेऊन तीस नेऊन दिलें, व तिचें सामर्थ्य होतें त्याप्रमाणें तिनें त्या म्हातारीचा समाचार घेतला. पुढें कोणतें ही एखादें संकट त्या म्हातारे गवळणीस प्राप्त झालें असतां तिला त्यांतून सोडविण्याविषयीं यमा अति आनंदानें सहाय होई. अशी प्रीति परस्परांची एकमेकींवर जडली. उपकारानें इतकी ममता वाढेल हें प्रथम त्या गवळणीचे मनांत आलें नव्हतें.

---

## सीताराम.

सीताराम म्हणून एक पांचां वर्षांचा मुलगा होता; तो आई बापांचा एकुलता एक होता. त्याची मातोश्री मरण पावली म्हणून तो मुलगा आईची अतिशयित खंती करूं लागला, आणि रात्रंदिवस त्यानें असा छंद घेतला कीं, मला आई जवळ न्या. हें दुःख पाहून त्याचे बापानें फारच हयबत घेतली, तेव्हां आतेनें त्या मुलास आपले घरीं नेलें, तथापि ती दिवसांतून एकदोनवेळ

# सीताराम.

त्या मुलास बापाकडे घेऊन जात असे; असें होतां होतां आ ईस मरून वर्ष लोटल्यावर सीताराम अमळसा आतेचे नादीं लागून स्वस्थानें राहूं लागला होता.

बापाचे मनांत वारंवार हेंच येई कीं, बायको मेली, मी म्हा तारा झालों, एक मूल तोही झुरणीस लागला, आतां पुढें काय क रावें? ह्या गोष्टीची रात्रंदिवस त्यास चिंता लागली, ह्यामुळें त्या चें दिवसें दिवस अन्नपाणी तुटत चाललें. तेव्हां लोकही कल्प ना करीत कीं, हा हाय हाय घेऊन एखादे दिवशीं मरून जाई ल, मग पोरास आपंगावयास कोणी नाहीं असें होईल.

तो जेव्हां फार दुखण्यास पडला तेव्हां पंधरा दिवस प र्यंत आतेनें सीतारामास नित्याप्रमाणें बापाचे भेटीस नेलें नाहीं. सीताराम प्रतिदिवशीं आपल्या आतेस ह्मणे कीं, मला बाबाकडे ने; तेव्हां ती त्या बाळास कांहीं तरी निमित्त सांगून चाळवा चाळव करी. चाळविण्याचें कारण हेंच कीं, त्याचा बा प अगदीं मरणोन्मुख झाला होता, आणि त्यानेंच सांगितलें हो तें कीं, मुलास आतां माझे भेटीस आणूं नको, कां कीं तो माझी अशी अवस्था पाहून प्राणच टाकील. ह्याकरितां आतेनें तिकडे नेला नाहीं. असें करितां करितां दसऱ्याचा दिवस आला तो अद ले दिवशीं रात्रीं तो मृत्यु पावला.

# बाळमित्र.

दुसरे दिवशीं सीताराम नित्याप्रमाणें पहांटेस उठून आतेस ह्मणाला, आज दसऱ्याचा दिवस आहे, ह्याकरितां आज तरीं मला बाबाकडे घेऊन चल; न नेशील तर मी अन्न घेणार नाहीं, असा त्या मुलानें बापाच्या भेटीचा फारच छंद घेतला; शेवटीं आतेनें त्यास तिकडे न्यावयाचें कबूल केलें, परंतु ती इकडे तिकडे स्पर्श करूं नदेतां त्यास स्नान घालावयास प्रवर्तली, हें पाहून तो बाळ बोलला, आत्याबाई, तूं मला इकडे तिकडे शिवूं देत नाहींस, आणि आंघोळही घालितेस, तर आतां कोण मेलें बरें? ह्यास समजलें असतां हा एकच आकांत करील ह्या भयानें ती कांहीं न बोलतां उगीच स्तब्ध राहिली. तेव्हां सीताराम ह्मणतो, जर तूं सांगत नाहींस तर मी आपले बाबास विचारीन. हें ऐकतांच तिच्या नेत्रांतून खळखळां अश्रुधारा वाहूं लागल्या, आणि मोठ्यानें हंबरडा फोडून ह्मणाली, बाबा, तोचरे मेला. त्या काळीं सीताराम मोठा आक्रोश करून ह्मणाला, अरे देवा, माझा बाप कसा मेला? माझी आई मेली आणि बापही मेला आतां मी कसें करूं? असें ह्मणून जो दुःखाचा हुंदका आला तो उरांत दाटून तेणेंकरून तो बाळ अचेतन होऊन पडला. त्यासमयीं आतेस त्या मुलाला देहावर आणितां फार कठीण पडलें. नंतर तिनें त्याचे तोंडांत तोंड घालून ह्मटलें,

# सीताराम.

अरे सीतारामा, हे तुझे आईबाप आले आहेत.

सीता० (गडबडून उठून) माझे आईबाप! कोठें आहेत?

आत ते देवाजवळ गेले आहेत, आणि तूं जर चांगला वागलास तर देवाजवळ प्रार्थना करून देवाकडून तुजवर कृपा करविणार आहेत; देवही तुझा सांभाळ खचीत करील, कारण कीं, मरते समयीं बापानें तुला देवाचे स्वाधीन केलें आहे.

सीता० काल मीं मनांत ह्मटलें होतें कीं, उद्यां मी बाबाबरोबर शिलंगण खेळावयास जाईन, आणि आतां तूं असें सांगतेस. अझून त्यास पुरलें नसेल, तर त्याकडे मला घेऊन चल; एकदां मला त्यास पाहूं दे. मला दुःख होईल ह्मणून त्यानें बोलाविलें नाहीं. मजकडूनच त्यास दुःख अधिक झालें असतें, पण आतां मी कांहीं त्यास दुःख देणार नाहीं. हा शेवटचा दिवस आहे ह्यासाठीं आत्याबाई मला बाबाकडे ने.

आत बरें तर, मी नेतें, पण तूं रडूं नको. तूं पहा बरें, मला केवढें दुःख आहे तें; मला खावयास तोच घालीत होता, आतां त्यावांचून मला कोणी राहिलें नाहीं, मी फार गरीब बायको. एक तर तो माझा भाऊ, दुसरें नातें अन्न

दाता, तो जेव्हां माझा नाहींसा झाला तेव्हां आज मजव र केवढा दुःखाचा डोंगर पडला आहे? आतां म्यां सर्व भार ईश्वरावर ठेविला आहे तसा तूंही ठेव; आणि जशी म्यां दगडाची छाती केली आहे तशी तूंही कर.

सीता॰ — होय होय, आतां दगडाची छाती केली पाहिजे, पण, आत्याबाई, मला माझे बाबाकडे ने; त्याची तिरडी त री एकवेळ मला पाहूं दे.

मग सीताराम आतेचा हात धरून तेथून जो नि घाला तो बापाचे घराजवळ पोहोंचला, आणि पाहतो तों त्या चे तिरडी भोंवतालीं शेजारी पाजारी, ओळखी देखीचीं मा णसें, उभीं आहेत, आणि सर्वलोक दुःखित होऊन त्या पु ण्य पुरुषाची प्रशंसा करिता हेत, इतक्यामध्यें सीताराम पुढें लगबगीनें धांवून जाऊन बापाचे तोंडांत तोंड घालू न त्याप्रेतावर पडला. त्यासमयीं त्याचे डोळ्यांतून पाण्या चालबलेशा देखील ननिघतां त्याचे शरीराची कोरड वळू न गेली. मग कांहीं अवकाशानें बोलूं लागला. बाबा, तूं मला टाकून चाललास, आतां मी कोणाकडे पाहूं, मला को ण सांभाळील! मला केवढे दुःखाचे डोंगर झाले! जेव्हां मा झी आई मेली तेव्हां तूं तर भारीच रडलास, पण माझे समा

धान केलें, तूं मेलास आतां माझें समाधान कोण करील?

मग, अहो बाबा, अशी मोठ्यानें हाक फोडून निपचेत पडला, आणि दुःखामुळें तोंडाची कोरड वळली, व मुखांतून एक शब्द ननिघतां त्यालेंकरानें चिमणी मारिखा आ वासला, त्यासमयीं त्या मुलास प्रेतावरून उठवावयाचें त्या आतेस फार कठीण पडलें.

मग त्याचे आतेनें विचार केला कीं, जर ह्यामुलास स्मशानांत नेलें तर हा काय करील नकळे; ह्याभयानें ती सीतारामास शेजारणीचे घरीं ठेवून त्याचे बापास पुरावयास गेली. प्रेत खळींत घालतेसमयीं जीका स्मशानांत एकच आरडा आरड झाली ती सीतारामानें ऐकतांच तो घरधानेणीचीदृष्टि चुकवून निघाला तो स्मशानभूमीस आला, तेथें सर्वलोक पुरण्याचे गडबडींत होते, इतक्यासंधींत त्यानें अकस्मात जाऊन, मला बाबा बरोबर पुरा, असें ह्मणून धाडकन खळींत उडी टाकिली. त्याबाळाची इतकी ममता पाहून जवळच्या लोकांचीं अंतःकरणें कळवळलीं, आणि त्यांनीं सीतारामास मोठ्या बळात्कारानें बाहेर काढिलें. पुढें तीन दिवस पर्यंत बापाचें स्मरण करून वेड्यासारखा इकडे तिकडे धांवे, आणि त्याचे डोळ्यांतून पाण्या

# बाळमित्र.

चे लोट चालले असत, अशी त्याची अवस्था फार कठीण झाली. अनंतर त्यामुलाचें रडणें तर राहिलें, परंतु त्यास उदासीनता फारच झाली.

ही गोष्ट एक्या कृपावंत सावकारास कळली; तो सीतारामाचे बापास ओळखीत होता, ह्याकरितां तो त्या मुलास पहावयास त्याचे आतेचे घरीं आला, आणि सीतारामाचें दुःख पाहून फार दुःखित झाला. मग तो सीतारामास आपले घरीं नेऊन त्यावर पुत्रा सारखी ममता करूं लागला, तेणें करून त्याचें रडणें व उदासीनता दिवसें दिवस कमी होत चालली. तेव्हां सीतारामचे मनांत इतका निश्चय झाला कीं हा सावकारच आतां माझा खरा बाप. सावकाराची ही प्रीति त्या मुलावर त्याचे उत्तम गुणें करून उत्तरोत्तर अधिक होत गेली. पुढें सीताराम वीस वर्षाचा झाल्यावर तो आपल्या मानलेल्या बापाचा कारभार बहुत खबरदारीनें करूं लागला. पुढें सावकारानें सीतारामास आपली कन्या व कांहीं द्रव्य देऊन वेगळें ठेविलें.

ह्यापूर्वी सीताराम आपले आतेचा समाचार यथाशक्ति घेत असे. पुढें संपन्न झाल्यावर त्यानें तिला दारिद्र्यापासून सोडविलें.

## सीताराम.

प्रतिवर्षी विजयादशमीचा दिवस आला ह्मणजे सीतारामास त्या दुःखाची आठवण होई, आणि त्याचे मनांत असें वागत असे कीं, जें मला दुःख प्राप्त झालें होतें त्याचा परिहार मी उत्तम रीतीनें वागलों ह्मणून झाला; तर, असेंच सुरीतीनें निरंतर वर्तावें, ही बुद्धि त्याला त्या दुःखानेंच शिकविली.

---

## लहान गोपाळा.

कांहीं संस्कृत शब्द पाठ करून संवत्सर प्रतिपदेचे दिवशीं गोपाळा खोलींतून बाहेर आला, आणि आपले आंगीं मोठी प्रौढता आणून बापापुढें बोलूं लागला.

अहो दादा, जसे लोक एकमेकांशीं संस्कृत भाषण बोलतात तसा मी तुह्मांशीं बोलतों; पहा, आरोग्य, सौख्य.

इतकें बोलून अटकला; पुढें काय बोलावें त्याची त्यास स्मृति होईना; तेव्हां तो इकडे तिकडे पाहून आंगरख्याचे पेशाकळीस पीळ घालूं लागला, परंतु त्याचा तो पीळ व्यर्थ झाला. त्याला संस्कृत

शब्द पुढें आठवतना ह्मणून तो खिन्न होऊन अंमळसा रडकुंडी झाला; त्याची ती अवस्था पाहून बापास मोह उत्पन्न झाला, आणि तो त्याशीं बोलूं लागला.

शाबास बेटा, बरेंच मजेचें संस्कृत भाषण बोललास, ही कल्पना तुझीच असेल असें वाटतें.

गोपा०—— नाहीं नाहीं, दादा, तुह्मीं मला शाबासकी दिली, बरें मी कसे खासे उंचउंच शब्द बोलिलों ! हे मला माझे भावानें लिहून दिले आहेत, हे तुह्मी पहा मी आणखी एकवेळ वाचतों; आणि आईपाशीं भाषण कसें बोलावें तेंही मला येतें.

बाप०—— नको नको, गोपाळा, तें बोलून दाखवावयाचें कांहीं कारण नाहीं. जरीं त्वां कांहीं नह्मटलें तरीं तुझी आणि तुझ्या भावाची परस्पर प्रीति पाहून मी व तुझी आई उभयतां आह्मी संतोषी झालों.

गोपा०—— मी खरोखरीं सांगतों, ते शब्द पाहून पाहून जोडावयास माझे भावाला पंधरा दिवस लागले, आणि मला शिकावयाला तर काय फारच दिवस लागले; पण ते मी विसरून गेलों, बोलावयाचे वेळेस आठवत नाहींत. आणि काल रात्रीं म्यां बागांत तुमचे पागोट्या पुढें येवढी चूक नयेतां वा

गले ह्मटले होते कीं हो!

बाप ——— तेव्हां तर मी डाळिंबीचे झाडाखालीं बसलों होतों, आतां तुला संतोष व्हावा ह्मणून सांगतों, तें म्यां सर्व ऐकिलें.

गोपा॰ ——— (आनंद पावून) खरें काय, दादा? तर मला आतां भारी संतोष झाला; पण दादा, म्यां चांगलें ह्मटलेंना?

बाप ——— वाव्हा! फार चांगलें शुद्ध ह्मटलें.

गोपा॰ ——— पण त्यांतला अर्थ फार चांगला होताना?

बाप ——— होय, पण तें तर तुझ्या भावानें योजून योजून काढलें होतें; तसें तूं होऊन जर आपले तोंडानें बोलतास तर मला आनंद होता.

गोपा॰ ——— दादा, पण एवढी मोठी गोष्ट मी हलक्या शब्दांनीं बोलतों तर मग वाईट दिसतें, नव्हे?

बाप ——— तूं उगीच निरुपयोगी शब्द बोलल्यास त्यापेक्षां यंदा अमुक पदार्थ भोगावयाची माझी इच्छा आहे हा विचार कां नाहीं केला?

गोपा॰ ——— तें तर कांहींच नव्हे. तुमचे मनांत असें आहेकीं पोरांबाळांनीं खुशाल असावें, आणि आपणास व मित्रांस आनंद असावा.

# बाळमित्र.

बाप —— बरें तर, आपल्या तीर्थरूपास हें सुख असावें हें तूं इच्छितोस कीं नाहीं?

गोपा० —— हें तर माझ्या मनापासून आहे.

बाप —— बरें, तूं आपल्या भावाच्या साहाय्या वांचून आपल्या आपणच कां बोलला नाहींस?

गोपा० —— मी कसें बोलूं? मी कांहीं मोठा शाहाणा नव्हे, असें मला वाटलें; आतां तुह्मीं सांगितलें तर ज्याशीं ह्मणाल त्याशीं बोलेन.

बाप —— अरे, पण सर्वलोकांस एकसारखेंच बोलूं नये. लोकांची स्थिति रीति व उदीमधंदा पाहून त्यासारखें बोलत जावें. जो कोणी सुखी आहे त्याला असें ह्मणावें कीं, अक्षयसुखीच असा, जो कारभारी असेल त्यास असें ह्मणावें कीं, तुमचा कारभार असाच ईश्वर निरंतर चालवो, आणि तुह्मां कडून हाताखालचे जे लोक आहेत त्यांचें कल्याण होवो, जे ह्मातारे आहेत त्यांशीं अशा रीतीनें बोलावें कीं, तुह्मी आणखी फार दिवस वांचा, आणि नातवंडें पाहून तुमचे हातपाय धडसे खडसे राहोत, आणि ईश्वरापुढें आपले अपराध कबूल करून त्याचे चिंतनानें भवसमुद्र उतरून जा.

गोपा० —— वाहवा दादा, तुह्मीं मला फार चांगलें शिकविलें, आ

# लहान गोपाळ.

प्रमाणें हळू चालूं लागलों, तेणें करून माझेंच हित झालें. मला वाटेनें जें नसमजलें तें तुह्मीं समजावून सांगितलें; आणि जेव्हां विसांवा घ्यावया जोगी चांगली जागा आढळे तेव्हां आपण त्याठिकाणीं बसूं; तुह्मी पोथींतल्या मोठमोठ्या कथा मला सांगितल्या, आणि वाटेनें चालतां चालतां नाना प्रकारच्या गोष्टी सांगून मला हांसविलें; त्यामुळें मला वाटेंत कांहीं अवघड वाटलें नाहीं. मग आपण तेथें पोहांचल्यावर पक्वान्नाचें खासें मजेचें जेवण जेवलों.

बाप —— त्वां बहुतेक सर्व सांगितलें पण त्यांतील एक दोन गोष्टी तशाच ठेविल्या; त्यांचा मला फार संतोष झाला, त्या ह्याच कीं एक आंधळा खाड्यांत पडला होता त्यास त्वां हातांत धरून वाटेस लावलें आणि एके गरीब ह्यातारीचें गांठोडें बैलावरून खालीं पडलें होतें तें त्वां धांवून जाऊन तिचें तिला नेऊन दिलें, आणि भिकाऱ्यांस त्वां कांहीं पैसेही दिले.

गोपा० —— दादा, तें मी कांहीं विसरलों नाहीं; पण आपली बढाई आपण आपल्या तोंडानें बोलूं नये, असें तुह्मीच मला शिकविलें होतें, ह्मणून बोललों नाहीं.

# बाळमित्र.

बाप—— तुजमध्यें इतका समज आहे, हें पाहून मला फार आनंद झाला. आतां मी सांगतों तें चित्त देऊन ऐक, पुण्यास जाण्याचें कूच आणि हें कूच सारखेंच आहे; तूं तेथून निघते समयीं मी थकेन ह्याचा विचार नकरितां धूम पळत सुटलास, आणि ठेंचा खाऊं लागलास; त्यावेळेस मी जवळ होतों ह्मणून बरें झालें. तसें ह्या आयुष्यमार्गांतता रुण्याचे दमानें अविचारें करून जो चालूं लागतो त्याला सुरीतीनें वागवावयास जर कोणी सन्मित्र मिळाला तर तो उत्तम चाल व चांगल्या गोष्टी शिकवील, तेणें करून जसे त्या वाटेचे श्रम तुला वाटले नाहींत तसे ह्या संसार मार्गांचे क्लेश होणार नाहींत. वाटेनें गरीब लोकांवर उपकार करून पुण्यास पोहोंचल्यावर जसें आपणांस मिष्टान्न भोजन मिळालें तसें ह्यानंतर देहांत येऊन पुण्यकर्म केल्यानें येथून कूच करून ईश्वरापाशीं गेल्यावर सुख प्राप्त होतें.

गोपा०—— होहो, दादा, दृष्टांत तर खासा मिळाला; आतां मला दिसतें कीं यंदां फार सुख प्राप्त होईल.

बाप —— आतां तुला आणखी एक त्योंनीलच दृष्टांत सांगतों, ऐक. रस्त्यानें चालतां चालतां आपण मागें पाहूं त्यावें

# लहान गोपाळ.

तों मी सर्वांपुढें असेंच बोलेन, पण, दादा, गुढीच्या पाडव्याचे दिवशींच लोकांशीं असें भाषण कां करावें, बरें?

बाप —— बाबा, संवत्सरप्रतिपदाही कांहीं एक कालमानाचा अवधि आहे. प्रत्येक वर्ष त्या कालमानाच्या एकएक पायरीसारखें आहे; त्यांत आपण वांचणार आहों, आणि एका पायरीवरून दुसऱ्या पायरीवर जात आहों; ह्याकरितां आपले इष्टमित्र असतील त्यांनीं येऊन एकमेकांस भेटावें आणि ह्या वर्षारंभापासून पुढल्या वर्षारंभापर्यंत काळ आनंदानें जावा ह्मणून परस्परें कल्याणप्रद मंगळरूप भाषण करावें. हें बोलणें तुझ्या मनांत भरलेंना पण?

गोपा० ——होय, दादा, हें मी समजलों.

बाप —— तुला मी दुसऱ्या दृष्टांतावरून ध्यानांत यावयासारखें सांगतों. कितीएक दिवसां मागें आपण सिंहगड किल्ल्यावर गेलों होतों, तेथून पुणें शहर दृष्टीस पडत होतें तें तुला आठवतें? आणि येथून पुणें शहर लांब आहे हें मनांत न आणितां तिकडेस चला ह्मणून त्वां भारी छंद घेतला होता, ठाऊक आहे?

गोपा० —— होय, दादा, खरी गोष्ट; पण मी ते दिवशीं थकल्यावांचून तेथवर पायीं चालत गेलों नाहीं बरें?

# बाळमित्र.

बाप —— तें खरेंच; ते दिवशीं तूं बराच चाललास; पण आठवण करकीं कोसाकोसावर खुणांसाठीं जे चिरे पुरलेले होते त्यात्या ठिकाणीं म्यां तुला विसांव्यासाठीं बसविलें होतें.

गोपा० —— खरेंच, दादा, मला असें वाटतें कीं ज्यांनीं ते दगड रोंविले त्यांनीं ती कल्पना फार चांगली काढली, त्यावरून आपण किती कोस आलों, व किती कोस पुढें लांब जावयाचें राहिलें हें समजतें.

बाप —— तर ह्याप्रमाणेंच काळमानाची गणना आहे; तूं आपल्या तोंडानेंच बोललास कीं त्या रोंवलेल्या दगडांवरून किती आलों व पुढें किती जावयाचें आहे हें समजतें; तर ह्याचेंही तसेंच आहे; आज पावेतों आयुष्याचें काळमान किती झालें व पुढें किती राहिलें हें समजतें. तें नि हें मान एकसारखेंच आहे, त्यावाटेंत जें काय झालें तें सांग ह्मणजे त्यावरून आणखी एक तुला दृष्टांत देतों.

गोपा० —— दादा तें मला सारें अझून आठवतें. पहिल्यानें माझा नवा दम होता ह्मणून मी धांवूं लागलों, तों मला वारंवार ठेंचा लागूं लागल्या; तेव्हां तुह्मीं सांगितलें कीं, अझून रस्ता फार लांब आहे, ह्याकरितां हळू चाल. मग तुमच्या ह्मण्या

# लहान गोपाळ.

तुला स्मरण आहे? केव्हां केव्हां आपण उंच जागेवर उभे राहून मागून किती आलों हें पहात असूं, ह्यामुळें सर्व आपल्या लक्ष्यांत येई.

गोपा०—— होय, मी इतका लांब चालत आलों हें पाहून मला आनंद होई.

बाप —— आतां तुझीं जीं वर्षें मागें लोटलीं त्यांकडे पाहिल्यावर तसा संतोष वाटणार नाहीं कीं काय? तूं ह्या जगांत नग्न उपजलास तेव्हां तुझे आईनें तुला स्तनपान करवून जिवविलें, आणि आतां तुझा सांभाळ व विद्याभ्यास मी करवितों आहें, हा आमचा उपकार त्वां कोणत्या रीतीनें फेडावा तें ऐक; तूं उत्तम रीतीनें वागून नांवा लौकिकास चढ म्हणजे झालें; हीच आमची इच्छा आहे; येणें करून तुझेंच हित होईल. ज्यांत तुझेंच कल्याण अशा रीतीनें वागविणार जे आईबाप त्यांचे पोटीं तुला ईश्वरानें जन्मास घातलें; ह्यासाठीं त्यांचे ठायीं लक्ष्य ठेवून त्यांची व गुरूची सर्वदा मर्यादा ठेवीत जावें; बहीण भाऊ ह्यांची निरंतर ममता करीत असावें, आणि जे आपले सेवकजन असतील त्यांचें कधीं मन दुखवूं नये, व धन्याशीं व वडिलांशीं उद्दामपणें वागूं नये. फार काय सांगूं? थो

इच्यांत सांगतों; जें तुला आह्मी नित्यनित्य उत्तमाचरण शिकवीत आलों तें मनांत ठेवून त्याप्रमाणें वागतजा, ह्मणजे त्यांत सर्व आहे.

गोपा० —— अहो, दादा, क्षमा करा! आज पावेतों जें झालें त्या कडे पाहूं नका; आजपासून जें करणें तें ईश्वराचे कृपेंक रून तुमच्या शिकवणीप्रमाणें करीत जाईन.

बाप —— बरं, तर, हेंच मी तुझें वचन घेतों; ह्याप्रमाणें वागलास तर तेणें करून जें काय मला सुख होईल तें तुला हित कारकच होईल; मी त्यासुखाची इच्छा तुझ्याठ करितां करितों.



# भातुकली,

## नाटक दोन अंकी.

### पात्रें,

माधवराव. - - - - कोणी गृहस्थ.
उमाकांत - - - - माधवरावाचा मुलगा.
जान्हवी - - - - माधवरावाची मुलगी.
नाना - - - - - उमाकांताचा मित्र.
विठू - - - - - एक गरीब मुलगा.
उम्या - - - - - चाकर.

### स्थळ.

### माधवरावाची खोली.

### प्रवेश १.

नाना आणि विठू

**विठू** —— नाना, तूं येवढे सकाळीं कां आलास?
**नाना** —— विठोबा, मी तुजशीं कांहीं बोलावयास आलों.
**विठू** —— मजशीं? तें काय बरें?
**नाना** —— मी हेंच पुसायाला आलों कीं, काल तुला भातुक

ली काय मिळाली?

विठू—— मला गरिबाला भातुकली कोण देतो? आह्मांस भाजी भाकर पोटभर मिळाली ह्मणजे तीच आमची भातुकली.

नाना——पण तुला माधवरावजी कांहीं कमी पडूं देत नाहींत, हें मला माहीत आहे.

विठू—— खरेंच सांगितलें; त्यांची कृपा आह्मांवर आहे ह्मणूनच आमची धडगत आहे; नाहींतर काय पुसतोस? आह्मी अभ्यास महाग झालों असतों. ते माझे बापावर जशी कृपा करीत होते तशीच आह्मांवर करितात. आपण कांहीं पाप बोलत नाहीं, त्यांचा मुलगा देखील आह्मांवर कृपा करितो. पहा, हीं नवीं वस्त्रें उमाकांतानें मला दिलीं; त्याचे बापानें त्याजकरितां घेतलीं होतीं, पण तीं मला द्यावयास सांगितलीं; आणि उमाकांतानें आपले बहिणीस सांगून माझे बहिणीला जुनीं पांघुरणें देवविलीं.

नाना—— त्वां मघां भातुकलीचें नांव घेतलें, तर गड्या, उमाकांताला चांगली चांगली भातुकली मिळाली असेल.

विठू ——त्याचा बाप मानवर आहे, मग चांगली मिळावयाचें काय आश्चर्य? त्याला नित्य नित्य पुष्कळ खाऊ मिळतो,

# भातुकली.

म्हणून त्याला कांहीं फारसा आनंद नाहीं, ज्याला कधीं मिळत नाहीं त्याला तें अपूर्व वाटतें; उमाकांताचें मन सदां खाऊं घालें; आहे; त्याला तर पेढे, बरफी, जांब, केळीं, नारळ, साखरेचीं चित्रें, पुतळ्या, हत्ती, घोडे, असें कितीक मिळतें. पाहिजे तर तूं त्यासच कां विचारीसना?

नाना — म्हटलें, अगोदर तुला विचारावें मग त्याजकडे जावें, असा माझा मनसूबा, कां कीं ह्याचें कांहीं गुप्त कारण आहे.

विठू — तें काय तें मला सांग.

नाना — ती गोष्ट कोणास सांगावयाची नाहीं, पण तुजजवळून जर कोठें फुटणार नाहीं तर तुला —

विठू — मी कांहीं चहाडचुचका नाहीं, सांगायाला.

नाना — तर वचन दे.

विठू — घे, मी हातावर हात मारितों.

नाना — हें पहा, तूं कांहीं उमाकांताला कळूं देऊं नको, त्यां तिला खूब ठकविलें.

विठू — काय! त्यां माझे उमाकांताला ठकविलें? ही कांहीं आनंदाची गोष्ट नव्हे, हो.

नाना — उमाकांताला काल काय काय मिळालें तें तुला त्यानें

दाखविलें असेल.

विठू — होय, त्यानें मला सारें दाखविलें; पण एकदां पाहून ध्यानांत कसें राहील? पण पहिल्यानें तर त्यास मुद्या, पागोटें, व किन्ते, व बखरी, असें मिळालें होतें.

नाना — त्याची गोष्ट मी तुला विचारीत नाहीं. पण ह्या दिवशीं मिठाई वगैरे पोरांची भातुकली किती मिळाली हें मी विचारतों.

विठू — असला खाऊ रावजींनीं त्यास कांहीं दिला नाहीं; ते म्हणाले कीं, गोड खाल्ल्यानें पोटांत एखादा रोग होईल; पण त्याची जी आत आहे तिनें कांहीं दिलें आहे.

नाना — तें काय काय दिलें आहे? सांग, बरें.

विठू — तें माझ्यानें कसें सांगवेल, म्यां ऐकिलें देखील नाहीं.

नाना — जा तर, मी तुला कांहींच कळविणार नाहीं. जी गुप्त गोष्ट आहे ती तुला अझून म्यां कुठे सांगितली आहे?

विठू — काय म्हणतोस नाना! एकून, तूं माझ्या मित्राचा असा अन्याय करूं पाहतोस?

नाना — आह्मीं उभयतांनीं तसाच करार केला आहे, मग काय?

विठू — तें मला समजत नाहीं. पण तो जर फसला असला तर त्वां त्याचा अन्याय केला.

# भातुकली.

नाना — पण, आह्मीं परवांचे दिवशीं कबूल केलें होतें कीं, ज्या पदार्थांचा वांटा व्हावया जोगा असेल ते पदार्थ आपण वांटून घेऊं.

विठू — जर असें आहे तर ह्यांत कांहीं त्याचा तोटा नाहीं, त्याचे रावजीं पेक्षां तुझा बाप मातबर आहे, त्यापक्षीं तुलाच चांगली चांगली भातुकली पुष्कळ मिळाली असेल.

नाना — तूं ह्मणतोस तें खरेंच आहे; परंतु पहा, मला खांशी थोडी मिळाली आहे हिचा वांटा व्हावयाचा नाहीं.

विठू — पण तुला दुसरें कांहीं मिळालें नाहीं?

नाना — तुला खरेंच सांगूं? पावशेर पेढे व पेशावे जांब ह्यांशिवाय कांहीं भातुकली मिळाली नाहीं. माझा बापही उमाकांताचे बापाप्रमाणेंच बोलला कीं, बहुत गोडखाल्यानें पोराचे पोटांत एखादा रोग उत्पन्न होईल. काय सांगूं, विठू? माझी आई जर जिवंत असती तर ती गोष्ट कांहीं आणखी असती, आई होती तेव्हां तर पेढे, बरफी, अंजीर, केळीं, नारळ, असें मला पुष्कळ मिळत होतें; तें गेले वर्षीं उमाकांतानें पाहिलें ह्मणून यंदा मज बरोबर त्यानें वांटा कबूल केला आहे; तर तूं पाहीनास मीं ह्यांत काय केलें बरें?

विठू — वाव्हा रे! भलाच धोरणाचा दिसतोस. आपण

वढेसे पेढे आणि पेशाभऱ्याचे जांब देणार, आणि लोकांला फार मिळालेलें असेल त्यांतून फसवून वांटा घेणार, ही चांगली मसलत; आणि तुझा तरी खरेपणा कोठें रडतो आहे? का एवढेंच तुला मिळालें, किंवा आणखी कांहीं अधिक आहे, हें कोणाला ठाऊक?

**नाना** — आईची शपथ! आपले डोळे जातील, बा, आपण जर खोटें बोलूं तर.

**विठू** — तुझें तुला काय चांगलें वाटत असेल तें वाटो. येवढ्याशा गोष्टी करितां धडाडां शपथा वाहतोस, कांहीं तरी भय बाळगीत जा. मजजवळ शपथ वाहावयाचें कांहीं प्रयोजन नाहीं. मी निऱ्हाईतपणें इतकेंच मात्र सांगतों कीं, असें करणें चांगलें नव्हे. तुला अगदीं थोडें मिळालें आणि उमाकांतास पुष्कळ मिळालें, ह्मणून त्यापासून वांटा घ्यावा, हा तुझा मनसुबा अगदीं वाईट आहे. मला त्यास कळविलें पाहिजे.

**नाना** — तूं खुशाल जाऊन पाहिजे तसें कळीव, त्याचा मी अगोदरच बंदोबस्त करून चुकलों; कालरात्रीं त्याजकडे जांब व पेढे पाठवून देऊन निरोपही पाठविला आहे

**विठू** — तर का आतां तूं त्यापासून खचीत वांटा घेशील?

# भातुकली.

असाच तुझा मनसबा आहे?

नाना — मजसारखें त्वां जर त्याशीं कबूल केलें असतें, आणि त्यांत तुझेंच जर हित असतें, तर मग, राजेश्री, आपण केसें केलें असतें?

विठू — माझें थोडें आणि त्याचें फार असें जर असतें, तर घेतलें नसतें, आणि ती कबूलात मोडून टाकिली असती.

नाना — हें शहाणपण तूं आपल्यापाशींच ठेव; आह्मीं तर प्रतिज्ञा करून करार केला आहे, तो फिरेल कसा? एकमे कांस जिंकावयाकरितांच लोक पैज करीत असतात, यंदां तो फसला, तर ह्याचें वदें पुढलेवर्षी कां घेईना, बापडा? माझी कांहीं ना नाहीं. तो आतां मला वांटा जर नदेईल तर मी त्याला लबाड ठरवीन. हातावर हात मारून शपथ के ल्यावर करारा प्रमाणें वांटा करून दिला पाहिजे.

विठू — मी गरीबच आहें, पण तूं ह्मणशील कीं शपथ वहा आणि माझ्या वस्ता घे, तर मी कधीं एवढ्याशा कामा करितां शपथ वाहणार नाहीं; जेव्हां तसेंच मोठें काम पडेल, आणि शपथेवरच येऊन ठेपेल, तेव्हां मग काय होईल तें होवो.

नाना — जा, वेडदुल्ली, तुला काय समजतें? लोक फारच व चना प्रमाणें चालतात, शपथ वाहिल्यावांचून विश्वास न

टतो काय?

विठू — अहाहा, शहाण्या! अरे जो खरा आहे त्याचें बोलणें शपथे सारखेंच आहे; तुला हें खरें भासत नसलें, तर मी तुला कधींच खरें मानणार नाहीं.

नाना — बरें, तर, उमाकांत वचना प्रमाणें चालेल, असें तुला वाटतें?

विठू — मी तर कांहीं मानबर नाहीं, परंतु तुला एक सांगून ठेवितों. तो वचना प्रमाणें जर न वागला, तर मी त्याचें तोंड कधीं पाहणार नाहीं. माझा पक्का निश्चय आहे कीं तो बोलल्या प्रमाणें वागेल. शपथ वाहण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

नाना — तें आतांच पुढें दिसून येईल. एखादा वेळ आपण जें बोललों तें त्याला कळीव तर खरें, आतां बोलल्या प्रमाणें वागावें.

विठू — मी त्याला एक गोष्ट देखील कळविणार नाहीं; अरे, जो खरा आहे त्याला कळविणें कशास पाहिजे.

नाना — हें पहा, त्याला सांग कीं, नाना ह्मणतो तूं फसलास.

विठू — काय रे! तोंच त्याला फसविलें आणखी त्याची थट्टा करतोस?

# भातुकली.

नाना — आणि मी जर फसलों असतों, तर तो माझी थट्टा केल्या वांचून उगीच राहता काय? आतां तो फसलाच आहे ह्मणून मला आनंद झाला. पाहिजे तर ह्याचें उटें त्यानें दुसरे वेळीं घ्यावें.

विठू — आतां ती गोष्ट सोडा, महाराज! हां, कोणती तरी एकवेळ अद्भुत घडती.

नाना — अरे, जा, नाहीं तर नाहीं; मी कोठें त्यावांचून कोरडें ग्या तों? आजच्या दिवसाचें पुष्कळ झालें. (तो बाहेर निघून जातो.)

विठू —( एकटाच आपणाशीं बोलतो.) नाना इतका दुष्ट आहे हें माझे मनांत आलें नव्हतें; ज्याचा वांटा होत नाहीं असें जर कांहीं त्यास मिळालें आहे, तर आपला उमाकांत फसला, त्यानें असें कशाला करावें? नाना तर महा एक, मत्स्याचे ता ळवेचें लोणी चाटणारा. पण तो उमाकांत इकडेसच आला.

---

## प्रवेश २

### उमाकांत आणि विठू.

उमा० — (पदरांत तो मिठाई घेऊन येतो.) अरे विठोबा, मी फा

र वेडेपणा केला, हें पहा.

विठू — तें तर मला अगोदरच समजलें आहे; त्वां रावजीस कां विचारलें नाहीं? आतां त्यांना जर कळलें तर मग कसें होईल? त्यांचे आज्ञेवांचून तुझ्यानें तरीं वांटा कसा देववेल?

उमा० — तें खरेंच, पण आतां कसें करावें?

विठू — आतां जसा करार असेल तसें करणें प्राप्त आहे, तुला असें करावयाचें काय प्रयोजन पडलें होतें?

उमा० — त्याला गेलेवर्षी भातुकली फार मिळाली होती, म्हणून मीं असें केलें; आतां, करायास गेलों एक आणि झालें एक.

विठू — मला तुझा मनसबा कळला; नानास फसवावयास पहात होतास, पण तूंच फसलास; जशी वासना तसें फळ. बरीच तुझी खोड निघाली. पुन्हा असें करशील कीं नाहीं!

उमा० — आतां मला हा फस मामला झाला खरा. मी आपली भातुकली घेऊन खुशाल असतों, तें सोडून मला कोणीकडून बुद्धि झाली कोणजाणे.

विठू — आतां जिवाला खाऊन काय होतें? झालें तें झालें. अर्धा वांटा तुझांस पुरे होणार नाहीं?

# भातुकली.

उमा०— तुला कसें दिसतें बरें? नानानें ह्यांत कांहीं लबाडी तर केली नसेल?

विठू — तो लबाडी करणार नाहीं, कां कीं तुमचें अगोदरच जें मिळालें तें त्यानें येऊन मला सांगितलें. आणि तुला सांगतों, माझा स्वभाव असा आहे, कोणी लबाड जरी असला तरी तो लबाड अशी खातरी होई पर्यंत मी त्याला खरा मानीत असतों.

उमा०— पण त्याचा बाप अगोदर त्याला खाऊ पुष्कळ देत असे, आणि आज एवढासाच दिला, त्याचें मला आश्चर्य वाटतें.

विठू — त्याची आई त्याला पहिल्यानें फार भातुकली देत असे, पण त्याचे बापानें तीबद्दल त्याला एक घोडा दिला.

उमा०— मला वाटतें, ज्याचा वांटा करावया जोगा आहे तें तो लपवून ठेवील, पण मला तर आपले भातुकलींतून देणें वाम आहे.

विठू — त्यानें खोटाई केली तर मग मी त्याला जवळ उभें राहूं देणार नाहीं.

उमा०— एकवेळ त्यानें लबाडी केली ह्मणजे मी करारांतून सुटलों, मग मी ही त्यास कांहीं देणार नाहीं.

# बाळमित्र.

विठू — तुमचे मनांतला भाव मी समजलों; पण, बाबा, तो एक लबाडीवर आला ह्मणून तुह्माला येतां येतें?

उमा० — मला जें मिळालें तें मीं त्यास कळविलें नाहीं तर त्याचे समजण्यांत कशानें येईल?

विठू — बरें, त्याचे एक ध्यानांत येणार नाहीं, पण तुमचें मनत र तुह्मांस ग्वाही देईल कीं नाहीं?

उमा० — वांटणी करावया जोगें रावजींनीं तर काहीं दिलें नाहीं, पण आत्याबाईनें वरीक दिलें आहे.

विठू — तुमचा करार का असा होता कीं बाप जें देईल तेवढ्या ची मात्र वांटणी करावी?

उमा० — नाहीं, नाहीं, असें नाहीं.

विठू — तर मग असें कां बोलतां?

उमा० — (अमळ खजील होऊन) आतां कसें करावें?

विठू — तें तर मीं तुह्मांला अगोदरच सांगितलें, कीं आपलें व चन संभाळावें.

उमा० — तें माझ्या मनांत असलें तर करीन, नाहीं तर माझ्या मा नेवर कोणीं सुरी ठेविली आहे?

विठू — वाहवा, तुह्मी मोठे शहाणे तर! प्राण गेला तरी वच नास मागें टकूं नये. तसें कराल तर नाना तुमची लबाडी लो

# भातुकली.

कांत प्रगट करील.

उमा०— मला लोकांशीं काय प्रयोजन पडलें आहे? पण सांग कीं मीं वचन मोडून कांहीं घाल घुसड केली तर मग त्याला काय समजणार आहे?

विठू— तें तर त्याला तेव्हांच कळेल; मीं त्यास सर्व कळविलें आहे.

उमा०— अरेरे, त्वां माझा भारी घात केला. विठू, आतां तुझी माझी गडी तुटली.

विठू— हें कायबरें, उमाकांतजी? मी होऊन कांहीं तुमचा घात केला नाहीं; तसें कांहीं करतों तर मजकडे दोष खरा. तो लबाड नाना. त्यानें युक्तीनेंच फुसलावून माझे तोंडांतून वर्तमान काढून घेतलें. त्यानें मला जर खरें विचारलें असतें तर मीं त्याला ठिकाणालागू दिला नसता. करार मोडणें आणि खोटें बोलणें सारखेंच आहे.

उमा०— तूं त्याचा मिलाफी दिसतोस; तूं कांहीं माझा स्नेही नव्हस.

विठू— असें ह्मटलें तर मर्जी तुमची; एरवीं मजवर तुमचे घरचीं माणसें अवघींच दया करितात, परंतु त्यांमध्यें तुमची मर्जी मला फार आवडते; तुह्मीं मला कितीजरी छि

# बाळमित्र.

डकारून टाकिलें तरी मी तुमची मैत्री कदापि सोडणार नाहीं. आणि कसेंही झालें तरी माझें सांगणें एकच पडेल.

उमा०—लोक माझ्या वस्ता घ्यावयास इच्छीत असतां तूं जर त्यांना नेऊं नदेतास तर तुझें मित्रत्व खरें होतें.

विठू—तुह्मी आपल्या हातानें लोकांस देऊं लागलां तेथें म्यां काय करावें? तुह्मीं अगोदर करार कां केला?

उमा०—त्याला जिंकावयाची आशा मला होती ह्मणून.

विठू—बरं, तुह्मी जर नानास जिंकतां तर त्यापासून वांटा घेतां कीं नाहीं?

उमा०—घेतल्यावांचून सोडतों काय?

विठू—तर मग तुह्मी कां आतां करारा प्रमाणें चालत नाहीं? चालणें फार सोपें आहे.

उमा०—सोपें कसें? आतां उगीचच्या उगीच अर्धा हिसा द्यावा लागतो कीं नाहीं?

विठू—पण, तुह्मांला त्यांतून अर्धा राहतो ना? तर तुह्मी असें समजा कीं मला इतकेंच मिळालें; अशा विचारानें मनाची समजूत करा, जर तुह्मी वचना प्रमाणें चाललां तर सर्वांत तुमची मोठाई प्रगट होईल; ही कीर्ति ऐकून लोक

तुह्मांवर प्रीति करतील. तुह्मांस फसविल्याची नानास लज्जा प्राप्त होईल; आणि तो तुमचा दबेल होऊन तुह्मांस पाहील तेव्हां त्याला मेल्याचा पाड चढेल, आणि तुह्मांस उजागरी होईल. ह्यासाठीं कसेंही करा पण सत्य भाषण कधीं सोडूं नका. मी मातबर असतों तर तुमचा सर्व तोटा भरून देतों.

उमा०— (डोळ्यांस अश्रु आणून त्यास आलिंगितो.) वाहवा, गड्या विठू, ही तुझी फार चांगली चाल आहे! आज पावेतों मी दुष्ट चालीनें चालत होतों, पण आजपासून चांगले चालीनें वागत जाईन. मला अन्यायमार्गाकडे लावणारे जे पदार्थ ते ओकारी सारिखे मानून त्यांकडे पाहणार देखील नाहीं. नानास करारा प्रमाणें वांटा देण्याविषयीं मीं कबूल केलें आहे, तो तूं आपल्या हातानेंच कर; आजपावेतों जो मी नीचपणानें वागलों त्याची क्षमाकर, मी तुझ्या प्रीतीचें पात्र होईन.

विठू— आतां तुमची बुद्धि चांगली झाली, तुह्मीं आपण आपणाला जिंकिलें, येणेंकरूनच जो तुह्मांस आनंद होईल तो त्या सर्वपदार्थापेक्षां चांगला आहे.

उमा०— मी आतांच जाऊन तें सर्व घेऊन येतों; नको, बा, अ

ह्यानें मला वाईट चालीची पुनः पुनः उकळी येऊं लागेल.

विठू— मला इतकें पक्कें समजतें कीं जरी उकळी आली तरी ह्याउपर चांगली येईल. (उमाकांत बाहेर जातो, विठू एकटाच आपणाशीं बोलतो.) उमाकांताची प्रतिष्ठा आज मीं वांचविली, येणेंकरून मला फार आनंद झाला; इतका त्याचे भातुकळीनें होताना. उमाकांताचा मूळ स्वभाव फार चांगला आहे हें मला ठाऊकच होतें. त्यास कोणी समजावून सांगणारा जर भेटला तर तो उत्तम रीतीनें वागेल, केवळ गैर वाटेनें जाणार नाहीं.

---

## प्रवेश ३

## विठू आणि उमाकांत.

उमा०—(भातुकलीची पांटी डोईवर घेऊन आंत येतो.) पांटी पडेल, विठू, मला उतरूं लाग; द्राक्षांचे घड खालीं पडून ना

# भातुकली.

साडी होईल, ह्मणून ते मीं आणले नाहींत; हे पहा, पेढे, बरफी, लाडू, आणिले आहेत; आतां ह्यांचे निमेनिम दोन वांटे कर; नाना करितां एक ठेव आणि एक मला दे.

विठू— छी, छी, असें करूं नये; त्याचे समक्ष वांटे करावे हें बरें; नाहींतर त्याचे मनांत येईल कीं कांहीं तरीं कृत्रिम केलें, मोठा वांटा आपण घेऊन गेला आणि लहान वांटा मला ठेविला.

उमा०— हीं पहा शिपायांचीं चित्रें कशीं खाशीं आहेत! हीं मी आपल्या खेळांत हारीनेंच उभीं करतों, तर मला किती आनंद वाटता!

विठू — हें खरें; पण आतां वांटेच केले पाहिजेत; मोंगलाई स्वार तूं घे आणि मराठी बारगीर नानास दे. आतां गंजिफा, बुदबळें, मोंगल्या —

उमा०— ह्यांचे तर वांटे होतच नाहींत.

विठू —हें खरें; पण एक जोड तुह्मी घ्या व एक नानास द्या; तुह्मी स्मरकारें कां टाकितां?

उमा०— काय सांगूं? आतां त्यास अशा नस्त्या फुकट घाव्या लागतात.

विठू — मी कशाला देऊं? तुह्मीच आपल्या हातानें घाल. पण

तुमचा निश्चय आहेना?

उमा॰ — तर मी आतां एक तुला सांगतों; नानाचा वांटाना नास लौकर देऊन टाक, कां कीं इतके माझे पदार्थ त्याचे हातीं जातात हें माझ्यानें पहावत नाहीं.

विठू — त्याच्या वांट्याकडे कशास पहातां पण, जसें मिळा लेंचनाहीं असें मानून मन मोठें करा. तुह्मी उत्तम चाली नें चालणार ना? मी नानास घेऊन येतों, आतां त्याची जर लबाडी तुह्मांस समजली तर त्यालाच मी फार वा ईट ह्मणेन. (तो बाहेर निघून जातो.)

उमा॰ —(आपणापाशींच बोलतो.) अरे, अरे, अरे, भारी नुक सानी झाली. इतका माझा नाश झाला तरी अशा करारां त नाना मला मूर्ख असें समजेल. कालरात्रीस त्यानें म जकडे आपली मिठाई पाठविली तेव्हांपासून त्याचे मनां त आनंद मावत नसेल.

# भातुकली.

## प्रवेश ४

### उमाकांत आणि जाह्नवी.

जान्ह०—(हारीनें मांडलेले पदार्थ पाहून बोलते.) कायरे करतोस उमाकांता? हे दोन वांटे कशाला केले? तर एकवांटा माझा काढला आहे कीं काय? तूं कुठला घ्यायाला? जर देशील तर, पहा, मी तुझी बटीक होईन.

उमा०— काय सांगूं, बाई? हा वांटा तुला जरीं दिला असतातरीं मला इतके श्रम वाटते ना; पण तसें कोठं आहे? हा एक वांटा दुसऱ्याचा आहे.

जाह्न०— दुसऱ्याचा कशाचा, आतां मी समजलें; ह्या वांट्या करितां विठूनें कांहीं नवीच कल्पना काढली असेल, आणि युक्तीनेंच तुला फुसलावून हा वांटा तो घेणार असेल; असेंच तो नेहमीं करीत असतो.

उमा०— असें बोलूं नको, जान्हवी, तो फार चांगला रीतीचा माणूस आहे, तसा मी असतों तर मला संतोष वाटता.

जाह्न०— तर मग असें कां करितोस?

उमा०— तुझ्या मनांत येईल कीं मीं लोभ धरला असेल, तर त्याची योग्य शिक्षा मला मिळाली; ह्यांतला निमे वांटा ना

# बाळमित्र.

नास द्यावा लागतो.

जाह्न० — मला देत नाहींस, आणि त्यासच कां देतोस?

उमा० — त्याचा नि माझा असा करार झाला आहे कीं द्यावर्षी दोघांस जें मिळेल तें दोघांनीं एके ठिकाणीं करून निमे निम वांटून घ्यावें, तों द्यावर्षी त्याला कांहींच मिळालें नाहीं.

जाह्न० — तर आतां त्याला कांहींच देऊं नये, कां कीं तुझ्या मनांत होतें त्या प्रमाणें त्याजकडून कांहींच झालें नाहीं.

उमा० — नानाचें नि माझें वचन झालें आहे; त्यानें आपलें वचना प्रमाणें केलें त्या अर्थी मला करणें प्राप्त आहे, नाहीं तर लोक मला लबाड ह्मणतील.

जाह्न० — हो हो, आतां माझ्या ध्यानांत आलें; हें ज्ञान त्या विठ्यानेंच तुला शिकविलें असेल; तो तर आमच्याच भाग्यावर वाढून वर्तून उलटें आह्मांस आज्ञेंत वागवितो, हें पाहून माझी बुद्धि थक्क झाली.

उमा० — पण, जाह्नवी, हें बोलणें विठूचें जर आहे तर मग ठीक ना?

जाह्न० — विठ्याचें बोलणें ठीक कशाचें? मी पैज मारितें कीं त्यानें नाना जवळून असा करार करून घेतला असेल कीं उमाकांतास फसवून जें काय मिळेल तें आपण उभयतां

# भातुकली.

वांटून घेऊं.

उमा० — छी, छी, छी, असें ह्मणूंनको; तो फार खरा आहे. विठू असें कधीं करणार नाहीं.

जान्ह० — काय सांगावें तुला? तुझ्या मतें मी जसा खरा तसेच सर्वलोक खरे असतील; पण तूं असें पहा, ह्यांत कांहीं न री विठूचें हित असेल ह्मणून तो तुला रुकार देतो.

उमा० — विठोबाचे मनांत कीं आपल्या मित्रानें खोटें बोलूं न ये, खरेपणानें वागावें, ह्मणजे मला संतोष होईल.

जान्ह० — अहाहा, अशानें तुला ते अजागळ ठरवितील, आणि फार हांसतील.

उमा० — पण, पहा, ह्यां करारा प्रमाणें हे वांटे करून ठेवले आहेत, आतां नाना येईल.

जान्ह० — तूं त्या नानाला वांटा नदेतां माघारा लावून दे. त्याचे मनांत कीं, मीं उमाकांतास फसविलें, तर तूंच त्याला फशीव, ह्मणजे मला फार आंनद होईल.

उमा० — असें काय ह्मणतेस, जान्हवी? येवढ्याशा भातुकलीकरितां मी चौघांत खालीं पाहूं काय?

जान्ह० — चौघांत खालीं न पहावया जोगी अशी युक्ति केली तर मग कसें?

उमा० — ती कशी काय बरें? ऐकूं दे.

जाह्न० — आतां मी रावजींस नाहीं तर आतेस असें सांगेन कीं, उमाकांतानें नानास अर्धा वांटा देऊं केला आहे; मग ते त्याच्या देखत तुला देऊं नको ह्मणून बोलतील ह्मणजे झालें; मग तुजकडे काय आहे? मीच आपल्यावर लबाडी घेईन.

उमा० — असें तूं करूं नको हो बाई.

जाह्न० — बरें तर, तुझ्या मनास येईल तसें कर; त्यालबाडास सारेंच कां देईनास, बापडें? माझें काय जातें? तेच तुला हांसतील. थांब तर, घाबरा होऊं नको, आतां मी रावजींना जाऊन सांगतें. (ती निघून जाते.)

उमा० — अगे जान्हवी, तूं माघारी ये, जाऊं नको, नयेशील तर मी तुजवर रागें भरेन. (तो तिला माघारें फिरवायास तिचे मागें जातो, परंतु ती कांहीं माघारी येत नाहीं.)



# भातुकली.

## अंक २.

### प्रवेश १.

### उमाकांत.

जान्हवी माझें न ऐकतां रावजी कडेस निघून गेली, हें बरेंच झालें, आतां रावजी किंवा आत्याबाई देऊं नको असें जर मला ह्मणतील तर मी देणार नाहीं. ही कल्पना मला अगोदरच जर सुचली असती तर बरें होतें. म्यां पक्का विचार न करितां हा करार केला, ह्यांत ठीक झालें नाहीं. आतां माझें मन दुग्ध्यांत पडलें, ह्यावेळीं विठोबा असता तर बरें होतें.

---

### प्रवेश २

### विठू आणि उमाकांत.

विठू— आतां नाना आपल्या बापास पुसून येईल, तुह्मी हे सर्व पदार्थ त्याला आदरानें द्या, तुह्मीं आपले मनांत खेद आणला हें त्यास दाखवूं नका. पण माझे मनांत त्या विषयीं कांहीं संशय आहे, त्यानें कांहीं दगाबाजी केलीमदि

सतें. कशावरून? जेव्हां मी त्याला लावून बोललों तेव्हां तो सांगण्यांत अंमळ घाबरा झाला.

उमा० — तो मला फसवावयास पाहतो हें मी पुरतें जाणतों त री बाहेर आनंद दाखविला पाहिजे.

विठू — संतोषित असावें असें एक कारण आहे, पण तुम्ही आ- पला खरेपणा सोडूं नका.

उमा० — बरें तर, मी नाना देखत हर्षयुक्त राहीन, पण जान्हवी नें एक युक्ति सांगितली ती तुझे ध्यानास येईल तर सांग तों. तिचें म्हणणें कीं हें वर्तमान रावजींपाशीं जाऊन सांगा वें, म्हणजे सहजच रावजी नको असें म्हणतील, मग काम झालें.

विठू — तें खरें; पण अशानें तुमचे अंतःकरणास उजागरी क शी होईल?

उमा० — येवढी गोष्ट खरी. जेव्हां ती असें बोलत होती तेव्हां च तिचें बोलणें माझे मनांत डाचूं लागलें, आणि हें रावजीं पाशीं सांगावयाचें देखील लाजिरवाणें वाटतें.

विठू — तर तुम्ही कल्पना उगीच कशाला काढतां? जें बोल लां तें बोललां; त्यांत जी मजा आहे ती अशा कुकल्पनांत ना हीं; दुसऱ्याच्या पदार्थांनीं म्हणजे आनंद होतो असें नाहीं.

ह्याकरितां ज्याचें त्यास पोहोंचलें ह्मणजे आपला जीव भांड्यांत पडेल. मी आणखी एक मौज करीन, पण तुह्मांस माझे मैत्रीची गरज असली तर तुह्मी खरे मार्गानें चाला, ह्मणजे आतांपेक्षां मैत्री अधिक वाढेल.

उमा० — बरें तर, मी तुझ्याच मसलतीनें चालतों; पण उगा, उगा, तो नाना आला.



## प्रवेश ३

### नाना, उमाकांत, आणि विठू.

नाना — (अमळ घाबरल्या सारखा होऊन.) मला विठोबानें निरोप सांगितला कीं तुला उमाकांतांनीं बोलाविलें आहे, पण हें कांहीं माझ्या जिवाला गोड वाटत नाहीं.

उमा० — तुझ्या जिवाला कां गोड वाटत नाहीं?

नाना — मला अगदींच थोडकें मिळालें ह्मणून.

उमा० — त्याची काय चिंता आहे? हा तर डाव आहे.

विठू — तुह्मांला पहिल्यानें एक थोडें मिळालें पण आतां तर उमाकांताच्या भातुकलींतून निमेनिम वांटा मिळेल, मग,

हो, का तुह्मी चिंता करतां? हे तुमचे मित्र तुह्मांस कांहीं कमी पडूं देणार नाहींत. ते आपल्या वचना प्रमाणें फार संतोषानें वागतात.

उमा० — पहा, मी जें करितों तें मनापासून संतोषानें करितों. (नानाचा हात धरून वांट्यांकडे नेतो.) मला जें काय मिळालें त्याची वांटणी म्यां बरोबर केली आहे; तुह्मीं असंतोषी नव्हावें ह्मणून मी तुमचे वांटणीकडे कांहीं अधिक पदार्थ ठेविले आहेत, पहा.

विठू — बुदबळें गंजिफा ह्यांचे निमेनिम वांटे होत नाहींत, त्यास करारा प्रमाणें उमाकांताची मर्जी असल्यास त्यानें दोन्ही ठेवावीं; पण ते तुह्मांस करारापेक्षां अधिक देणार आहेत.

उमा० — ह्या पुतळ्यांचे वांटे बरोबर करतां आले नाहींत ह्यासाठीं ह्या तुह्मीच घ्या.

नाना — नको, नको, तुमचे बोलण्यानेंच मी तृप्त झालों.

उमा० — पण मी अझून तृप्त झालों नाहीं. ह्या खेरीज दिवाणखान्यांत द्राक्षांचे घड राहिले आहेत, त्यांतला निमे वांटा माझा आहे, पण मी ते सर्व तुह्मांस देतों.

नाना — नको, उमाकांता, तें कांहीं नको.

# भातुकली.

विठू — जा हो, उमाकांतजी, तुह्मी तेही इकडे घेऊन या. (उमाकांत बाहेर जातो.) वाहवा हो, नाना, उमाकांत तुमच्या बोलीपेक्षां तुह्मांस अधिक देत असतां तुह्मी कां घेत नाहीं? एखादा दुसरा पोर असता तर कशाचा करार नी कशाचा वांटा असें ह्मणून कांहींच न देता.

नाना — वास्तवीक बोलतोस, पण मला फार लाज वाटते.

विठू — लाज वाटावयाचें कांहीं कारण दिसत नाहीं. तुह्मांस अगदीं थोडें मिळालें त्यांत कांहीं तुमचा अन्याय आहे काय?

नाना — (अमळ घाबरल्या सारखा होऊन तोंड मुरडतो.) गरीबरे गरीब उमाकांत.

विठू — कां? त्यास गरीबरे गरीब असें कां ह्मणतां? ते खरेपणानें वागून सुख पावतात, तसे तुह्मी ही हा वांटा घेऊन सुख पावा.

उमा० — (द्राक्षांचे घड घेऊन येतो.) दमखा, हा आलों, हे सर्व घड तुह्मांसच देतों, मला माझा वांटा नको.

नाना — (एक्या हातानें घड आपल्या पासून दूर सारितो, दुसऱ्या हातानें आपलें तोंड झांकितो.) नको मला, नको, उमाकांता, (उमाकांत आणि विठू त्याचे तोंडाकडे टकमकां पाहतात.)

# बाळमित्र.

उमा०— तूं इतका श्रमी कां होतोस नाना?

नाना— मला इतकें श्रमी होण्याचें कारण हेंच कीं तुह्मांपुढें एक लबाड पुरुष उभा आहे, तो कोणता ह्मणाल तर हा मीच; कां तर म्यां तुह्मांस ठकविलें.

उमा०— त्वां मला ठकविलें! असें कसें घडेल? तुह्मी आह्मी शेजारी, त्यांत बाळपणा पासून तुझी आणि माझी मैत्री. तशीच तुझ्या बापाची आणि माझ्या बापाची ही जिवलग मैत्री आहे, अशा ठिकाणीं ही शंका कशास पाहिजे, ह्याविषयीं माझे मनांत कांहीं नाहीं.

नाना— ह्याच कारणास्तव हा माझा दोष आहे, (तो उमाकांताचा हात धरितो.) म्यां तुह्मांपाशीं फारच लबाडी केली. माझे बापानें मला कांहीं खाऊ दिला नाहीं खरा, पण मिठाईबद्दल ह्या तीन मोहरा दिल्या आहेत. तुह्मीं मन इतकें उदार केलें आणि मीं पहा कसें तुह्मांस ठकविलें तें; ह्यामुळें माझ्या जिवास फार खातें; मी पस्ताई पडल्या सारखा झालों, तर आतां मी मोहरांचा वांटा तुह्मास देतों. तुह्मी मजवर दया करा; माझ्या लबाडीची क्षमा करा, आणि मित्रत्वांत अंतर पडूं देऊं नका.

उमा०— (त्यास आलिंगून ह्मणतो.) माझे जिवलग मित्रा, त्वां

# भातुकली.

कुचाल सोडून उत्तम चाल धरली येवढ्यानेंच मी फार संतुष्ट झालों. तर मला त्या द्रव्याची कांहीं गरज नाहीं.



## प्रवेश ४

### उमाकांत, जान्हवी, विठू, नाना, आणि उम्या.

जान्ह० — विठूनें रावजींकडे चलावें.

विठू — अमळ दमरवा, नाहींतर—

जान्ह० — नाहींतर, नाहींतर, काय करतोस? तूं माझे भावाची भातुकली फुसलावून घ्यावयाला पाहतोस, तर काय चिंता आहे? चल लौकर, तुला रावजी बोलावितात. ते का तुजसाठीं खोळंबतील? (ती त्याचा हात धरून आपले बापाकडे ओढून नेते.)

उमा० — (नानाचा हात धरून ह्मणतो.) तूं येवढे प्रमाणीकपणानें वागशील असें मला वाटत नव्हतें.

नाना — मजपासून तुला कांहीं नमिळतां तूं अर्धावांटा घ्यावयास सिद्ध झालास हें पाहून मला आपली लबाडी सोडणें भाग झालें.

उमा०—तूं इतकें माझे औदार्याचें वर्णन करूं नको; हा तुला वांटा द्यावा असें माझे मनांत नव्हतें; पण विठोबानें मला युक्तीनेंच समजावून सांगून वांटा करविला. तो जर कांहीं न बोलता तर मग मीं वांटा कधींच दिला नसता.

नाना—आणि म्यां ही आपली खोटाई सिद्धीस नेली नाहीं ह्याचें कारण तोच आहे; मलाही त्यानेंच शिकविलें, प्रथम मी फार नीचपणानें वागत होतों, पण इकडे येऊन वतां जी उदारपणानें वांटणी केली ती पाहून—

उमा०—नाहीं, नाहीं, ती मीं कांहीं वांटणी केली नाहीं, विठोबानेंच केली; आणि नाना, मला कसें भुरकें पडलें कायजणूं, पहिल्यानें मी ज्या पदार्थांवर प्रीति ठेवीत होतों, तेच पदार्थ तुला देण्याविषयीं मला संतोष वाटूं लागला, तुझे वांट्यांत मी आपले खुशीनें कितीएक पदार्थ अधिक ठेविले आहेत.

नाना—सर्व तुझें तूंच ठेव, मी कांहीं तें घेणार नाहीं; जर हें घ्यावें अशी माझी बुद्धि असती तर मला तुझे तोंडाकडे पाहण्या पुरतें देखील धैर्य राहिलें नसतें. अन्यायकर्म केल्यानें अंतःकरणांत किती दुःख व पश्चात्ताप होतो हें मला पूर्वीं ठावकें नव्हतें.

# भातुकली.

उमा० — माझ्या देखील चित्तांत फार दुःख झालें असतें, पण तसें न होण्याचें कारण तो विठोबाच; तो फार भला व प्रमाणीक आहे. बरें, नाना, त्यानें असें तर ह्मटलें नाहीं, कीं उमाकांताकडून तुला निमे वांटा देवितों, मग तूं मला त्यांतलाही स्सा दे? पण असें त्यानें मागितलें नसेल.

नाना — छिः छिः तो असें करील हें तुझ्या मनांत तरी कसें आलें?

उमा० — माझ्या मनांत नकतें, माझ्या बहिणीचे मनांत हेंवा येऊन तिनें मला असें भासविलें.

नाना — तुला काय काय मिळालें हें वर्तमान जेव्हां मी त्यास विचारूं लागलों, तेव्हां तो कांहीं नाकासतूर लागूं देईना, पण मीं हळूच युक्तीच्या पोटीं विचारून सर्व काढून घेतलें; त्यानें तुजविषयीं फार खातरजमेच्या गोष्टी सांगितल्या. तो फार चांगला मनुष्य आहे, आजपासून मी त्याची मैत्री बाळगीन, आणि मी आपल्या तीन मोहरा व वांटा त्यास देईन.

उमा० — तूं नको देऊं; त्याचा उपकार मीच फेडीन, तुझ्या मोहरा तूंच ठेव, व माझा ही अर्धा वांटा तूं घे.

नाना — तें मी आतां कधीं कबूल करणार नाहीं, जें काय वां

टायाचें आहे तें त्यासच द्यावें हें बरें.

**उमा॰**— चलतर, तूं ह्मणतोस तसेंच कां होईना? आतां आपण असें करूं, हे सर्व पदार्थ त्याचे आईचे जवळ पोहांचते करावे, ह्मणजे तो घरीं गेल्यावर पाहील, आणि त्यास फार आनंद होईल.

**नाना॰**— पण तो इतक्यांत आला तर आपणाला कांहींच करूं देणार नाहीं; ह्याकरितां लौकर केलें पाहिजे.

**उमा॰**— मी उम्यास हाक मारून आणितों, इतक्यांत तूं हें सर्व एक्या टोपलींत भरून ठेव, मी हा आतांच येतों. (तो बाहेर जातो.)

**नाना**— (तें सारें एकटाच टोपलींत भरतो.) अहा तो विठोबा काय चांगला आहे, त्यास आह्मी आतां संतोषित करूं. काल कोणही मला सांगता कीं दुसऱ्याचें घ्यावें त्यापेक्षां दुसऱ्यास द्यावें ह्यांत सुख आहे तर मी ती गोष्ट खरी मानली नसती; पण आतां बरीक माझी खातरी झाली. माझ्या बापासारखे मजजवळ रुपये असते तर ह्या विठोबावर मी भारी उपकार करितों. मला आणखी एक खचीत वाटतें कीं द्रव्यवान असण्यापेक्षां नीतिमान असावें ह्यांत फार सुख आहे.

# भातुकली.

उमा०—( उम्यास घेऊन येतो आणि आंत आणून दारास कडी लावितो.) उम्या, ही टोपली घेऊन विठोबाचे आईपाशीं पोहोंचती कर.

उम्या— होय महाराज, हें काम मी फार आनंदानें करीन, तो मुलगा चांगला आहे, ह्मणून आमचें मन त्याकडे भारी लागतें.

उमा०— (उम्यास ह्मणतो.) ऊठ आतां, लौकर घेऊन जा, पण रस्त्यांत कोठें इकडे तिकडे गमूं नको हो, खबरदार, जर का ह्यांतून कांहीं पडलें झडलें तर तूं जाण.

नाना— दमखा, उम्या; ह्या तीन मोहरा मी बुदबळांचे पटांत घालून देतों.

विठू—( बाहेर उभा राहून बोलतो.) दार उघडा हो, मी विठू आलों आहें.

नाना— आला रे आला विठोबा. उम्या, ह्या मोहरा घे, आणि टोपलींत ठेव. आमची गटपट विठोबास कळूं देऊं नको, तूं हळूच दाराच्या आड लप, आणि तो आंत आला ह्मणजे भरकर बाहेर निघून जा.

विठू— काय उमाकांत, तुह्मी मला कवाड उघडीत नाहीं? पण आगून गावजी येत आहेत हो.

# बाळमित्र.

उमा० — (नानास विचारतो.) आतां मी दार उघडूं?

नाना — हो, आतां उघडीसना कां?

(उम्या दाराच्या आड उभा राहतो.)

उमा० व नाना — (दार उघडून विठूस आंत घेतात.) आह्मी कांहीं कामांत होतों ह्मणून उशीर लागला, तर राग येऊं देऊं नको. (विठूची दृष्टि उम्याकडे नजावी ह्मणून उमा कांत विठूचा हात धरून त्याची पाठ उम्याकडे करतो.)

विठू — तुह्मी कोणत्या कामांत होतां बरें? (इकडे तिकडे पाहतो, नाना उम्यास खूण करतो तें पाहून ह्मणतो.) कशाची हो खूण करितां? अहो ह्या टोपलींत काय आहे? (उम्याकडे जाऊन टोपली उघडून पाहतो.)

उम्या — नका नका, हें कांहीं न्यारेंच गाणें आहे.

विठू — न्यारें गाणें तें काय आहे पाहूं?

उम्या — हें घरीं गेल्यावर तुह्मांस कळेल.

विठू — काय हो? तुह्मी माझे स्नेही आणि मला कांहींच कळूं देत नाहीं? एकून मशीं चोरतां?

उमा० — आह्मी तुह्याशीं कशाला चोरूं? आतां तुझा उपकार फेडावा असें आमचे मनांत आहे. (ती टोपली घेऊन त्याज पुढें ठेवितो) हें सर्व तुझें आहे.

नाना—(त्याजकडे मोहरा करतो.) ह्याही घे. (विठू नानाचा हात एकीकडे करतो, ह्मणून नाना त्या मोहरा टोपलींत टाकितो.)

विठू— असें काय हो करितां? हें मी कद्धीं घेणार नाहीं.

उमा०— आतां ती गोष्ट राहूं द्या महाराज. तुह्मीच घ्याल.

नाना— हें घेच, एवढा आह्मांवर उपकार कर.

विठू— (त्याचा हात धरितो.) मी आनंदामुळें घाबरा झालों, पण घेणार नाहींच.

---

## प्रवेश ५

### माधवराव, उमाकांत, नाना, विठू.

माध०—(अगोदरच त्या मुलांची दृष्ट चुकावून आंत येतो आणि आपणास तें अगदींच अनश्रुत असें सोंग दाखवितो.) तुह्मीं कशाचीरे वांटा वांट मांडली आहे ही?

उमा०— अहो रावजी, तुह्मी ह्यास दोन गोष्टी समजावून सांगा, आणि ह्याचा आमचा तंटा तोडा. विठूनें आह्मांवर फार उप

कार केले, त्यानें आह्मांस सुरीतीनें वागावयास शिकविलें.

नाना — आणि माझी ही ह्यानें प्रतिष्ठा वांचविली.

उमा० — आतां आह्मी ह्याचा उपकार फेडूं ह्मणतों, पण हा फेडूं देत नाहीं.

माध० — तुह्मीं मला फार समाधान पावविलें, ह्यास्तव मीच ह्याचा बंदोबस्त करितों. (नाना व उमाकांत ह्यांस ह्मणतो.) तुह्मी आपापलाले वांटे मजपुढें ठेवा, ह्यानें तुह्मांवर जे उपकार केले आहेत ते मी फेडीन.

नाना — विठोबास माझ्या तीन मोहरा घ्यावयाची आज्ञा द्या.

विठ — नका, नका, रावजी, त्याचें तुह्मी कांहीं ऐकूं नका.

माध० — मी तुला ह्याचें हें घ्यावयास सांगतों, मुकाट्यानें घे; जर न घेशील तर तुझ्या आंगी गर्व भारी असें स्पष्ट दिसण्यांत येईल. जिणें तुलाही चांगली चाल शिकविली त्या तुझ्या आईकडे हें मी पाठवीन.

विठ — तुह्मी मला असें सांगतां ह्मणून मी घेईन, आणि हें पाहून माझे आईस ही भारी आनंद होईल. परंतु मजवर एवढा एक उपकार करा कीं उमाकांताकडून त्याचें त्यास ठेववा.

मा० — बरें तर हें दोघांस वांटून देतों, आणि त्याबद्दल तुला मी

## भातुकली.

दोन मोहरा देतों. उमाकांता, तूं विठोबाच्या ह्मटल्या प्रमाणें वागलास, ह्मणून मी तुलाही कांहीं देईन.

---

## लढाई.

शेख महंमद ह्मणून लढाऊ गलबताचा कोणी नामांकित सरदार वयातीत होता; त्यानें समुद्रांतील लढाया वगैरे जिवावरचीं संकटें फार अनुभविलीं होतीं; शेवटीं तितक्याही आधातांतून पार पडून आपल्या कुटुंबांत सुरक्षित येऊन पोहोंचला; नंतर कुटुंबाचीं माणसें पाहून आनंदाचे भरानें त्यास गहिंवर आला. त्या काळीं त्याचे मुलांनीं गलबत तुफानांत सांपडल्याचें व पाण्यांत लढाई कसकशी झाली ह्याचें सर्व वर्तमान विचारिलें. तेव्हां त्यानें लढाईचें वर्तमान व समुद्रांत जीं जीं घोर संकटें त्यास प्राप्त झालीं होतीं तीं सविस्तर सांगितली, व देशो देशांतील चाली व स्वरें दुःखें इत्यादि ज्या ज्या ठिकाणीं जें जें पाहिलें होतें तेंही सर्व सांगितलें. ती त्या गोष्टी

# बाळमित्र.

सांगत असतां असा कांहीं चमत्कार झाला, कीं त्यागोष्टी ऐकतां ऐकतां त्याच्या मुलीचा कंठ दाटून येई, आणि तिच्या नेत्रां वाटें खळखळां अश्रुपात चालत, आणि ती श्वासोच्छ्वास टाकीत उगीच राही; परंतु त्याचा मुलगा रुस्तुमनामें होता त्यास आवेश येई, तेणें करून त्याच्या बाह्या फुरफुरत व भोंवया चढून जात. जसें कोणी ह्मणेल कीं, हा कोणी मोठा लढाई खेळणारा पुरातन शूर आहे. मधून मधून जेव्हां लढाईच्या गोष्टी निघत तेव्हां त्यास अधिक अधिक शौर्याचा आवेश येई. मग आपल्या बापास ह्मणाला, मी जर तुह्मांइतका मोठा असतों तर लढाई खेळावयास फार आनंदानें निघतों, मग मला ही वाहवा मिळती.

शेरव०—तूं अशा नाशकारक आणि दुःखकारक कामाची इच्छा कां करितोस? तें तुला माहीत तरी आहे?

रुस्तु०— पण, बाबा, तूं मला शिपाई करणार आहेस ना?

शेरव०— होय, तूं ह्मणतोस ती गोष्ट खरीच.

रुस्तु०— पण शिपायाची चहा तरी पुष्कळ आहे?

शेरव०— चहा आहे खरी, हें मी जाणतों, पण असें आहे; जसें मनुष्याचें शरीर तसाच राजाचा मुल्रव, ह्या दोहोंला आंतल्या बाहेरल्या रोगांची पीडा सारखीच आहे. पहा! पोटांत कांहीं रोग उत्पन्न नव्हावा व बाहेरून थंडीवारा किंवा घा

## लढाई.

व गळूं वगैरे ह्यांकडून शरीराचा नाश न व्हावा ह्मणून वैद्या
चा आश्रय करावा लागतो, त्याच न्यायें करून मुलखाला आं
तील रोग, ह्मणजे फंद फितूर, आणि बाहेरील रोग, ह्मणजे
शत्रु, ह्यांच्या बंदोबस्ता करितां शिपाई ठेवावे लागतात.

रुस्त०— तर मग, बाबा, शिपाईलोकांची गरज फार आहे. अ
सें आहे तर, मी शिपाई होईन ही माझी इच्छा वाईट आहे
काय?

शेख०— पण वैद्याची वासना खोटी असते, सर्वदा लोकांस रोग
राई असावी ह्मणजे आपणास पैसे मिळतील ही इच्छा नेक
रीत असतात, तर हें बरें कीं काय?

रुस्त०— छी, छी, तें तर अगदीं वाईट.

शेख०— तर तशीच शिपाईलोकांची इच्छा असते, ते ह्मणतात कीं
कोठें तरीं लढाई असावी, ह्मणजे आमचा रोजगार पिक
ला, मग तिकडे कांहीं असो, ह्यास्तव मी त्यांची स्तुति कर
णार नाहीं.

रुस्त०— तरीं पर, बाबा, राजास लढाईचें अगत्य आहे ना?

शेख०— कशास पाहिजे? काय कारण?

रुस्तु०— राजाची जशी जशी लढाईंत फत्ते होत जाईल तस
तसा आनंद आणि हितच होईल.

शेख०— कधीं कधीं लढाईची गरज असली तर असो, पण दुसऱ्याचा मुलूख चांगला पाहिला ह्मणून तो घ्यावयास जर राजा इच्छील तर तें तुला नीट वाटेल कीं काय? आतां घटकाभर आपल्या भोंताली पुष्कळ गांव आहेत, त्यांचे अधिकारीही वेगळाले आहेत, तेव्हां मी आपले गांवांतील लोक मिळवून ते चांगले गांव ह्मणून जर मी घ्यावयास जाईन तर मग तेही आपले लोक घेऊन लढाईस उभे राहतील, आणि कदाचित् ते माझे घ्यावयास जरी यत्न करतील तरी तें चांगलें कीं काय?

रुस्त०— त्यांनीं तसें केलें तर ह्यांत आश्चर्य काय?

शेख०— असें झालें असतां मग मला किती दुःख उत्पन्न होईल बरें? मला आपला माल सांभाळावयास किती खबरदारी ठेविली पाहिजे? शेवटीं त्याचा परिणाम कसा तो पहा; जर मी जिंतलों तर ते सर्व मला एखादे वेळेस पेंचांत आणावयास जपत राहतील, बरें, मी जर हरलों तर ते सर्व मिळून मला लुटून घेतील.

रुस्त०— लढाईचे अगोदर अशी फौज तयार करून ठेवावी कीं आपण प्रतिज्ञेनें शत्रूस जिंकूच जिंकू.

शेख०— तूं ह्मणतोस तें खरें, पण शत्रूनेंच मजपेक्षां चांगली फौ

# लढाई.

ज बाळगून उलटी माझीच दुर्दशा केली तर मग कसें हो
ईल? आतां मींच तुला बोलण्यांत थकविलें. तुझ्या बोल
ण्या प्रमाणें जरी माझा जय होऊन मुलूख वाढला तरी तुझें
बोलणें माझे नाशास कारण होईलच.

रुस्त०— असें कसें ह्मणतां, बाबा? जसा जसा मुलूख वाढेल, त
सें तसें द्रव्यही अधिक मिळेल.

शेख०— तसें नव्हे, बेटा; मुलखाचा मोठेपणा किंवा लहानपणा
हा कांहीं द्रव्य अधिक मिळण्यास कारण नव्हे. त्याचें मुख्य
कारण मुलखाची आबादानी राखणें हें आहे.

रुस्तु०— शत्रूपासून घेतलेल्या मुलखाची लावणी करतां येणार
नाहीं कीं काय? लावणी करावयास काय कठीण आहे?

शेख०— कठीण नाहीं खरें, पण लढाईच्याभयानें कांहीं लोक प
रागंदा होतील, व बखेड्यामुळें कितीएक परमुलखांत उठू
न जातील. मग मुलखाची लावणी होऊन आबादानी क
शी राहील? आणि बाकीचे जे रयतलोक शेतकरी रह
तील त्यांपासून खबरदारी ठेवणारे लोकांच्या खर्चासाठीं
वसूल अधिक घ्यावा लागेल; ह्यामुळें कुणब्यांचें बैलढोर
सारें विकावें लागेल, तेव्हां त्रासून त्यांस दुसऱ्या मुलखांत
जाणें प्राप्त पडेल; आणि जुलमामुळें हें राज्य कधीं बुडेल अ

सें देवापाशीं ते मागतील, व जागीं जागीं बंडें मानतील.

रुस्तु०— खरी गोष्ट, बाबा, असें म्यां फार वेळां बखरींत वाचलें आहे.

शेख०— तर, पहा, मज भोंवताली जो राजाचा मुलूख आहे त्यां तील लोकांवर कांहीं जुलूम नकरितां सवदागिरी अशी क रीन कीं, जेणें करून त्यांचें व माझें हित होईल. तंट्या बखे ड्यांत व फंदफितूरांत नपडतां जपून वागलों, व व्यापार वा ढवून सर्वलोक सुखी केले तर रावपणाचे वडाईनें जें सु ख मिळायाचें त्यापेक्षां अशा कामानें अधिक मिळणार न हीं कीं काय? राजा फार वाढू लागला तर शक्तिहीन होतो कारण मुलखाची खराबी फार होते.

रुस्तु०— पण, बाबा, तुह्मीं आतांच सांगितलें कीं, राजाचा मुलूख व शरीर एकसारखेंच आहे, तर जसजसें शरी र वाढतें तसतशी शक्ति अधिक येती, ह्या न्यायानें जसा जसा मुलूख वाढेल तसतसा राजाही शक्तिमान् व्हावा कीं नाहीं?

शेख०— तूं ह्मणतोस तें ठीकच आहे. शरीराप्रमाणें दिवसें दिवस राजा वाढत गेला तर बरेंच आहे, परंतु तसें हो नाहीं.

# लढाई.

रुस्तु॰— मला ह्या शेवटल्या गोष्टीचा अर्थ उघड करून सांगा.

शेख॰— मी आतां एके दाखल्यावरून तुझ्या मनांत भरवितों, ऐक. एक मुलगा व एक मुलगी ह्या दोघांमध्यें कशी गोष्ट झाली ती पहा!

रुस्तु॰— येथें मुलगा मुलगीचें काय कारण आहे?

शेख॰— अरे, दृष्टांता साठीं सांगतों. एक्या बायकोस एक मुलगा व एक मुलगी होती; त्यांत मुलगी अमळ लहान होती व मुलगा अमळ मोठा होता; त्यांचे आईनें एके दिवशीं दोघांस भाकर सारखीच दिली, तेव्हां त्या मुलानें मुलीची भाकर हिसकावून घेतली. हा अन्याय त्यानें कां केला बरें!

रुस्तु॰— त्याचे मनांत आलें असेल कीं, बहीण मजपेक्षां लहान, असें असतां हिला माझे इतकी भाकर कशी दिली, म्हणून त्यास वाईट वाटलें असेल.

शेख॰— तसेच लढाई करणारे जे लोक आहेत ते सर्व अशीच कारणें शोधीत असतात. पहा त्या मुलाचे आईनें त्यास त्याच्या अहारा प्रमाणें बेताची भाकर दिली असतां त्यानें जबरदस्तीनें तिची भाकर हिरावून घेऊन अधिक खाल्ली, तेव्हां त्या भाकरीच्या योगानें त्याचें बळ अधिक व्हावें कीं नाहीं! राजास अधिक मुलूख मिळाला असतां त्याचें बळ अधिक व्हावें

खरें, परंतु जसें त्या पोरानें प्रमाणापेक्षां अधिक खाल्लें असतां तेणें करून त्याचें बळ अधिक नहोतां अजीर्ण होऊन मोडशी झाली, तशीच राजाची अवस्था होत असते. जर तो आपलीच भाकर खाऊन राहता तर त्याची प्रकृति बरी असती. आतां तशा दुरवस्थेंत त्याची बहीण सूड घेण्याकरितां जर त्याची भाकर घेती तर आपली भाकर सांभाळ्या पुरतें त्याचे आंगीं सामर्थ्य नसतें.

रुस्तु०— पण त्याचे मनांत असें येतें कीं, अगोदर म्यां हिची भाकर घेतली आहे तेव्हां मी ही आतां संतोषानें हीस घेऊं देईन.

शोरब०— असें पहा, ज्यांस लोभ आहे ते अशा नीतीनें कधींही वागणार नाहींत; कारण कीं त्यांचे मनांत जर अशी नीति येती तर ते प्रथमच लढाईची मसलत नकरिते. मला असें वाटतें, कीं लढाईचें काम फार वाईट आहे. असें राजाचे मनांत सदा सर्वदा वागावयाविषयीं एक उपाय हाच, कीं ज्यांस पति नाहीं अशा स्त्रिया, व ज्यांस बाप नाहीं ह्या मुळें अन्नाकरितां भयां भयां करीत हिंडतात अशीं पोरें, ह्यांचीं अनेक प्रकारचीं दुःखें त्यांचे अंतःकरणांत निरंतर राहिलीं पाहिजेत; ह्मणजे निर्दय पापी पुरुषांची मस

# लढाई.

लत राजा ऐकणार नाहीं. नाहीं तर त्यांच्या मसलतीनें हजारों गरीबगुरीब फुकट चेंगरले जातात. जे उत्तम राजे आहेत ते सर्वदा प्रजेच्या हिताकडे लक्ष्य ठेवतात, व त्यांचें मन प्रजा आबाद असावी इकडे असतें. मुलखाची आबादी होण्यास फार दिवस लागतात, पण नाश होण्यास एक क्षण देखील नको. नाश झाला असतां मुलखांतलीं शेतें पडतात, व कोणास रोजगार राहत नाहीं, ह्यामुळें व्यापार अगदीं बुडतो. असें होतां होतां शेवटीं राजाही बुडून जातो.

रुस्त०—पण, बाबा, म्यां असें ऐकिलें आहे कीं लढाईच्या प्रसंगीं लोकांस द्रव्य पुष्कळ मिळतें.

शेख०—द्रव्य पुष्कळ मिळतें ह्मणूनच भारी नाश होतो. द्रव्याचे मदानें ते लोक अविचारास प्रवृत्त होऊन पुढें कसें होईल ह्याचें भान न ठेवितां त्या द्रव्याचे योगानें सर्वदा ख्याली खुशालींत निमग्न होतात, तें पाहून जे अल्प द्रव्यवान् आहेत त्यांचेही मनांत तसेंच करावें असें येतें. मग ते अशा दुराचरणानें आपलें द्रव्य थोडक्याच दिवसांत उधळून टाकितात. तेव्हां अमळसे त्यांचे डोळे उघडूं लागले ह्मणजे जें शेष राहिलें असेल द्रव्य तें अधिक वाढवावें ह्याबुद्धीनें कांहीं

एक अचाट कल्पना काढून साहस कर्मे करावयास जातात; शेवटीं तीच कल्पना त्यांस सफाई बुडवून टाकिते. अशीही देखतभूल पाहून इतरलोक मनांत समजतात कीं, त्यांच्या करण्यांत कांहीं चूक पडली ह्मणून ते बुडाले; आह्मी चांगल्या हातोटीनें करूं, असें ह्मणून ते आपण त्याप्रमाणें करावयास जातात; शेवटीं त्यांचीही गति तीच होते. जसे हातांत मशाल घेऊन पाण्यांत उडी घालणारे तेकधींच बुडाल्यावांचून राहत नाहींत, तसे ते लोक आपण बुडून दुसऱ्यांस बुडवितात. असा एक कीं काय? सर्व एकाच माळेला ओंवावे असे फार आहेत. मुलखांत ज्या द्रव्याच्या योगानें व्यापार चालावयाचा तें द्रव्य त्या दिवाळखोर लोकांच्या हातानें लयास गेल्यामुळें अर्थात मुलखांतला व्यापार बुडतो.

रस्तु०— बरें तर, सल्यानें जें द्रव्य मिळविलें त्यासही अपाय आहे?

शेरव०— नाहीं, नाहीं, तसें नाहीं. घातपातादि दुष्कर्मानें जें द्रव्य मिळवावें त्याची मात्र तशी अवस्था होते; आणि यथान्यायें करून निढळच्या घामाचें मिळविलेलें जें द्रव्य तें पिढोपिढीं राहून त्यापासून पुण्य जोडतें. राज्यांत वखेडा वगैरे

# लढाई.

उपद्रव नसल्यानें रयतेवर जुलूम होत नाहीं, ह्मणून आबादी असते; कारण कीं व्यापारी व कसबी व गुणी ह्यांची चहा राजास असती, ह्यामुळें त्यांस जें द्रव्य मिळतें तें शेतकरी लोकांकडे पुनः येतें. अशा द्रव्याच्या फिरण्यानें सर्व लोक सुखी असतात. हें पाहून दुसरे राज्यांतील रयत लोक ह्या मुलखाची प्रशंसा करितात, व आपला मुलूख सोडून इकडे येतात, तेव्हां जिकडे तिकडे आबादानी व आनंद होतो. सर्व सुखी असल्यानें अधर्म बुडून राजास सुख मिळतें. मग राजानें इतकेंच मात्र राखावें कीं कोठें अन्याय होऊं देऊं नये.

रुस्तु०— तुमचे बोलण्याचें हंशील मला समजलें; पण लढाई कोठेंच नसली तर मग शिपायाची गरज काय आहे? मी तर शिपाई होईन ह्मणतों, तों अगोदरच फौजेस फाटा होईल.

शेख०— अरे थांब, थांब, रुस्तुमा! इतक्यांतच तर्क बांधूं नको; अरे, जर अगदींच फौज नसली तर दुसऱ्या राजास वर्तमान कळून तो लागलाच चढाई करून येईल, आणि राज्य घेऊन मुलखाची खराबी करील. ह्याजकरितां जरी सल्ला आहे तरीं नेहमीं फौज बाळगून पोसली पाहिजे, ह्मणजे तीतील शि

पाईलोक समयास प्राण देतील; नाहींतर कोण मरणार आहे? लढाई नसली तरी मुलखाचे बंदोबस्तासाठीं जागीं जागीं कांहीं कामें योजून फौज ठेविली पाहिजे. मीं तरुणपणांत फारवेळां लढाया करून आपले धन्याचें हित केलें आहे. परंतु आतां आपले वतनाचे गांवावर राहून त्याचा बंदोबस्त मात्र राखीन, आणि मुलांस विद्याभ्यास करवीन, आणि लढाईमध्यें जें जें पाप केलें आहे त्याबारचें आतां गरिबांगुरिबांचा सांभाळ करून त्यांस सुख देईन. इतकें झालें ह्मणजे अंतकाळीं कांहींच इच्छा राहणार नाहीं, आणि ह्या मृत्युलोकांत योग्य वर्तणूक केली अशी माझी सर्वांत वाहवा होईल.

रुस्तु०— बाबा, तुह्मी बोलतां हें ठीकच आहे; परंतु इतरलोकांच्या मनांत असें कोठें येतें?

शेरव०— ह्याचें कारण असें आहे कीं ते आपले वडिलांचे चाली प्रमाणें चालतात, त्यांस कोणी सुरीति शिकवूं लागल्यास ते त्याचें ऐकत नाहींत, कांकीं त्यांचे आईबापांनीं जें त्यांस शिकविलें आहे तेंच त्यांचे मनांत राहतें, त्यांस दया, शांति इत्यादि सद्गुण कोणी विद्वान् शिकवूं लागल्यास ते त्याचा अनादर करितात: ह्याकरितां ह्या गोष्टीचा बाळाभ्यास

# लढाई.

असला पाहिजे, कांतर कुंभाराचें मडकें ओलें असतां ज सें वळवावें तसें वळतें. ह्यासाठीं ज्याला लहानपणापासून उत्तम शिक्षा असती तो स्वतां योग्य आचरण करून जे दुसरे कोणी दुर्गुणी असतील त्यांसही सद्गुण शिकवील. असेंच राजपुत्रही सर्वगुण संपन्न असावे, ह्मणजे जसा राजा तशा प्रजा होतात. दयावंत व नीतिमंत जे राजे आणि ज्या प्रजा आहेत त्यांस सर्वदा आनंद मिळतो, व कोणत्याही गोष्टीचें संकट पडत नाहीं. मग असें होतें कीं त्या राजाचे प्रजेचा किंवा इतर राजाच्या प्रजेनें घ्यावा. ह्यास्तव तूं आतां माझी शिक्षा ऐकून सर्वांभूतीं दया करीत जा, आणि पुढें आपले पुत्रांसही असेंच शिकीव, येणें करून मला आणि तुलाही फार आनंद होईल.

---

# भागिरथी.

भागी०—(आपले बाहुलीशीं बोलते.) कांगे, तूं मजकडे पाहात नाहींस? आणि आपली मान कां उचलीत नाहींस? मी

# बाळमित्र.

चांगली थोपटून तुला निजवितें, तर आपण इकडेतिकडे च डोकें हालविते. आज तुला झालें तरी काय? जा बाई, मला नाहीं असें आवडणार. आतां तूं मला रागें भरवि तेस तर खबरदार. मघां जशी आई कुत्र्यास मारतांना पाहून रागें भरली तशी मीही तुजवर रागें भरेन.

आई— (हे शेवटचे शब्द ऐकून आंत येऊन बोलते.) काय झालें? माझे बयेला कोणी रागें भरविलें? तूं अशी कां खिन्न झालीस? काय, ही बाहुली तुझें ऐकत नाहीं?

भागी०— मी हिला रोज शिकवितें कीं, बाई, आपण आपले हातपाय आवरून रहावें, तर तें तिच्या कांहींच गांवीं नाहीं, काय करावें?

आई— अशी चांगली बुद्धि तूं तिला शिकवीत असतां तिचे गांवींच नाहीं? तर तुझें शिकविणें व्यर्थ झालें खरें, म्हणून तुला खेद वाटला? असो, पण तूं आतां कायशी रागाची गोष्ट बोललीस असें वाटतें.

भागी०— नाहीं, नाहीं, आई, मी हिला अमळ उगीच जाचीत होतें इतकेंच. त्वां माझें सारें बोलणें ऐकलें वाटतें.

आई— तें म्यां कांहीं ऐकिलें नाहीं, पण तूं तिला काय म्हणत होतीस तें सांग. एवढीशी लहान गोष्ट मला सांगितल्या

# भागीरथी.

वांचून तूं गुप्त ठेवणार नाहींस, अशी माझी खातरी आहे.

भागी०— खरेंच आहे, लहान मुलांनीं कोणतीही गोष्ट आईस सांगितल्या वांचून चोरून ठेवूं नये, हें मला ठाऊक आहे.

आई — बेटा, खरेंच बोललीस, सांग तर आतां, तूं बाहुलाशीं काय काय बोललीस, तें सर्व सांग; मला ऐकूं दे.

भागी०— सांगतें, ऐक. मघां मीं हिला अमळ डोकें नीट ठेवावयास सांगितलें तें हिनें माझें ऐकिलें नाहीं, ह्मणून हिला मीं ह्मटलें कीं, जर न ऐकशील तर जशी मला कुत्र्यास मारतांना पाहून आई रागें भरली तशी मी ही तुजवर रागें भरेन, इतकेंच मात्र ह्मटलें.

आई — एकून तुला वाटलें कीं, मी तुजवर रागें भरलें?

भागी०— तसें नव्हे, जेव्हां मीं तुझे तोंडाकडेस पाहिलें तेव्हां तुझ्या मुखश्रीवरून मला वाटलें कीं तुला राग आला.

आई — मला कांहीं राग आला नाहीं, बरें! तूं एखादी कुत्र्यास निर्दयपणानें मारावयास जाशील आणि तो तुला चावेल, ह्मणून मला भय वाटलें, ह्यामुळें मी तुला बोललें, ही शिकवणीची गोष्ट तुला सांगितली ह्मणून काय राग आला असें झालें? आणि तूं माझें सांगणें ऐकत नाहींस असें मला वाटलें, ह्मणून जें मला दुःख झालें तेणें करून माझ्या

डोळ्यांवाटें पाणी येऊं लागलें, तें पाहून तुला वाटलें कीं आई स राग आला; पण तसें कसें होईल?

भागी०— पण, आई, मी आतां बाहुलीशीं बोलत होतें तें ऐकून तूं रागें भरलीस ना?

आई— बाहुलीची गोष्ट असूं दे, तें काय, पण तूं आरशांत पाहून नटत मुरडत होतीस त्याविषयीं कांहीं तुला सांगाव याचें आहे.

भागी०— आहा! तें तर मला फार चांगलें आवडतें, आणि तें मला गोपाळाच्या मुलीनें शिकविलें आहे.

आई— गोपाळाचे मुलीपेक्षां मला दोन कांकणें अधिक कळतें. तिचें माझें सांगणें एकसारखें पडणार नाहीं खरेंच.

भागी०— कालरात्रीं मी हिला घेऊन आरशांत पाहूं नटूं लागलें तेव्हां मला असें वाटलें कीं मी फारच चांगली दिसतें.

आई— काय, तुला असें वाटलें कीं साधेपणानें असण्यापेक्षां नटणें मुरडणें फार चांगलें आहे? पण ह्याचा परिणाम काय होईल हें तुला माहीत नाहीं? मला, बाई, वाटतें कीं साधेपण्यानें असावें हें चांगलें.

भागी०— पुढें ह्याचा परिणाम काय होईल बरें?

आई— परिणाम हाच कीं अशी तुला रोजरोज संवय लाग

# भागीरथी.

न हेंच करावें असें वाटत जाईल. मग लोक नांवें ठेविती
ल, आणि ज्या कुलीन स्त्रिया आहेत त्या तुझी संगत ध
रणार नाहीत.

**भागी०**— काय आई! तूं ह्मणतेस असें होईलना? ही गोष्ट त्वां
मला आतांच सांगितली ह्मणून बरें झालें, नाहीं तर मला
तोच चटका लागला असता.

**आई**— माझे मनांत तूं भोळी आहेस, ह्मणून मीं तुला सांगि
तलें; तूं पुनः जर असे ढंग करशील तर मग कधींच मी तु
झें तोंड पाहणार नाहीं. ह्यावरूनच पहा कीं भलत्यांचें ऐकू
न किंवा पाहून केल्यानें केवढा अनर्थ होतो तो! आपणा
ला चांगलें असावें असें जर तुझ्या मनांत आहे तर मला वि
चारीत जा.

**भागी०**—आई, मी तुला वचन देतें कीं आजपासून तुझ्या
आज्ञे शिवाय कांहीं करणार नाहीं; तूं सांगशील तें मा
झ्या बऱ्याचेंच सांगशील, हें मला पक्कें समजतें. तूं एखा
दे वेळेस लहानशा अपराधा करितां सर्व मंडळी देखतां
माझा कान टोंचितेस, तसें जर ह्या गोष्टी करितां सगळ्यां
देखत मला फजीत करितीस तर मी लाजेनें मरून गेलें
असतें.

# बाळमित्र.

आई— माझें बोलणें तुझ्या मनांत पक्कें ठसावें ह्मणून मी चौघांत तुला बोलतें, पण आतां एक दुसरा उपाय आहे तो असा कीं, जेव्हां चौघां देखत कांहीं बोलावयाचें आहे तेव्हां मी तुला खूण करीत जाईन त्याप्रमाणें तूं वागत जा; कदाचित् ती खूण तुझ्या लक्षांत नआलीतर मला वेगळ्या वाटेनें विचारीत जा, ह्मणजे मी तुला उमजून सांगेन.

भागी०— आई, त्वां फार चांगलें शिकविलें, ही युक्ति खाशी आहे. ह्याप्रमाणें मी वागलें तर माझें कल्याणच होईल.

त्या दिवसापासून कोणतेंही बरें वाईट करणें तें भागीरथी आपले आईस विचारून करीत गेली. थोडक्याच दिवसांत आईच्या झाडून साऱ्या खुणाखाणा तिच्या ध्यानांत आल्या, आणि आईच्या शिकवणी प्रमाणें तीवागूं लागली; ह्यामुळें तिच्या ज्या समवयस्क मुली होत्या त्यांमध्यें ती शाहणी व मोठी खबरदार अशी निवडली; हें पाहून सर्वलोक वाव्हा वाव्हा करूं लागले, आणि ह्यालोकांतलीं जीं सुखें आहेत तीं तिला मिळालीं. तीं हींच कीं, आईबापांची प्रीति व सर्वलोकांची प्रीति आणि अंतःकरणा

भागीरथी.

चें समाधान इतकीं तिला प्राप्त झालीं.

---

# दिवाळखोरास दुप्पट शिक्षा

एके सद्गृहस्थानें पाहिलें तों आपला मुलगा दुर्व्यसनांत पडू न द्रव्य उधळीत आहे, तेव्हां त्यानें पुत्रास कांहीं दिवस तसेंच वर्तूं दिलें. नंतर थोडक्याच दिवसांत तो पुत्र कर्जभरी झालाअ सें पाहून त्यानें पुत्रास बोलावून आणून सांगितलें कीं, बाबा रे, आतां माझें तर म्हातारपण झालें, मला द्रव्यापेक्षां प्रतिष्ठा फार प्रिय आहे, ती नजावी ह्मणून मी तुला सांगतों, तूं जितकें कर्ज काढशील तितक्याचाही फडशा मी करीन, परंतु मी बोलतों ह्यागोष्टीची पुरती आठवण ठेव. तूं ख्याली खुशालीवर प्रीति ठेवितोस आणि मी गरीब दुबळे ह्यांजवर प्रीति ठेवितों, तर तूं द्रव्य उधळूं लागल्यापासून मीं नेमापेक्षां फार कमी धर्म केला, परंतु विचार पाहतां हें नीट झालें नाहीं. ह्यास्तव आजपासून मीं असें कधीं करणार नाहीं; तर काय करीन? पक्कें ध्यानांत

# बाळमित्र.

ठेव, तूं आपले इच्छे प्रमाणें बेलाशक द्रव्य उधळीत जा, आणि तुला चाली प्रमाणें खर्चास जितकें मी द्रव्य देत असतों त्याहून ज्यास्ती त्वां खर्च केला ह्मणजे त्याबद्दल तितकेंच द्रव्य मी एखा दे धर्म कृत्याकडे खर्च करीन; हाच प्रारंभ आजपासून केला आ हे. माझें काय? दाहा गेले आणि पांच राहिले, परंतु येणें करून तुझेंच द्रव्य कमी होईल, मी तर उद्यां मरणार पण तूं मात्र आ पला विचार पहा.

बापानें तसें करतांच पुत्र आपल्या उधळल्या द्रव्याची दुप्पट शिक्षा पावून लौकर शुद्धीवर आला. असें झालें नसतें तर त्याचें बापाचें द्रव्य लौकरच लयास गेलें असतें.



# लहान जुगारी.

## नाटक एक अंकी.

### पात्रें,

| | |
|---|---|
| जयराम - - - - - - - - - - - - - - | कोणी गृहस्थ. |
| माधव - - - - - - - - - - - - - - | जयरामाचा पुत्र. |
| राधा - - - - - - - - - - - - - - | जयरामाची कन्या. |
| शिवराम - - - - - - - - - - - - - - | माधवाचा मित्र. |
| गोविंदा - - - - - - - - - - - - - - | माधवाचा शेजारी. |
| विठू. दाजी. तात्या. - - - - - - - - - - - - - - | पैजेचे खिलाडू. |

### स्थल

### जयरामाचा बाग.

### प्रवेश १

### शिवराम आणि गोविंदा.

शिव०—तुला माधवाचे घरीं जावयाचें काय काम आहेरे?
गोविं०— कांहीं बोलावयास त्याचे येथें जावयाचें आहे, पण तूं

त्यास वळखतोस?

शिव०— होय, त्याची आणि माझी उगीच तोंड ओळख आहे, पण अगोदर कधीं तुझी त्याची इतकी ओळख नव्हती.

गोविं०— त्याचे शेजारीं माझे बापानें बिऱ्हाड घेतलें तेव्हांपासून मीं त्याची सोबत धरिली आहे, कालरात्रीस मी त्याज बरोबर गंजिफा खेळत होतों.

शिव०— आतांशीं त्वां गंजिफांवर बरेंच ध्यान धरलें आहे. मीं तुला दाजी, विठू, ह्यांचे संगतीं फारवेळां पाहिलें; पण हें चांगलें नव्हे.

गोविं०— एकून तूंही त्यांना ओळखून आहेस, मला तर, बाबा, त्यांची संगत नको; एकदां सुटती तर बरें होतें.

शिव०— पण तें तुझ्या मनांत येईल तेव्हांना तूं त्यांची संगत सोडशील?

गोविं०— तें माझ्यानें आजच करवत नाहीं, पण मी तुला एखादी गोष्ट जर सांगितली तर तूं कोठें फोडणार तर नाहींस?

शिव०— तूं संशय कां धरितोस? तूं नि मी कांहीं आजकालचे मित्र आहों!

गोविं०— काय सांगूं, शिवरामा! त्यांनीं मला फार नाडलें, ह्मणून मीं पैज केली, पण तें जर का माझ्या बापास कळलें तर तो

# लहानजुगारी.

मला घराबाहेर हांकून लावील. काय सांगू ? मला क्षणभर देखील चैन नाहीं.

शिव०— ती पैज कशी काय आहे बरें ?

गोविं०— त्यांनीं मला काल एके ठिकाणीं फसवून नेलें, तेथें तात्या ह्मणून एक पोरगा होता, तेव्हां तो आह्मी सारे गंजीफा खेळूं लागलों, त्यांत म्यां आपले सारे पैसे हारविले.

शिव०— त्यांनीं कांहीं दगाबाजी केली असेल ह्मणून तूं फसलास; तुला सांगतों, झालें तें बरेंच झालें, तुझें कांहीं फारसें गेलें नसेल. इतःपर मात्र तूं त्यांशीं कधीं खेळूं नको, ह्मणजे झालें. आतां जें तुझें नुकसान झालें तीच तुला हितावह शिक्षा झाली असें समज.

गोविं०— पण अझून म्यां तुला कांहींच हकीकत कळविली नाहीं, अगोदर पुरतें ऐक. जों जों मी हारत गेलों तों तों मिळवीन मिळवीन ह्यालालचीनें अधिक अधिक खेळत गेलों, तों दोन मोहरा, चाकू, कातर, पागोटें, वगैरे जें काय माझे जवळ होतें तें म्यां सर्व हारविलें. इतकेंही जाऊन आणखी तात्यास एक मोहर द्यावयाची राहिली आहे, ती कसेंही करून दिली पाहिजे. न देईन तर तो बापास जाऊन सांगणार आहे.

# बाळमित्र.

शिव०— आतां तुला एक मसलत सांगतों, तूंच अगोदर जाऊन आपले बापास सांग ह्मणजे झालें. तो तुला रागें भरणार नाहीं हें मला पक्कें ठाऊक आहे.

गोविं०— तें तर मी प्राण गेल्यानें करणार नाहीं.

शिव०— तर मग काय करशील?

गोविं०— तें तुला सांगावयास मला धैर्य होत नाहीं.

शिव०— मजपाशीं सांगावयास काय चिंता आहे? काय तें मला ऐकूं तर देशील?

गोविं०— दाजी, विठू, ह्यांस मीं सांगितलें कीं आतां माझा उपाय नाहीं तेव्हां त्यांनीं मला एक युक्ति सांगितली.

शिव०— अहा त्यांची युक्तिना? फारच खाशी असेल.

गोविं०— ह्यांत कांहीं भलमनसाई नाहीं, पण मीं तरी कसें करावें, दाजी, विठू, ह्यांजकडे मला माधवास नेलें पाहिजे, कांकीं त्याजवळ पैसे फार आहेत.

शिव०— त्याचे पैसे तूं चोरून घेणार कीं काय?

गोविं०— ईश्वर करो कीं मजकडून असें न होवो, इतकेंच कीं, तात्यानें जसें मला केलें तसें तो माधवासही करणार आहे. मग वांटणी होईल, अशा युक्तीनें मी कर्जांतून मुक्त होणार आहें.

# लहानजुगारी.

शिव०— त्यांनीं जसें तुला ठकविलें आहे, तसें तूं आपल्या मित्रास फांशांत घालणार आहेस, पण माधव हारेलच हें तरीं कशावरून ह्मणतोस?

गोविं०— होय, होय, तो अकृत्रिमपणें खेळतो खरा.

शिव०— आणि तूं लबाडीनें खेळतोस काय?

गोविं०— काय, लबाडीनें? मी कधीं तरी लबाडी करीन?

शिव०— नाहीं, नाहीं, तुझी खेळण्यांत लबाडी कधींच आढळली नाहीं, ह्मणूनच तूं बुडालास, पण आतांही खरेंच खेळशील तर मग त्याला कसें जिंकशील?

गोविं०— कसें जिंकावें हें मला माहीत नाहीं, पण त्यांनीं सांगितलें कीं जिंकावयाची एक युक्ति आहे त्या युक्तीनें खचीत जिंकूं.

शिव०— त्यांची युक्ति लबाडीची आहे, पण तूंही तशीच युक्ति करणार कीं काय? मी इतका गरीब आहें तरी अशी युक्ति करून कधीं पैसे मिळविणार नाहीं. तुझा अभिप्राय पाहून मला फार खेद वाटतो.

गोविं०— हें काय, बरें, शिवरामा, तूं मजवर कृपाकरून मलास हाय हो, ह्मणजे मी प्रतिज्ञा करीन—

शिव०— प्रतिज्ञा!— त्वां कशीही प्रतिज्ञा केली तरीं मी तुला क

# बाळमित्र.

धीं सहाय होणार नाहीं.

गोविं० — असें नव्हे, मी बोलतों कीं ह्यालबाड तात्याचे पैसे कसे तरी एकदां फेडल्यावर त्याची किंवा त्याच्या सोबत्यांची संगत सोडून देईन, आणि पुन्हा कधीं गंजीफा हातांत धरणार नाहीं, ही प्रतिज्ञा मी करितों. असें जर न केलें तर मग तूं माझ्या बापाजवळ सांग. माधवास ठकवावें हें माझ्या मनांत नाहीं, आणि कसें ठकवावें हें ही मला ठाऊक नाहीं. ठकवावयाचें काम तात्याकडे. मी आपला उगीच सोबती खेळणारा मात्र. त्यांनीं मला वचन दिलें आहे कीं आह्मी तुला कदापि हारूं देणार नाहीं, आणि जितके पैसे मिळतील त्यांतून तुला वांटा देऊं.

शिव० — बरें तर मीही तुझ्या मंडळींत मिळतों.

गोविं० — ठीक आहे, मी आतांच माधवास बोलावून आणतों. त्याचा बाप कोठें दुसरे गांवीं गेला आहे, तो एक महिनाभर यावयाचा नाहीं.

शिव० — पण तुझ्या ध्यानांत इतकें असूं दे. तूं होऊन आंगें जर माधवास ठकविशील तर—

गोविं० — असें ह्मणूं नको, मी तुजशीं बोललों नसतों तर बरें होतें.

# लहानजुगारी.

शिव०— होय, तूं बोलला नसतास तर मला ह्याचें कांहींच कारण नव्हतें.

गोविं०— तुला? काय कारण?

शिव०— सद्गुणी मुलाशीं लबाडी करणें हें मला कसें साहेल?

गोविं०— पण, तूं त्याला कांहीं ठकवीत नाहींसना? मग काय?

शिव०— कसें बोलतोस कोण जाणें, अरे, कोणाची कांहीं वस्तचोर नेतो आहे हें त्वां पाहिलें तर काय उगीच राहशील?

गोविं०— फार झालें तर तो तीनचार मोहरा हारे तंवर खेळेल, मग तो खेळणार नाहीं.

शिव०— पण तितक्यानेंच आतां जशी तुझी अवस्था झाली आहे तशीच त्याची पुढें होईल.

---

## प्रवेश २

## गोविंदा, माधव, आणि शिवराम.

(माधव शिवरामास भेटतो.)

गोविं०— आज तूं बागांत खेळावयाला कां गेला नाहींस?

# बाळमित्र.

माध० — मी आतांच बागांतून आलों. आज मी बापाबरोबर आंब राईंत वनभोजन करावयास गेलों होतों.

गोविं० — तुझा बाप आला काय? तर, गड्या, मी खचीत सांगतों कीं तुला बाप आला ह्मणून संतोष वाटत नसेल.

माध० — तो वीस दिवसांनीं गांवाहून आला आहे, तेव्हां संतोष कसा वाटणार नाहीं?

गोविं० — माझे आईबापांची मला आवड आहे, पण ते जर कोठें बाहेर गेले तर मला वाईट वाटणार नाहीं.

माध० — माझ्या आईबापांची मला इतकी आवड आहे कीं ते कधीं दृष्टी वेगळे झाले तर चैन पडत नाहीं.

गोविं० — माझ्या आईबापांचा मला इतका धाक आहे कीं अमळ इकडे तिकडे जातां किंवा खेळतां कामास नये.

शिव० — तुला कोणत्या प्रकारचें खेळणें पाहिजे कोण जाणे?

माध० — व्वा, आपल्या देखतां तर कधीं ह्मणजे तुझ्या बापानें तुला ह्मटलें कीं कोठें जाऊं नको अगर खेळूं नको, हें तर कांहीं आपण ऐकिलें नाहीं; तुला बरीक ह्यां बागांत आणि ओट्यावर खेळतांना पाहिलें आहे.

गोविं० — जेव्हां माझा बाप बाहेर जातो तेव्हां मात्र मी तुह्मांशीं बोलतों आणि खेळतों. आज तुझा बाप घरीं आला तेव्हां तु

# लहान जुगारी.

ला आज रात्रीं आह्मांबरोबर खेळावयास फावणार नाहीं.

माध०— कां? तो येऊं देणार नाहीं? तसें कांहीं नाहीं. जें काय मी ह्मणतों तें तो पुरवितो, पण मला बापाच्या सोबती शिवाय दुसरे कोणाची सोबत आवडत नाहीं.

गोविं०— अहा, तुझा बाप फार चांगला आहे, जेथें तुझ्या मनांत जावयाचें येतें तेथें तो तुला जाऊं देतो.

माध०— होय खरें तें. मला कोठेंही जाणें झालें तर मी बापास विचारितों, ह्मणूनच तो मला जाऊं देतो.

शिव०— आणि तूंही बापाच्या ह्मटल्या प्रमाणेंच अवश्य वागत असशील?

गोविं०— बरें, पण बाप जवळ असतां तूं आपलें मन कसें रमवितोस?

माध०— उह्नाळ्यांत व हिंवाळ्यांत बाहेर जातों, पावसाळ्यांत आणि जे दिवशीं कोठें जावयाचें नसतें तेव्हां घरीं राहून अधिक विद्याभ्यास करितों, व कधीं कधीं तिघां चौघां बरोबर नाटक खेळत असतों, नाटकावर आमची भारी आवड आहे.

गोविं०— पण, अशा कामानें तुला भारी कंटाळा येत असेल असें वाटतें.

माध०— नाहीं, नाहीं, तेणें करून तर आह्मांस भारी आनंदवा

टतो.

गोविं०— पण, त्यापेक्षां गंजिफांचा खेळ फार चांगला आहे न कें?

माध०— होय, तो तर माझा बापही खेळतो.

गोविं०— कधीं बधीं रुपयांची पैज लावून खेळत असतोस?

माध०— होय, थोडीशी पैज लावून खेळतों. ह्याचें कारण असें कीं खेळण्यांत मन लागावें, ह्मणून बाप ह्मणतो कीं पैसे हारले असतां राग येऊं नये. संवय मात्र लागूं देऊं नये, इतक्याला जपावें.

गोविं०— थोडक्या रुपयांची पैज करून खेळावें हें फार चांगलें आहे; कारण कीं पैक्याचें संरक्षण झालें पाहिजे.

माध०— मजजवळ पैसे नाहींत, असें समजूं नका, मला खर्चा पुरते पैसे मिळून आणखीही मिळतात.

गोविं०— किती, कसे, बरे?

माध०— दर महिन्यास एक मोहर.

गोविं०— पण इतके दर महिन्यास मिठाई वगैरे घ्यावयास मिळतें ना?

माध०— सारा दिवसभर भातुकलीस पैसे बापाजवळ मागूं नयेत ह्मणून एक नेम बांधून ठेविला आहे, पण मी त्यांतच काटकसर

# लहानजुगारी.

करून जमवीत असतों.

शिव० — खरेंच आहे; पदरचे पैसे खर्चावे लागतात तेव्हां पाहून पाहून पदार्थ घ्यावे, आणि चार ठिकाणीं किमतीची चौकशी करावी, हें चागलें, ठीकच आहे.

माध० — खरी गोष्ट ह्मणतोस, शिवरामा, पण असें करून पैसे जमा करणारा विरळा. पहा मजजवळ आज पांच मोहरा आहेत.

गोविं० — इतके जमलेले पैसे कोठें खर्चिशील?

माध० — कां? मला खर्च नाहीं कीं काय? कांहीं आवडते पदार्थ विकत घ्यावे लागतात, आणखी मी दुसऱ्या तऱ्हेनें खर्चीत असतों. माझ्या चाकराचा मुलगा आहे त्यास मी साळेंत पाठवितों, आणि माझा लहानपणचा पंतोजी आंधळा आहे ह्मणून मी त्याचे पोटास कांहीं देत असतों, इतकें होऊन बाकी राहिलें तर गंजीफा वगैरे खेळण्यांत खर्चितों.

गोविं० — गंजीफा खेळण्यांत तुझें दैव फार चांगलें आहे, थोडे दिवसां मागें त्वां गंजिफांचे खेळांत माझा एक रुपया जिंकला होता.

माध० — मला तें फार अवघड वाटतें, मित्राचे पैसे जिंकून घेतले असतां तें सर्वदां मनांत डाचीत असतें.

गोविं० — बरें, तर, ते पैसे खर्च करण्याची तुला तशीच कांहीं एक

हिकमत सांगेन, पण आजरात्रीस तुला कांहीं काम आहे?

माध०— नाहीं, नाहीं, मी रिकामाच आहें; आज माझा बाप एक्या गरीब बायकोची अर्जी लिहिणार आहे.

गोविं०— बरेंच झालें, माझाही बाप आज संध्याकाळीं बाहेर जाणार आहे, तर तूं माझ्या घरीं ये, मी विठू, दाजी, आणि तात्या ह्यांस बोलावीन.

माध०— बरें तर, मी आपल्या बापास विचारून येतों, नंतर तूं एथेंच ऐस.

गोविं०— नाहीं, मी त्या तिघांस बोलवायास जातों, तुझा निरोप मला शिवराम कळवील.



# लहान जुगारी.

## प्रवेश ३

### शिवराम

( एकटाच आहे. ) ह्या असल्या कामांत माझी अक्कल तर कुंठित झाली, बापडा गोविंदा फसला आहे; त्याला संकटांतून काढावें हें मला बरें वाटतें, परंतु खरा प्रमाणीक तो माधव त्याशीं जर कोणी लबाडी करूं लागलें तर त्यास मी करूं देईन काय? चोरास सामील होणें आणि चोरी करणें बरोबरच आहे, ह्यासाठीं मी माधवाला फसवूं देणार नाहीं. माधवाकडे जाऊन ही गोष्ट मी त्याला कळवीन. पण राधाही इकडेसच येत आहे, बरेंच झालें. मी मित्राचा विश्वासघात करणार नाहीं. माधव नफसावा ह्मणून ही गोष्ट अगोदर मी राधेस सांगेन.

---

## प्रवेश ४

### राधा आणि शिवराम

**राधा** — शिवरामा, तूं तर इकडे एकटाच आहेस! मला वाटलें कीं माझा भाऊ ही इकडेसच आला आहे.

# बाळमित्र.

शिव० — तो आतांच तर एथून गेला.

राधा — त्याला तुझी सोबत असती तर फार बरें होतें, तो गोविंदाशीं स्नेह करावयास इच्छितो.

शिव० — त्याचे सोबतींत राहिल्यानें माधवाचें अझून तर कांहीं गमावलें नाहीं, पण —

राधा — तें खरें; माझा भाऊ फार भोळा आहे, त्याचे मनांत इतर लोक आपल्या सारखेच भोळे असतील, पण ज्यांना तो आपले मित्र करूं ह्मणतो ते तसे नव्हत. ते केव्हां फसविनील ह्याचा विश्वास नाहीं. गोविंदाची सोबत तुला बरी वाटत नाहीं हें मला माहीत आहे.

शिव० — खरेंच जर विचारशील तर माधवानें गोविंदाची सोबत धरूं नये हें मला बरें दिसतें.

राधा — बहुत करून असें घडतें कीं नाश झाल्यावर मग माणसांचे डोळे उघडतात, ह्यासाठीं प्रथमच सावध असावें.

शिव० — तूं आपले भावावर प्रीति करतेस हें मी पुरतें जाणतों, ह्याकरितां मला शिवरामानें सांगितलें असें कोणास कळूं देऊं नको, पण तुला सांगतों, गोविंदानें नात्यास वचन दिलें आहे ह्यासाठीं नात्याशीं किंवा त्याचे सोबत्यांशीं आजरात्रीं खेळूं नको ह्मणून माधवास सांग, तो आतां हो अगर ना सांगाव

यास येणार आहे, ह्मणून मी बसलों होतों, पण आतां मी बाहेर जातों. तो आतां येईल. माधवाचा नि माझा भारी स्नेह आहे ह्याकरितां तुला सुचविणें प्राप्त आहे.

---

## प्रवेश ५

### माधव आणि राधा

माध० —माझा बाप नुकताच गांवाहून आला ह्मणून मोठे मोठे गृहस्थ त्याला भेटावयास आले आहेत, तेथें फार दाटी आहे ह्याकरितां मला बोलावयास अवकाश झाला नाहीं.

राधा— अशी कोणती मोठी गोष्ट तुला त्यांजवळ विचारावयाची होती?

माध०— मोठीशी कांहीं नाहीं, मला आपले मित्राचे घरीं जावयाकरितां विचारावयाचें होतें.

राधा — गोविंदाचे घरींना?

माध०— होय.

राधा — मां तेव्हांच अटकळ केली, पण ह्यांत कांहीं चांगुलपणा नाहीं, हें तुला कसें कळत नाहीं?

# बाळमित्र.

माध० — त्याला तूं ओळखतीस?

राधा — त्याची चालचर्या पाहूनच मी तर्कानें जाणतें.

माध० — काय, त्याची तुझी नेहमीं संगत सोबत आहे ह्मणून त्याची चाल तुझ्या ध्यानांत आली?

राधा — तो कोणाचे पंक्तीस बसतो हें पाहूनच त्याची चाल कशी आहे हें मला समजतें.

माध० — मी समजलों, त्याचे सोबतीचीं मुलें वाईट आहेत, त्यांतला मीही एक आहें ह्मणून.

राधा — तुला नाहीं, पण तुजपेक्षां त्याचे जुने स्नेही फार दिवसांचे आहेत त्यांस मी लबाड लुच्चे असें नांव ठेवितें.

माध० — काय! ते लबाड आहेत?

राधा — लबाड पर सात लबाड. जे दुसऱ्याचे पैसे फसवून घेतात आणि त्यापैशांचा भलताच खर्च करितात, त्यांस लबाड ह्मणावयास भय कोणाचें!

माध० — ह्यांत त्यांची लबाडी दिसत नाहीं, कांकीं ते दोन घटका गमत करावयासाठीं खेळतात आणि पैसे मिळवितात, मग ते आपले इच्छे प्रमाणें खर्च करितात, असें तर आह्मी देखील करतों. वरकड तूं ह्मणशील कीं ते पैसे जिंकावयासाठींच खेळतात तर ते मजबरोबर खेळतांना फारवेळां हारले आ

हेत.

राधा — होय, होय, त्यांनीं आपले तांब्याचे पैसे हारविले आणि तुझे रुप्याचे जिंकले.

माध० — बरें तर ह्यांत माझाच नाश झाला, तुझें तर कांहीं गेलें नाहीं? मग उगीच कां माझें डोकें उठवितेस? मी तुला सुख देतों आणि तूं मला दुःख देतेस.

राधा — (त्याचा हात धरिते.) असें नव्हे भाउराया, तुझा ज्यांत संतोष त्यांत माझाही आहे, तुझे सुखास विघात करावा हें मला चांगलें वाटत नाहीं, पण — दादा इकडे आले ते पहा.



## प्रवेश ६

### जयराम, माधव, आणि राधा

जय० — अरे मुलांनो, आतां मी फार संतोष पावून आलों.

राधा — तुह्मी गांवाहून परत येऊन आपल्या स्नेही मंडळीस भेटलां ह्मणून तुह्मांस फार संतोष मिळाला असेल, पण त्यांना तुह्मांवर प्रीति करणें प्राप्त आहे, कां कीं, ज्या आ

# बाळमित्र.

ह्मांस तुह्मांपासून भय मिळावें ते आह्मीही तुह्मांवर प्रीति करितों, मग त्यांनीं करावी यांत काय आश्चर्य?

माध०— होय खरेंच आहे, दादा, तुह्मांवांचून आह्मांस क्षणमात्र चैन पडावयाचें नाहीं.

जय० —मी काय तुमचे जन्मास पुरणार आहें? मजवांचून तुह्मांस राहाणें प्राप्त आहे, कारण कीं ही मृत्युलोकची वस्ती—

राधा— अहाहा, दादा, हें काय! आमचे मनांत ही सुखाचीघडी आहे, अशा समयांत आह्मांस तुह्मी उदास करूं नका.

माध०— दादा, आमचे कल्याणा करितां तुह्मी फार दिवस वांचावें ही आमची आशा आहे. तुह्मीतर आमचें छत्र आहां, तुह्मांजवळ आज एक विचारावयाचें आहे.

जय०— तें काय, बरें?

माध०— तुह्मी गोविंदाचे बापास ओळखतां? त्यानें मला आजचे रात्रीं खेळावयास बोलाविलें आहे.

जय०— कायहा आपला शेजारी? त्वां हा नवा मित्र जोडला हें पाहून मला फार आनंद झाला.

राधा०— ऐकिलें ना? दादा ह्मणतात कीं तो चांगला सोबतीआहे.

# लहानजुगारी.

माध० — तो चांगलाच आहे, मीही त्यास तसाच लेखितों. त्याचीनिमाझी तीन चार वेळां गांठ पडली. त्यानें आपल्या मित्राशीं तरीं कितीवेळां मला भेटविलें होतें.

राधा — तेही तसेच चांगले सोबती असतील.

माध० — होय, ते तसेच आहेत, तुजपेक्षां मी त्यांस फार ओळखतों.

जय० — माझा चांगला ह्मणण्याचा भाव मिळून हाच कीं कुलीन, शाहाणा, रीतीचा असा असावा.

माध० — ते तसेच आहेत.

राधा — हें तूं कशावरून ह्मणतोस? त्यांची तुझी एकदोन वेळमात्र गांठ पडली.

माध० — पण मी त्यांचे बरोबर फारवेळ बोलत होतों, त्यावरून मी ह्मणतों.

जय० — तुझी आणि त्यांची ओळख कशी झाली.

राधा — गंजीफा खेळण्यावरून.

माध० — मग? ह्यांत काय? दादांनींच मला गंजीफा खेळावयास सांगितलें आहे.

जय० — मीं सांगितलें खरें, पण तें केव्हां? दुसरा कांहीं उद्योग नाहीं आणि करमेना, तर उगीच थोडक्याशा पैशांची पैजकरू

न खेळावें, कारण कीं द्रव्य मिळाल्याचा संतोष व गमाव ल्याचा खेद निवारण्याची संवय असावी ह्मणून.

**राधा**— पण दादा, गंजिफांच्या खेळापेक्षां दुसरे चांगले खेळ नाहींत काय?

**जय०**— ठीकच बोललीस, गंजीफा खेळण्यानें वेळ घालवि ण्यापेक्षां दुसऱ्या रीतीनें वेळ घालवावयास वाटा पुष्कळ आहेत; उगीच रिकामपणीं गप्पा मारीत बसावें त्यापेक्षां त्या अवकाशांत गंजीफा खेळाव्या ह्मणून मी सांगितलें. असा मीही कधींवधीं खेळत असतों.

**राधा**— ह्मणूनच राजेश्री खेळत असतील.

**माध०**— पण तुला कोणीं इतका रिकामा कारभार सांगितला आहेगे? उगीच कां मधें लुडबुडतेस?

**जय०**— अरे, तिला कांहींतरी ह्यांत काळें बेरें दिसत असेल, ह्मणून ती बोलते. तुजवर एखादी गोष्ट येऊन बेतली तर त्याचें निवारण मीच करणारा आहें, ह्याकरितां कोणतीही गोष्ट मला कळविल्या वांचून गुप्त ठेवूं नये. राधा, तुझ्या भा वाचे मित्र तुझ्या मनास कां येत नाहींत? सांग.

**राधा**— त्यांना गंजिफांचा भारी छंद आहे.

**माध०**— तुला कोणींगे सांगितलें, कीं त्यांना गंजिफांचा भारी

# लहानजुगारी.

छंद आहे ह्मणून?

राधा — त्याची कांहीं चिंता नाहीं, पण गोष्ट खरी आहे.

जय० — म्यां तुला अगोदरच सांगून ठेवलें आहे कीं, किती एक खेळ फार वाईट आहेत.

माध० — माझे मित्र जो खेळ खेळतात तो फार सोपा आहे; त्याचें नांव एकातिशी.

जय० — तो खेळ कांहीं मला चांगलासा वाटत नाहीं.

माध० — कां नाहीं बरें? दादा, मला वाटतें कीं त्यापेक्षां दुसरा खेळ चांगला नाहीं. ज्याला एकतिसांचे आंत अधिक ठिपके मिळतात तो जिंकितो.

जय० — तुला ठाऊक नाहीं, हा खेळ दैवावरचा आहे.

माध० — खेळामध्यें जिंकणें किंवा हारणें हें प्रारब्धाचे स्वाधीन ही गोष्ट खरीच आहे, पण सर्व खेळ ह्याप्रमाणेंच आहेतना?

जय० — त्यांत अंतर आहे; ह्या खेळांत प्रारब्धावरच सर्व हवाला आहे, एथें बुद्धीचें काम नाहीं; इतर खेळांत शहाणपणाची गरज आहे. थोडक्यांत सांगतों, दैवापुढें शहाणपण चालत नाहीं, ह्यासाठीं मला असें वाटतें कीं ज्यांत बुद्धीचें कौशल्य अधिक आहे त्याचें नांव खेळ.

राधा — आणि तसल्या खेळांत आपणास संतोष देखील होतना

हीं, आपणासजी गंजीफ पाहिजे ती नमिळाली ह्मणजे ति ची भारी हळहळ लागते.

माध०— असें ह्मणूनको, त्यांतच कायती मजा आहे, जी गंजीफ आपणाला पाहिजे असती तिजकडे कसें भारी लक्ष्य ला गलेलें असतें!

जय०— हा संतोष लोभामुळें उत्पन्न होतो; लोभ मोठा अनर्थ कारी आहे, ह्यालोभामुळें सहस्त्रावधि लोक बुडून जातात, आणि जे ठक आहेत ते अशा खेळांत भोळे प्रमाणीक ह्यांस च बहुत करून ठकवितात.

माध०— हें कसें बरें, दादा?

राधा०— मला वाटतें कीं हुकमाहुकमाचीं पानें कशीं लावावीं ही युक्ति ते जाणत असतील.

जय०— होय, हेंच खरें, त्यांची ती युक्ति कशी काय आहे हें मला कांहीं माहीत नाहीं हो; पण आहे खरी, हें मी पक्कें जाणतों. कशावरू? त्यांच्या त्या युक्तीनें बहुतांचा नाश झालेला मीं फारवळां पाहिला आहे.

माध०— त्यांतली एखादी गोष्ट आह्मांस कळवाना, दादा?

जय०— बरें, ऐक, सांगतों. मी हैदराबादेस गेलों होतों तेथें ए के सावकाराचा तरुण मुलगा होता त्याला जुव्याचा छंद ला

# लहानजुगारी.

गेला, त्यापाशीं लाखरुपयांची मत्ता होती ती आणि कांहीं व तनवाडी, तितकींही त्यानें जुवेबाजींत हारवून बुडविलीं, हें मीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलें.

राधा— अबा बाबा ! लाख रुपये बुडविलेना? मग त्याबापड्याची कशी अवस्था झाली असेल?

माध०— तो तर मग वेडाच झाला असावा.

जय०— तसेंच झालें. आपलें सर्व द्रव्य बुडालें असें समजतांच तो खापरा सारखा काळाठिकर पडला, तेव्हां माझ्यानें तर त्याचे तोंडाकडे पाहवेना देखील, मग त्या दुःखाच्या योगानें त्यानें आपल्या मिशा उपटल्या, डोकींत धूळ घातली, आणि मोठ्यानें ऊरबडवून ओरडूं लागला, शेवटीं मूर्छा येऊन पडला. अशी त्याची चळ भरल्या सारखी अवस्था होऊन त्याखोलींतून बाहेर वेड्या सारखा भटकत गेला.

माध०— पण, दादा, अशी त्याची अवस्था पाहून ज्यांनीं त्यापासून द्रव्य जिंकून घेतलें होतें त्यांनीं त्यास पुनः परत दिलें नाहीं? मीं तर, ब्वा, तसें केलें असतें.

जय०— अरे, द्रव्य परत कसचें ! त्यांनीं त्याला माघारें देखील आणलें नाहीं, एकदां मात्र खेळावरून दृष्ट काढून त्याजकडे तिरस्कारानें पाहिलें.

# बाळमित्र.

राधा— अरे, अरे, ते कसे निर्दय प्राणी होते !

जय०— पण अजून सगळ्यापेक्षां वाईट गोष्ट ती सांगावयाची तशीच राहिली आहे — त्याच रात्रीस त्याबापड्यानें प्राण सोडिला.

राधा— अरेरे काय मोठा अनर्थ झाला हा !

माध०— छी छी, हें कर्म फार वाईट, दादा, मी तुह्मांस वचन देतों कीं आजपासून कधीं गंजीफा खेळावयाचा नाहीं, हाच मी गोविंदाकडे जाऊन सांगतों.

जय०— अरे, थांब, थांब, इतकी उतावळी करूं नको, एखादें चांगलें कर्म वाईट रीतीनें केल्यामुळें नाश झाला ह्मणून तें कर्म अगदींच सोडावें कीं काय? मी तुला काय सांगितलें कीं मित्र एकच असल्यावर खेळण्यांत सुख. मग त्यांत कांहीं नाश नाहीं, हितच आहे.

राधा— हित आहे, दादा?

जय०— हित हेंच कीं तो खेळ आपणास अनुकूळ किंवा प्रतिकूळ जरी आहे तरी सहन करावें; आह्मी इतकेंच शिकतों, जिंकल्याचा हर्ष किंवा हरल्याचा खेद किमपि मनांत आणूं नये.

माध०— मी कांहीं इतका निचाडा नाहीं कीं दुसऱ्यास जिंकलें

# लहानजुगारी.

असतां त्याचा धिक्कार करीन आणि हरलों असतां आपला खेद लोकांत प्रगट करीन, पण वाईट गोष्ट परिछिन्न नच डावी ह्मणून गोविंदाकडे जाऊंच नये हें बरें.

**जय०—** ह्यांत कांहीं मोठीशी गोष्ट आहे असें नाहीं, तुला इकडे खेळणें नाहीं ह्मणून तूं असें ह्मणतोस, तिकडे जरी गेलास तरी खेळावयाचें तुझ्या हातीं आहे.

**माध०—** मला पक्कें ठाऊक आहे, मी गेलों ह्मणजे ते मला खेळावयास खचीत बसवितील.

**जय०—** बरें कांहीं चिंता नाहीं, त्यांशीं खेळलास तर तुझी आणखी दाट ओळख पडेल, पण गोविंदाचे घरीं तूं जाऊंनको, त्यासच इकडे बोलावून आण, आणि सांग कीं राधाही खेळावयास इच्छिते आहे.

**राधा—** पण दादा—

**जय०—** अगे, उगीच राहा, त्यांत कांहीं कारण आहे.

**राधा—** खरें, पण त्यांनीं माझे पैसे जिंकून घेतले तर मग म्या काय करावें?

**जय०—** ते मी परतून देईन. माधवा, त्यांस सांग कीं माझा एक मित्र आहे त्यास मी खेळावयास आणीन.

**माध०—** दादा, पण माझा कोणी मित्र येणारा नाहीं, मग असेंक

में सांगूं?

जय० — अरे, माझा मित्र म्हटल्यावर तुझे ध्यानांत येत नाहीं?

राधा — दादाचे बोलण्याचा भाव त्यांजकडेसच आहे हें तुला समजत नाहीं काय?

माध० — होय दादा, तुह्मी खेळत असलां तर ते अगत्य घेतील.

जय० — मित्र कोण हें त्यांस कळवूं नको, आतां मी अर्ज लिहावयास जातों; परतून येईन तंवर तूं त्यांशीं खेळत ऐसबरें?

---

## प्रवेश ७

## राधा आणि जयराम.

राधा — तुह्मी येथेंच असा दादा, जाऊं नका, हें मला बरें दिसतें.

जय० — कां बरें?

राधा — शिवरामाच्या बोलण्यावरून मला अंदेशा आला आहे कीं, माधवाचे पैसे लबाडीनें जिंकून घ्यावे असा त्यांनीं क

# लहानजुगारी.

टकेला आहे.

**जय०—** असें आहे? तर मी येथेंच लपून राहतों, तूं मात्र खबरदार हो, ते ठकबाजी करूं लागले तर कांहीं बोलूं नको.

**राधा—** ते जर माझ्या भावाचे पैसे लुबाडूं लागले तर माझ्यानें उगीच कसें राहवेल?

**जय०—** अशानें त्यांची खोडच मोडेल, उन्हा गंजिफा खेळण्याचा नाद व नीचाची संगत धरण्याचा नाद अगदीं मोडून जाईल.

**राधा—** आपला माधव तर अगदींच भोळा, ब्वा, त्याचे गांवीं कांहीं नाहीं. त्याचा स्वभाव त्यास अझून कळत नाहीं. त्यास असें समजेना कीं हा ह्मणजे आपणास ठकवितो, आणि हरूं लागला ह्मणजे जो तापतो तो अगदीं तांबडा लाल होतो, त्यास भान देखील राहत नाहीं.

**जय०—** पण दाराकडे कोण आला तो? गोविंदा आपले मित्रांस घेऊन आला असें वाटतें, आतां मी एकीकडे लपून राहतों.



# बाळमित्र.

## प्रवेश ८

### गोविंदा, माधव, राधा, दाजी, आणि तात्या.

गोविं०— (राधेला ह्मणतो.) माझे मनास प्रशस्त वाटत नाहीं, कीं आह्मी इकडे आलों ह्मणून कदाचित् तुह्मांस उपद्रव लागेल.

माध०— तिला कांहीं आपला उपद्रव नाहीं, तीही आपल्याबरोबर खेळावयास येणार आहे असें माझे होऱ्यांत येतें.

राधा— होय तुह्मीं खेळूं द्याल तर मी तुह्मांबरोबर खेळेन.

दाजी— (मनांत वाईट आणून ह्मणतो.) बरेंच झालें तुह्मी आलां, तर मला फार आनंद आहे.

तात्या— (गोविंदास हळूच ह्मणतो.) हें फार वाईट झालें, आतां ती जसें ह्मणेल तसें खेळणें प्राप्त आहे, आपण इकडे येऊन पस्ताई पडलों.

माध०— अहो गड्यांनो, माझा एक मित्र आहे त्यास मी खेळावयास आणीन, त्याचे जवळ पुष्कळ द्रव्य आहे.

गोविं०— ठीक आहे.

राधा— तुमची मर्जी असल्यास आपण येथें बागांतच खेळूं. माझा बाप आतां इकडे यावयाचा नाहीं. तुह्मांस इकडे खेळूं

# लहानजुगारी.

देण्याविषयीं त्यानें मला आज्ञा दिली आहे. (हें ऐकून वि ठू वगैरे सर्व मुलें आनंद पावतात.) माध वा,चल आपण कांहीं भातुकली आणि गंजिफा घेऊन येऊं.

तात्या— कशाला जातां बाई, ह्या मजजवळ गंजिफा आहेत.

माध०— काय तूं आपल्या खिशांतच नेहमी गंजिफा बाळगतो स?

तात्या— होय, मी आतांशी रात्रंदिवस गंजिफांचा अभ्यास करीत असतों ह्मणून.

राधा— तुमच्या जवळ कवड्या आहेत?

तात्या— आह्मी पैसे लावितों.

गोविं०— (तात्यास एकीकडे करून ह्मणतो.) मजजवळ पैसे नाहींत हें तुला माहीत नाहीं काय? (मोठ्यानें.) कवड्या नसल्या तर मोजावयास फार वेळ लागेल, ह्यासाठीं बाई तुह्मी कृपा करून जर कवड्या आणाल तर फार बरें होईल.

राधा— बरें तर माधवा, चल आपण कवड्या आणावयास जाऊं.

# बाळमित्र.

## प्रवेश १

### गोविंदा, तात्या, दाजी, आणि विठू.

दाजी — आह्मी येथें आलों ही फार वाईट गोष्ट झाली. नीट झालें नाहीं.

विठू — त्याचा बाप येथें नाहीं मग काय चिंता आहे?

तात्या — (गोविंदास.) तूं अगोदर इकडे यावयास कां राजी झाला स?

गोविं॰ — येथल्याला आणि माझे घरच्याला काय अंतर आहे?

विठू — माधवानें सर्व आपला माल हरविल्यावर आपल्या मर्जीस येईल तेथें आपण जाऊन खेळूं.

दाजी — राधाबाईचें द्रव्य आह्मी सर्व जिंकून घेऊं असें वाटतें.

तात्या — ह्यांत काय संशय आहे? पण, गड्या, आपण पहिल्यानें जपून खेळलें पाहिजे; अगोदर एक डावाचा पण लावावा तो त्यासच जिंकू द्यावा, ह्मणजे त्यांस अमळ लोभ उत्पन्न होईल, मग आपण दुप्पट पण करूं.

गोविं॰ — बरें आहे, हें तूं आपलें वचन मात्र विसरूं नको हो, तात्या.

तात्या — तूं कांहीं काळजी करूं नको, तूं नि मी एकच आहों. पण

# लहानजुगारी.

आह्मी परस्पर येकमेकांचें जें जिंकूं अगर हरूं तें मात्र द्यावया घ्यावयाचें नाहीं हो, मी असें करीन कीं पहिल्यानें त्यांसच जिंकूं देईन, ह्मणजे त्यांचें मन खेळाकडे बळकट गुंतेल.

**गोविं॰**—पण, तात्या, त्यादिवशीं त्वां माझें सर्व भांडवल जिंकून घेतलें, आतां मजजवळ कांहीएक राहिलें नाहीं. एक पावला मात्र राहिला आहे, तेवढा जर हरलों तर मग काय करूं?

**तात्या**— आतांरे मी तुला कसा हरूं देईन? तूं कां चिंता करतोस? मी अशी खबरदारी ठेवीन कीं तूंच हटकून जिंकशील.

**दाजी**— माधवाचा मित्रही येईल तर बरें आहे. मग तर आह्मांस खाशी दुसरी शिकार साधली.

**विठू**— विद्याभ्यास करणारे लोकांस ठकविणें फार सोपें आहे.

**तात्या**— आतां त्यांचे मनांत कांहीं कल्पना नयावी ह्मणून आपण अगोदरच खेळावयास प्रारंभ करूं या. (तो गंजिफा काढितो.) पहा गोविंदा, मी आतां कशा गंजिफा लावतों त्या, कीं तूं खचीत हरशील. (तो हातांत गंजिफांची गलत करितो.) पहा आतां. (विठू दाजी व गोविंदा ह्यांस तीन

तीन गंजिफा वांटून देतो, आणि आपण तीन घेतो, मग गोविंदास ह्मणतो.) तुला पुरे?

गोविं०— नाहीं, आणखी एक दे.

तात्या— बरें तर, घे.

गोविं०— (गंजिफा उलटून पाहतो.) माझे ठिपके जास्ती झाले आतां मीच हरलों.

तात्या— (दाजीस ह्मणतो.) तुला पाहिजेत?

दाजी— होय मलाही एक पाहिजे.

तात्या— घे तर.

दाजी— माझे एकतिसांवर ठिपके अधिक झाले, मी ही हरलों.

तात्या— (विठूस ह्मणतो.) आतां तूंही हरशील. कां? गंजिफा देऊं?

विठू— ते दोघेजण हरले त्यापक्षीं मला नकोत.

तात्या— तर मलाही नकोत मोज, मोज, तुझ्या गंजिफांवर किती ठिपके आहेत?

विठू— पंचवीस.

तात्या— तर माझे! तीस! म्यांच जिंकिलें. मी मनांत आणलें तर हेंच उलटें करून दाखवीन. जिंकणें अथवा हरणें

# लहानजुगारी.

हीं दोन्ही माझ्या हातांत आहेत. आतां माधवाची बहीण आली ह्मणजे पाहशील चमत्कार.

**गोविं०**—तर आमच्याही मनांत येईल तेव्हां आह्मी ही जिंकूं. तूं तें कशावरून बोलतोस?

**तात्या**—हें शिकावया करितां त्वां आपले सर्व पैसे मजकडे हरविले ह्मणून मी ह्यांतला भेद तुला कळवितों. माझी चाल आहे, मीं पैसे जिंकल्या नंतर आपले मित्रास हमेशा सांगत असतों कीं माझी युक्ति शिका ह्मणजे जितके पैसे मीं तुजपासून जिंकून घेतले आहेत तितके तूंही लोकांपासून जिंकशील, ह्मणजे फिटासफीट झाली.

**गोविं०**—बरें, तें मला पाहूं दे, कसें तें.

**तात्या**—हें पहा, ह्या दहा ठिपकेवाल्या गंजीफा, ह्मीं दहा ठिपक्यांचीं राजाराणी इत्यादिक जीं मोठमोठीं उंचपानें तीं अंमळ लांब आहेत व पांच ठिपक्यांचे आंत जीं हलकीं पानें तीं अंमळ गहूंभर रुंद आहेत हीं ध्यानांत ठेवून गलत करते समयीं आपणास पाहिजेत तशीं युक्तीनें खालवर लावावीं. एखाद्यास ठकवायाचें असल्यास त्याला रुवाकडचीं दोन पानें व पुस्ताकडचें एक पान इतकीं दिलीं ह्मणजे पंचविसांवर अधिक ठिपके होत नाहींत, मग तितक्यानें त्या

ची तृप्ति होत नाहीं ह्मणून तो आणखी मागतो तेव्हां रुवा कडचें एक मोठें पान घ्यावें ह्मणजे एकतिसांवर ठिपके अधिक होतात आणि तो हरतो.

गोविं० — आतां मला कळलें.

तात्या — येवढीच कायतरी युक्ति.हा मीं तुला कशी खाशी विद्या सांगितली? विठूला विचार, तो माझ्या युक्ती प्रमाणें खेळतो ह्मणून त्याचें हित किती होतें तें.

---

## प्रवेश १०

### राधा, गोविंदा, तात्या, दाजी, आणि विठू.

राधा — ( गंजिफा व कवड्या बसकरावर आणून ठेविते.) खेळण्याविषयीं तुह्मी कांहीं खोळंबत नाहीं असें वाटतें.

तात्या — आह्मी अझून कांहीं खेळ मांडला नाहीं, उगीच मीगोविंदास दुसरे तऱ्हेचा एक खेळ मात्र शिकवीत होतों.

गोविं० — तूंही खेळतीसना? येतर, तूं आल्यानें आह्मांस फार संतोष होईल.

# लहानजुगारी.

**राधा**— तुह्मी कोणता खेळ खेळतां?

**दाजी**— खेळतर अगदीं सोपा आहे, ह्याचें नांव ह्मणाल तर एक तिश्री.

**विठू**— हा खेळ त्वां अगोदर जरी कधीं पाहिला नाहीं तरी तूं आह्मांस जिंकशील.

**राधा**— हा खेळ मला ठाऊक आहे, पण तुह्मी अट्टल खेळणारे पडलां ह्मणून माझ्यानें जिंकवणार नाहीं, पण तुह्मी जर नीट खेळूं द्याल तर मी खेळेन.

**गोविं॰**— होय पाहिजे तसें खेळेनास? आमची कांहीं ना नाहीं.

**दाजी**— त्वां आह्मांस जिंकिलें तरी आह्मी संतोषच मानूं.

**राधा**— माझेही मनांत तसेंच आहे.

**विठू**— जिंकिलें तरी फारसा नफा होणार नाहीं कांकीं पण थोडा आहे.

**गोविं॰**— बरें, आतां अशा गप्पाच मारीत बसतां की कांहीं खेळतां?

**तात्या**— माधव येई पर्यंत खोळंबलें पाहिजे. आपण त्याचे घरीं आज पाहुणे आलों आहों.

# बाळमित्र.

## प्रवेश ११.

### माधव, राधा, गोविंदा, तात्या, दाजी, आणि विठू.

माध० —(पेढे बर्फी जांब वगैरे मेवा मिठाई घेऊन येतो.) चा लूं द्या आतां, मी आलों.

विठू — आतां अगोदर कवड्या वांटून घ्याव्या, पण दर कवडी स किंमत काय ठरवावी?

माध० — मी पहिल्यानें खेळलों होतों तेव्हां दर कवडीचा एक आणा धरिला होता.

राधा — बरें, चला, एक आणा कां होईना?

तात्या— तर आतां खेळावयास लागतों.

(तात्या गंजिफा वांटून देतो, त्याचे युक्तीनें राधा व माधव हे लागोपाठ तीन डाव जिंकितात.)

राधा — अहा, असेंच जर आह्मी जिंकीत गेलों तर माझें बोल णें खरें होईल.

तात्या —अँः, एका आण्याचीच काय पैज करावी, तींत कांहीं फारसा नफा नाहीं तोटा नाहीं.

# लहानजुगारी.

दाजी— तर आतां दुप्पट पैज लावूं.

माध०— होय, मी कबूल आहें, माझे जवळ पैसे पुष्कळ आहेत, तुह्मी किती जिंकाल. (तो आपली पिशवी दाखवितो. त्या पिशवीकडे पाहून तात्या व त्याचे गडी खुशाल होतात.)

राधा — मजजवळ ही माधवा सारिखे पैसे आहेत.

तात्या— बरें, तर, पहिल्यानें जे डाव झाले त्यांचा अगोदर हिसाब करूं, मग खेळावयास लागूं. (तात्या कवड्या मोजितो.) म्यां बत्तीस कवड्या हारविल्या, दोन रुपये झाले, हे घ्या आपले.

विठू — माझ्या चाळीस कवड्या झाल्या, तर अडीच रुपये झाले ते हे घ्या.

दाजी— माझें दैव फार वाईट, म्यां पांच रुपये हारविले.

माध०— तुझे किती गेले, गोविंदा?

गोविं०— मजकडे एक रुपया मात्र झाला आहे, तो खेळ झाल्यावर मी मोहर मोडून देईन.

राधा— आतां पहा मला किती पैसे मिळाले ते! (मोजितो.) सात रुपये झाले.

माध०— तर बाकीचे मला मिळाले, कायगे? आह्मी दोघांनीच जिंकिलें हें मला मोठें आश्चर्य वाटतें.

विठू— मीतर कधींच जिंकीत नसतों.
गोविं०— बरें, पण, आतां तर दोन आण्यांची पैज आहेना?
माध०— हो, आह्मी कबूल आहों.
तात्या— (गंजिफांची गलत करितो.) पहा मी आतां वांटून देतों.

---

## प्रवेश १२

### जयराम, माधव, राधा, गोविंदा, तात्या, दाजी, विठू, आणि शिवराम.

जय०— (त्यास पाहून गोविंदा व त्याचे सोबती सर्व घाबरून गडबडत.) अरे, बसा, बसा, उठूं नका. पाहूं तर खरें.

माध०— दादा कांहीं खेळूं नका ह्मणत नाहींत. म्यां तुह्मांला पहिलें ह्मटलेंच होतें कीं माझा एक मित्र कदाचित् येईल. तुह्मी खेळतां, दादा?

राधा— दादा, तुह्मी खेळाच, तुमचे पैसे जिंकणें आह्मांस बरें वाटेल. आणि हीं मुलें ही तुमच्या पैशांचा वांटा इच्छितात.

# लहानजुगारी.

जय॰ — बरें तर मी आपल्या संतोषानें खेळतों, तुह्मी अवघेज णबसा. ( गोविंदाचे सर्व सामील गडी खिन्न दिसतात, त्यांस ह्मणतो. ) अरे मुलांनो, तुह्मी मज संगतीं खेळण्याविषयीं म नांत कांहीं भय बाळगूं नका. मी कांहीं खोटें खेळणार नाहीं. ( ते सर्व बसतात, मग तात्यास ह्मणतो. ) तूं गंजिफा वांट तोस तर इकडे दस्त दे, मला अगोदर पाहूं दे, तुह्मी गलत क शी काय आहे ती. ( तात्या इकडे तिकडे चुकावतो, पण ज यराम बळेंच दस्त घेऊन चाळून पाहतो. ) हीं हुकुमांचीं उं चउंच पानें सर्व एकीकडेसच लागलेलीं आहेत, ही अशी कशीरे गलत? राधे, आपला चांगला जोड होता तो कां दि ला नाहीं? तो आण बरें, पाहूं.

राधा — मला काय ह्मणतां? ह्यांनींच ह्या गंजिफा आपल्या ब रोबर आणिल्या, आणि मी आलें नाहीं तों हे खेळावयास देखी ल बसले होते.

जय॰ — ( तात्यास ह्मणतो. ) ह्या आमच्या गंजिफा घे, ह्यांत कां हीं घालमेल व्हावयाची नाहीं. ( तात्या तो जोड भीतभीत घेतो. ) तुह्मी कोणता खेळ खेळतां?

माध॰ — एकतिशी.

जय॰ — पैज काय लावितां?

# बाळमित्र.

ाधा— दर कवडीस दोन आणे. म्यां इतकें जिंकिलें आहे, ह्याशि वाय गोविंदाकडे माझा एक रुपया येणें आहे, तो खेळ झाल्यावर मोहर मोडून देणार आहे.

जय॰— बरें, तर, दरकवडीस दोन आण्यांचा करार ठीकच आहे; पण मला पाहूं द्या, अवघ्यांजवळ खेळा पुरते पैसे आहेत किंवा नाहींत ते. ह्याकरितां सर्वांनीं आप आपलाले पैसे मला दाखवावे. गोविंदा, दाखीव तुजजवळ किती पैसे आहेत ते. (गोविंदाचा चळकांप होतो.) तूं कांपतोस कां? तुला धनुर्वात झाला कीं काय?

गोविं॰—(त्याची बोबडी वळते.) होय होय मिमि मी—

जय॰— असें, रे, काय करतां हें? एक तोतरें बोलतो, एकाला उगडगां घाम आला, एकाला कांप सुटला. तात्या, तूं तर अगदीं माशा खाल्ल्या सारखाच दिसतोस?

माध॰— इतक्यांत ह्यांना असें काय झालें?

जय॰— ह्याचें कारण मी तुला सांगतों; ह्यांचे मनांत लबाडी करावयाची होती; हें ह्यांचे मुखचर्येवरूनच कळून आलें.

माध॰— कां? असें कां ह्मणतां तुह्मी? हा तर डाव आहे. कोण हरेल नी कोण जिंकेल. म्यां आणि माझे बहिणीनें जिंकिलें कीं नाहीं?

# लहानजुगारी.

तात्या — (अंमळ अवसान धरून.) हरलेल्या पैशांची फेड गोविंदा वांचून अवघ्यांनी केली कीं नाहीं?

गोविं०— मी कोठून देऊं? तुह्मींच माझे सर्व पैसे लबाडीनें जिंकून घेतले.

जय०—(मनांत ह्मणतो) बरें, ह्यागड्यांतील एक तर फुटला; हीम्यां बरीच कल्पना काढली. (मोठ्यानें.) माधवा, पहा हे तुझे सोबती कसे आहेत ते.

माध०— दादा, हे कांहीं इतके लबाड नाहींत असें मला वाटतें.

जय०— गोविंदा, तूं ह्या सर्वांतून अमळ खरा दिसतोस, तर खरेंच सांग, तुह्मीं माझ्या मुलांस ठकवावयाचा मनसोबा केला होता कीं नाहीं?

गोविं०— होय, दादासाहेब, खरेंच तें, माझे मनांत असें आलें होतें कीं आपण जितके पैसे हारविले तितके पुनः दुसऱ्यापासून मिळवावे, ह्मणून ह्यामुलांशीं गट्टी करणें प्राप्त झालें; अशी लबाडी करकरून ह्या तात्यानें माझे पैसे किती जिंकिले हें जर तुह्मांस माहीत झालें असतें तर तुह्मी ह्याला तुरुंगांतच घालावयाला सांगतां.

जय०— ठीक झालें, अशा लुच्चांची संगत धरली त्याचें फळ

झालें; ही बरीच तुला शिक्षा घडली. असो, पण त्वां किती काय गमाविलें तें सांग.

गोविं० — दोन मोहरा, चाकू, कातर वगैरे जें काय होतें तें सर्व तात्यानें घेतलें. ह्याशिवाय आणखी एक माझें चित्र अडकावून ठेविलें आहे, त्याबद्दल मजवर एक मोहर लादली आहे, आणि ह्मणाला कीं माधवास आह्मांकडे खेळावयाला आण, नाहीं तर तुझे बापाजवळ सांगूं.

शिव० — हें त्याचें बोलणें खरें असेलसें वाटतें, कांकीं त्याप्रमाणेंच त्यानें मला आज सकाळीं सांगितलें होतें, अशी लबाडी करावयास त्याला फार वाईट वाटलें. दादासाहेब, मी तुह्मांला सांगतों, लबाडीचें मुख्य घर तात्या आणि ते दुसरे दोघे—

जय० — तूं बोललास तें माझ्या ध्यानांत आहे. (दाजी, आणि विठू, ह्यांस) जा येथून लबाडांनो, तोंड काळें करा; वाईट ही तुमची चाल; थांबा आतां, तुमचे बापांस सांगून त्यांजकडून तुमची खोडच काढतों.

दा० वि० — (त्याचे पायां पडून ह्मणतात.) दादासाहेब, आह्मी चुकलों, येवढ्या कामाच्या अपराधाची क्षमा करा, आजपासून आह्मी तुमचे घरीं कधीं येणार नाहीं.

# लहानजुगारी.

जय०— आतां नाहीं कसें? ह्या गोष्टीचा बंदोबस्त मला हजार कामें टाकून केला पाहिजे; तुमच्या कपट रीतीपासून माझ्या एकट्या मुलास वांचवून उपयोग काय? या गांवांतील सर्व मुलांस वांचविलें पाहिजे; खेळण्यावर नफा मिळविणें हा उदीम सार्‍यांत वाईट आहे. तुह्मी इतके लहान असतां आतांशींच अशीं कर्में करितां, तेव्हां पुढें काय काय अनर्थ कराल नकळे. पण तुह्मी ही वाईट चाल टाकाल असें मला वाटतें, ह्मणून मी तुह्मांस सोडून देतों; पण तुमच्या आईबापांस मात्र सांगेन. आतां पुरती आठवण ठेवा; जर इतःपर कोणाशीं अशी लबाडी केली तर मी तुमची दुर्दशा केल्यावांचून सोडणार नाहीं. ( दाजी व विठू दोघेजण फजीत होऊन निघून जातात.) (मग तात्यास ह्मणतो.) त्यां गोविंदापासून इतकें जिंकून घेतलें हें खरेंना?

तात्या— ( गुंग होऊन.) होय, दादा साहेब.

जय०— त्यास त्यां ठकविलें ह्याची कांहीं चिंता नाहीं, त्याचे आचरणानुरूपच त्यास योग्य शिक्षा मिळाली.

गोविं०— मजजवळ वस्ता गमावल्या बद्दल पैसे द्यावयास असते तर बरें होतें.

माध०— मजजवळ जितके पैसे आहेत तितके पुरत असले

तर मी देतों; ह्या घे पांच मोहरा.

गोविं०—अहाहा केवढे तुमचे उपकार हे! ह्याचा उतराई मी कधीं होईन. ह्यावेळेस मजवर केवढी दया केली ही.

माध०— तुह्मी आह्मी शेजारी आहों, तुझ्या मनास येईल तसे हसेबंदीनें दिले तरीं चिंता नाहीं.

जय०— (गोविंदाचा माल तात्याकडून परत देववितो.) कां! गोविंदा, आतां तुझें तुला अवघें मिळालें?

गोविं०— फार काय सांगूं? तुमचे आणि माधवाचे कृपेनें आज मी बापाचे मारांतून वांचलों. आतां म्यां तोंडांत मारून घेतली; आजपासून कधींच असा खेळ खेळणार नाहीं.

जय०— (तात्यास पैसे देतो.) जें त्वां गोविंदापासून लबाडीनें चोरून घेतलें त्याचे किमती बद्दल हे घे, पण तुला न्यायाधीशाकडे थोडक्याच दिवसांत जावें लागेल; तंवर तुझ्या कपाळीं बंदीखाना आहे. त्वां बदफैली करून दोघांस वाईट चाल शिकविली, आणि गोविंदाचा माल लबाडीनें नेला, आणि दुसऱ्या पोरास ठकवावें ह्मणून त्यास पाठविलें, तर आतां तुझें खूपतराशीं पारिपत्य होईल. (तात्या रागास्तव रडत रडत बाहेर जातो.)

# लहानजुगारी.

गोविं०— (जयराम दादाच्या पायां पडून ह्मणतो.) अहो दादा, तुह्मी मजवर जर कृपा केली नसती तर माझे बापानें मला यथास्थित कुट्टा काढून बाहेर हांकून लावलें असतें. अहो माधवराव, तुमचे पैसे लबाडीनें जिंकून घ्यावे असा ज्यांचा मनसोबा त्यांस मी सामील झालों असतां तुह्मी तें कांहींच मनांत न ठेवून थोरपणानें वागलां.

माध०— तूं ह्या गोष्टीचा खतरा मनांत बाळगूं नको, मी हें सर्व विसरून जाईन.

जय०— ह्या शिवरामाच्या सांगण्यावरून माझी खातर जमा झाली कीं तुझा हात गुंतला होता ह्मणून तुला त्यास अनुकूळ होणें प्राप्त पडलें, ह्यासाठीं तुजकडे फारसा अपराध नाहीं, ह्मणून तुला माझे पुत्राची सोबत धरावयास आज्ञा देतों; परंतु आजपासून जर तूं जपून न वागशील तर तुझी ही दुर्दशा करीन; नीट वागलास तर तुजवर आणि शिवरामावर सारखी ममता करीन. मुलांनो, जुगार खेळण्याचा परिणाम कसा अनुचित आणि अनर्थकारी आहे तो पाहिला ना? माधवा, मित्र वाईट आहे की चांगला आहे ह्याची निवड करण्याविषयीं फार सावधगिरी ठेविली पाहिजे.

